


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







अनुक्रमणिका

# दीपावली

वर्ष ७ वें
१९५१

संपादक :
रॉय किणीकर    चित्रकार दलाल
(जी. डी. आर्ट)

• रावसाहेब पटवर्धन • वि. स. खांडेकर • यशवंत • कृ. द. दीक्षित • वा. रा. कान्त • पु. भा. भावे • मनमोहन • अनंत काणेकर • स. आ. जोगळेकर • लक्ष्मणराव सरदेसाई • बा. भ. बोरकर • दुर्गा भागवत • वि. वि. बोकील • वा. ल. कुलकर्णी • वि. म. शिरवाडकर • रॉय किणीकर • सूर्यकान्त खांडेकर • वसंत कानेटकर • मंगेश पाडगांवकर • हरिहर उसेकर • प्रभाकर तामणे • सदानंद रेगे • दत्तो वामन पोतदार • बा. भ. बोरकर • पु. ग. सहस्रबुद्धे • प्रफुल्लदत्त • एस्. के. ओशी • रमाकान्त • गजानन जागीरदार • रघुवीर सामन्त • त्र्यं. कृ. टोपे • वसंत वापट • राजा मंगळवेढेकर • मायाशंकर • गं. व. ग्रामोपाध्ये • गो. ल. आपटे • आरती उद्यावरकर

* * * * * * * * * * * * * *

चित्रें :

| | | |
|---|---|---|
| • वसंत | हिंदोल | मालकंस |
| • दीपक | मेघ | भैरवी |

प्रकाशन कार्यालय :
दलाल आर्ट स्टुडिओ
४०-४२ केनेडी ब्रिज
मुंबई ४

प्रकाशन स्थळ :
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, गिरगांव
मुंबई



* * * * * * * * * * * * *

संपादक, मुद्रक, प्रकाशक : रॉय किणीकर

ही दीपावली आमच्या वाचकांस, लेखकांस, विक्रेत्यांस, जाहिरातदारांस, स्नेह्यांस, सहकाऱ्यांस आणि हितचिंतकांस सुखाची जावो !

—संपादक

अनुक्रमणिका

**राजकारणाचा प्रश्न क्षणभर दृष्टिआड ठेवून जीवनाच्या इतर क्षेत्रांचाच विचार करूं लागलों तरी असें वाटतें कीं आमचें हें आजचें जीवन म्हणजे जणुं—**




"जनतेच्या मनीवर जी काजळी आली आहे, कुविचारांचीं जीं कोळिष्टकें सांचलीं आहेत तीं झाडून टाकलीं पाहिजेत; सूर्यासारखा तळपणारा व चर्मचक्षूंना दिसणारा आदर्श राष्ट्रासमोर असला तरच नवसमाज निर्माण होऊं शकेल,' असे उद्गार परवां पंडित नेहरूंनीं कॉंग्रेससमोर केलेल्या अध्यक्षीय भाषणांत काढले. त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत निवडणुका अगर पक्षप्रचार ऐवजीं जीवनमूल्यें आणि नवसमाजनिर्मिती यांवरच सर्व भर आहे. त्यांच्या ध्येयनिष्ठ दृष्टी-पुढें दिसणारें भारताच्या भवितव्याचें दृश्य त्यांनीं आपल्या काव्यमय वर्णनानें रंगविलें. भारतीय विचारवंतांपैकीं बहुसंख्य व्यक्तींना पंडितजींच्या भाषणांतील तात्त्विक मुद्दे मान्य होतील. निवडणुका जसजशा जवळ येत चालल्या आहेत तस-तसें अन्तीं आपणांस काय साधावयाचें आहे याचा विचार भारतांतील प्रत्येक सुजाण मनुष्यास करावा लागेल. हिंदुकोड बिल, प्रेस बिल आणि नियोजनसमितीचा पंचवार्षिक अहवाल या तीन बाबींवर विधिमंडळांत, सभांत, वृत्तपत्रांत ज्या चर्चा, जे वादविवाद झाले ते काय दर्शवितात? निरनिराळ्या पक्षांतील नेते किंवा भिन्नभिन्न विचारप्रणालींचीं माणसें आज मोठ्या उत्साहानें व आवेशानें प्रगतीच्या घोषणा करीत आहेत. समाजवाद, सर्वकल्याण, लोकशाही अशा मोठ-मोठ्या तत्त्वांचा पुकार करीत आहेत. प्रगति म्हणजे नेमकें काय, शेवटीं आपणांस 'सामाजिक न्यायावर अधिष्ठित झालेलें समान संधीचें लोक-सत्ताक' कसें गांठतां येईल यासंबंधीं निश्चित कल्पना, ठाम कार्यक्रम व रेखीव जीवनमार्ग कोणाजवळच नाहीं. हिंदुकोड बिलावर कॉंग्रेस पक्षांतील सभासदांना मतस्वातंत्र्य दिल्याबरोबर त्या पक्षांतील सदस्यांच्या मतामतांचा गोंधळ अगदीं स्पष्ट झाला. बहुतेक सामाजिक प्रश्नांबाबत वास्तविक हीच स्थिति आहे. आज लग्नसंस्था, घटस्फोट, वारसा, स्वातंत्र्याच्या मर्यादा व जबाबदाऱ्या, नियंत्रणें, व्यक्ति व समाज यांचे संबंध, अशा मूलभूत प्रश्नांवर एका पक्षांतच इतकीं नाना प्रकारचीं मतमतांतरें झालेलीं आढळतात; मग सर्व देशांत तीं किती असतील? सर्वभूतहित हें बहुतेकांचें उद्दिष्ट असलें तरी त्याच्या प्राप्तीसाठीं दोन विरुद्ध दिशांना जाणारे मार्ग आज दाखविण्यांत येत असतात. तसें पाहिलें तर पंडित नेहरू, पू. विनोबा आणि श्री. जयप्रकाश नारायण यांच्या ध्येयस्वप्नाचें स्वरूप पंचाहत्तर टक्के तरी एकच आहे. असें असून प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र त्यांचें कशावरहि एकमत होत नाहीं, असें म्हणणें फारसें अतिशयो-क्तीचें होणार नाहीं. परवां पंडित नेहरू म्हणाले, "आपणांपैकीं प्रत्येकजण ध्येयासाठीं झटणारा कडवा धारकरी बनला पाहिजे. आपल्या उच्च ध्येयांची तेजःशलाका आपल्या आचार-विचारांना, समग्र जीवनाला व्यापणारी झाली पाहिजे. असे सच्चे सैनिक जेव्हां गांवोगांव निर्माण होतील तेव्हां देशांत एक प्रचंड झंझा-वात निर्माण होईल." पंडित नेहरू इतक्या जिव्हाळ्यानें व आवेशानें आपलें हृद्गत सांगत असतां त्यांच्या या तीव्र भावनेला प्रतिसाद देणारे पांच हरीचे लाल तरी निर्माण होत आहेत काय? शरीरश्रमाची महति विनोबा व जयप्रकाश यांनीं वारंवार समाजाला सांगितली. भूदानयज्ञ करून यज्ञावशिष्ट धनाचा ज़मीनदारांनीं उपभोग घ्यावा; जरूरीपेक्षां अधिक सांठवणारा 'स्तेन' होय, हें विनोबाजी सतत शिकवीत आहेत, जमिनी मिळवून त्या वांटून टाकण्याच्या योजना करीत आहेत; पण ह्या अद्भुत मोहि-मेला हार्दिक अनुकार किती प्रांतांतून व किती प्रमाणांत लाभला? देशासाठीं एक तास देण्याची हांक जयप्रकाशजींनीं देशाला दिली, भूसेनेची नव कल्पना आपणांपुढें ठेवली, त्याचें फलित काय? महाराष्ट्रांत सानेगुरुजी-सेवापथकाचा अभिनव प्रयोग सुरू झाला, एक वर्षभर पथकाचें काम चिकाटीनें चालू आहे, पण सेवादलांतील मूठभर सैनिकांव्यतिरिक्त पंचवीस तरुणांना-देखील त्या कामाची ओढ वाटली नाहीं; त्यांना स्फूर्ति झाली नाहीं. आणि असे असूनहि पंडित नेहरू, पू. विनोबा, जयप्रकाशजी यांच्यासारखे क्रांतिकारी पुरुष आपल्या स्वतःच्या श्रद्धाबळावर वाटचाल करीत आहेत. त्यांचा जयजयकार करणारे पुष्कळ आणि अनुकार करणारे दुर्मिळ अशी अवस्था आहे.

स्वातंत्र्य मिळाल्याला आतां चार वर्षें झालीं. दरम्यान नवीन राज्यघटना तयार झाली, लोक-सत्ताकाची द्वाही फिरली, १६ कोट स्त्री पुरु-षांना मताधिकार लाभला, जातिधर्मांचे कोट जमीनदोस्त झाल्याच्या घोषणा झाल्या, अस्पृश्य-तेचें कायदेशीर उच्चाटन झालें... आपल्या देशांत एवढ्या क्रांतिकारक घटना इतक्या तडकाफडकीं व सहजपणें घडल्या तरी प्रजेच्या जीवनाला जणुं त्यांचा स्पर्शहि झालेला नाहीं. **यदाकदाचित् अचानक जगबुडी झाली आणि कर्मधर्मसंयोगानें आपली राज्य-घटना, समाजसुधारणेचीं बिलें आणि प्रमुख राजकीय पक्षांचे निवडणूक जाहिर-नामे जर तरले तर ते वाचून नव्या जगांतील नव्या मानवसमाजाला आपल्या देशाबद्दल केवढा आदर वाटेल? त्यांना वाटेल कीं येथील समाज प्रगति-शिखरावर आरूढ झालेला, लोकांचें जीवन सुखसंपन्न, गांधीजींचे विचार येथें साकार झालेले—प्राचीन ग्रीससारखा किंवा ब्रह्मदत्तराजाच्या काशीराज्यासारखा हा देश मोठा भरभराटलेला होता.** पण त्यांना जर एखाद्या कर्णपिशाचानें आपली सत्यस्थिति सांगितली तर त्यांची केवढी दारुण निराशा होईल!

• परवां माझे एक मित्र निवडणुकीच्या सभेंत भाषण करून आले. आपल्याला लोक नाना प्रश्न विचारून भंडावून सोडतील, निरुत्तर करतील अशी भीति त्यांना वाटत होती. पण प्रत्यक्षांत

रा. व. हे. व आ. ट व र्ध न




त्यांना अनुभव आला तो हा कीं, त्यांच भाषण लोकांनीं अगदीं निर्विकारपणें ऐकलें, त्यांना तें समजत आहे कीं नाहीं हेंसुद्धां कळत नव्हतें. त्यांचीं दुःखें व त्यांचें दैन्य जणुं त्यांना जाणवत नव्हतें; जाणवत होतें तें वक्त्याला ! स्वामींच्या घरीं म्हणतात कीं दारू पिणारा एक तर कैफ दुसऱ्याला अशी स्थिति असते. तसें दारिद्र्य-दुःख जनतेचें पण त्याचा कैफ पुढाऱ्यांना अशी आज अवस्था आहे !

राजकारणाचा प्रश्न क्षणभर दृष्टीआड ठेवला आणि जीवनाच्या इतर क्षेत्रांचा विचार करूं लागलों तरी असें आढळून येतें कीं साहित्य, कला, क्रीडा, ज्ञानविज्ञान—असें एकहि क्षेत्र नाहीं कीं जेथें जीवनरस खळखळून वाहतो आहे——न जेथें क्षुद्र भावना, न हेवे दावे; एक मस्ती आहे, उन्माद आहे, जिवाजिवांचें मैत्र आहे. सर्व क्षेत्रांतील प्रगतिशीलता, आनंद, सहकार्य इत्यादिकांचा लोप होऊन सारा समाज एक एकसंध सहारा बनला आहे. हें दारुण चित्र पाहिलें कीं मनच मनाला विचारूं लागतें, "आपला समाज जिवंत आहे का ? समाजांत सृजनशीलतेचें स्फुरण कोठें आहे का ? कीं एखाद्या शिलामय बनलेल्या शापिता-प्रमाणें हा प्रचंड समाज निरंतरचा स्थितिमान् राहणार आहे ?" असा विचार मनांत रेंगाळतो आणि लगेच महंमद इक्बालांच्या त्या ओळी डोळ्यांपुढें तरळतात :

...यूनान मिस्र रूमा,
सब मिट गये जहाँसे
अबतक मगर है बाकी
नामोनिशाँ हमारा
कुछ बात है कि हस्ती
मिटती नहीं हमारी...

साम्राज्यें गडगडलीं, सीझर-अलेक्झांडरांचे राजमुकुट खालीं आले, सूर्य ज्यावर मावळत नव्हता असें ब्रिटिशांचें साम्राज्य आपल्या डोळ्यांदेखत कोलमडून पडलें, राजवंश निर्वंश झाले, राजधान्या जमीनदोस्त झाल्या, भले भले हरले, मोटमोठे देश धुळीला मिळाले, पण भारत मात्र पतन-अभ्युदयाच्या चढउतार ओलांडीत एखाद्या निर्भर व्रती यात्रीप्रमाणें संथ पुढें चालला आहे. काळ जणुं त्यानें गिळला आहे. अशोकचक्रांकित ध्वज पुन्हा जगाला प्रेमाचा, शांतीचा, सत्याचा संदेश गगनांत फडकतो आहे. आपला देश जर मृत असता तर हें झालें असतें का ? कदापि नाहीं. 'कुछ बात है कि हस्ती




These permanently waterproof 'AQUA' watches are sold in India by special agreement with the original inventors of the world famous Oyster waterproof watch: The ROLEX Watch Co. of Geneva Switzerland.




LUND & BLOCKLEY LTD.
150, ESPLANADE ROAD, BOMBAY.

...नाही !

मिटती नहीं हमारे ” हें त्यावरूनच सिद्ध होतें. पण पुढें? इथें नवा इतिहास घडत असतांना, आमच्या डोळ्यांदेखत भविष्याचे शिल्पकार ध्येयस्वप्न सेमूर्त करीत पहात असतांना आम्ही स्थावर शिल्पांसारखे, गाणितज्ज्ञ वालुकणांसारखे मृतप्राय पडलेलों आहोंत. आम्ही भारभूत झालों, कांहीं निर्माण करूं शकत नाहीं हें सत्य सतत सतावीत रहतें. आपल्या पूर्व वैभवाची, आधुनिक इतिहासांत करून दाखवलेल्या अपूर्व क्रांतीची, आपल्या दुर्दम्य संस्कृतीची जाणीव झाली कीं मन आशेनें फुलारतें; पण समाजाची ही दुरवस्था लक्षांत येतांच तें पार कोळपून जातें. मग यांतलें खरें काय? तें कीं हें? एका प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञांशीं या विषयीं चर्चा करीत असतां ते म्हणाले, “India is a country of death and poverty-ridden derelict people. Skull is your symbol!” [भारतावर मृत्यूची सांवट पडलेली आहे; दरिद्री आणि निःसत्त्व प्रजा मृत्युपंथाला लागलेली आहे. मृताची कवटी, हेंच तुमचें प्रतीक!]

हा प्रश्न टीकेनं नकार करणें कठिण आहे. सात लक्ष खेड्यांत रहाणारी भारताची पस्तीस कोटी प्रजा. या प्रजेचें अठरा विश्वे दारिद्र्य, प्रजेचें अज्ञान, व अत्यंत खालावलेला राहणीचा दर्जा, हीं भारताची समस्या आहे. हें शिवधनुष्य जो कोणी मोडील तो भारताचा विधाता ठरेल. लोकसत्ताकाची आम्हीं घोषणा केली आहे. लोकशाही समाज आम्हांला येथें निर्माण करावयाचा आहे. ३७ व्या विज्ञान परिषदेचे अध्यक्ष प्रशांतचंद्र महालानोबीस म्हणाले कीं, “भारतीय जनतेला किफायतशीर रोजगार कसा देतां येईल याचा शास्त्रज्ञांनीं शोध लावला पाहिजे. भारतीय जनतेला किफायतशीर रोजगार आम्हाला देतां आला तर अवघा संसार आम्ही सुखाचा करून दाखवूं. समाजवादी अर्थव्यवस्था निर्माण केली पाहिजे, सहकारी शेती मोठ्या प्रमाणावर सुरू केली पाहिजे, मोठ्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण केलें पाहिजे, गांवोगांव लहान धंदे सुरू केले पाहिजेत, शिक्षणपद्धति आमूलाग्र बदलली पाहिजे, कुटुंबनियोजनाचा प्रचार सुरू केला पाहिजे.”

पं. नेहरूंचें मंत्रिमंडळ थबकत थबकत या दिशेनें थोडा फार यत्न करीत आहे. समाजवादी पक्षानें पुनर्घटनेची समग्र योजना व आराखडा तयार केला आहे. ‘सर्वांना काम’, ‘कसेल त्याची जमीन’ या घोषणा करून पू. विनोबांनीं शेती व ग्रामोद्योगावर जोर देऊन एक स्वतंत्र योजना तयार केली आहे. या तिन्ही मतांचे नेते एकत्र बसून या योजनांची चर्चा करूं शकतील. योजनांची कमतरता नाहीं. सर्व जगाचा अनुभव आपल्यासमोर आहे. नवीन राज्यघटना तयार करतांना नाहीं का आपण सर्व देशांच्या राज्यघटनेंतून जें बरें दिसतें तें घेतलें? त्याप्रमाणें आर्थिक व्यवस्थेचा आराखडा तयार करतांनाहि आपण इतरांच्या अनुभवाचा फायदा घेऊं शकूं. **वाण योजनांची नसून योजकांची** आहे. साज शृंगार बाजारांत मिळतो. प्रेम कुठें मिळत नाहीं. तंत्र आहे मंत्र नाहीं. असें कां व्हावें? म. गांधींनीं नाहीं का शेणामातीच्या बाहुल्यांत प्राण फुंकून त्यांतून लढवय्ये निर्माण केले! १९३० मध्यें, १९४२ सालीं नाहीं कां जनतेनें आपल्या शौर्याची साक्ष दाखवली? स्वातंत्र्यासाठीं चाललेल्या लढ्याची शक्ति ज्या झऱ्यांतून आम्हांला मिळत होती, ज्या शक्तीच्या विलसितानें आमचीं क्षुद्र जीवनें मंत्रून, भारून टाकलीं त्या शक्तीचा आज संपूर्ण लोप कां व्हावा? ती शक्ति कांहीं गांधीजी या एका व्यक्तींत सामावलेली नव्हती. ती जनतेच्या



अनुक्रमणिका






मिटती नहीं हमारी" हें त्यावरूनच सिद्ध होतें. पण पुढें? इथें नवा इतिहास घडत असतांना, आमच्या डोळ्यांदेखत भविष्याचे शिल्पकार ध्येयस्वप्न समूर्त करून पहात असतांना आम्ही स्थावर शिल्पांसारखे, अगणित वालुकणांसारखे मृतप्राय पडलेलों आहोंत. आम्ही भारभूत झालों, कांहीं निर्माण करूं शकत नाहीं हें सत्य सतत सतावीत रहतें. आपल्या पूर्व वैभवाची, आधुनिक इतिहासांत घडून दाखवलेल्या अपूर्व क्रांतीची, आपल्या दुर्दम्य संस्कृतीची जाणीव झाली कीं मन अभिमानें फुलारतें; पण समाजाची ही दुरवस्था लक्षांत येतांच तें पार कोळपून जातें. मग यांतलें खरें काय? तें कीं हें? एका प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञाशीं या विषयीं चर्चा करीत असतां ते म्हणाले, "India is a country of death, and poverty-ridden derelict people. Skull is your symbol!" [भारतावर मृत्यूची सांवट पडलेली आहे; दरिद्री आणि निःसत्त्व प्रजा मृत्युपंथाला लागलेली आहे. मृताची कवटी, हेंच तुमचें प्रतीक!]

प्रश्न टीकेनें दूर करणें कठिण आहे. सात लक्ष खेड्यांत रहाणारी भारताची पस्तीस कोटी प्रजा. या प्रजेचं अठेरा विश्वे दारिद्र्य, प्रजेचें अज्ञान, व अत्यंत खालावलेलें जीवनदर्जा, हीं भारताची समस्या आहे. हें शिवधनुष्य जो कोणी मोडील तो भारताचा विधाता ठरेल. लोकसत्ताकाची आम्हीं घोषणा केली आहे. लोकशाही समाज आम्हांला येथें निर्माण करावयाचा आहे. ३७ व्या विज्ञान परिषदेचे अध्यक्ष प्रशांतचंद्र महालानोबीस म्हणाले कीं, "भारतीय जनतेला किफायतशीर रोजगार कसा देतां येईल याचा शास्त्रज्ञांनीं शोध लावला पाहिजे. भारतीय जनतेला किफायतशीर रोजगार आम्हाला देतां आला तर अवघा संसार आम्ही सुखाचा करून दाखवूं. समाजवादी अर्थव्यवस्था निर्माण केली पाहिजे, सहकारी शेती मोठ्या प्रमाणावर सुरू केली पाहिजे, मोठ्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण केलें पाहिजे, गांवोगांव लहान धंदे सुरू केले पाहिजेत, शिक्षणपद्धति आमूलाग्र बदलली पाहिजे, कुटुंबनियोजनाचा प्रचार सुरू केला पाहिजे."

पं. नेहरूंचें मंत्रिमंडळ थबकत थबकत या दिशेनें थोडा फार यत्न करीत आहे. समाजवादी पक्षानें पुनर्घटनेची समग्र योजना व आराखडा तयार केला आहे. 'सर्वांना काम', 'कसेल त्याची जमीन' या घोषणा करून पू. विनोबांनीं शेती व ग्रामोद्योगावर जोर देऊन एक स्वतंत्र योजना तयार केली आहे. या तिन्ही मतांचे नेते एकत्र बसून या योजनांची चर्चा करूं शकतील. योजनांची कमतरता नाहीं. सर्व जगाचा अनुभव आपल्या समोर आहे. नवीन राज्यघटना तयार करतांना नाहीं का आपण सर्व देशांच्या राज्यघटनेंतून जें बरें दिसतें तें घेतलें? त्याप्रमाणें आर्थिक व्यवस्थेचा आराखडा तयार करतांनाहि आपण इतरांच्या अनुभवाचा फायदा घेऊं शकूं. **वाण योजनांची नसून योजकांची** आहे. साज शृंगार बाजारांत मिळतो. प्रेम कुठें मिळत नाहीं. तंत्र आहे मंत्र नाहीं. असें कां व्हावें? म. गांधींनीं नाहीं का शेणमातीच्या बाहुल्यांत प्राण फुंकून त्यांतून लढवय्ये निर्माण केले! १९३० मध्यें, १९४२ सालीं नाहीं कां जनतेनें आपल्या शौर्याची साक्ष दाखवली! स्वातंत्र्यासाठीं चाललेल्या लढ्याची शक्ति ज्या झऱ्यांतून आम्हांला मिळत होती, ज्या शक्तीच्या विलसितानें आमचीं क्षुद्र जीवनें मंत्रून, भारून टाकलीं त्या शक्तीचा आज संपूर्ण लोप कां व्हावा? ती शक्ति कांहीं गांधीजी या एका व्यक्तींत सामावलेली नव्हती. ती जनतेच्या

अंगीं संचरलेल्या जाणिवेंत, उत्साहांत होतें. सरस्वती नदी वाहतां वाहतां विनशनतीर्थाजवळ वाळवंटांत लुप्त व्हावी त्याप्रमाणें सामूहिक उत्साहाची गंगा स्वातंत्र्योत्तर लुप्त झाली आहे ही गोष्ट आतां लपवून, नाकारून भागणार नाहीं; ती प्रांजलपणें कबूलच केली पाहिजे.

ही पाताळांत लोपलेली गंगा पुन्हा वर उसळविण्याचा मार्ग कोणता ? लोकांच्या अंतःकरणांत स्फुरण जोंवर निर्माण झालेलें नाहीं, त्यांचीं मनाचीं कोळिष्टकें जोंवर झाडलीं गेलीं नाहींत तोंवर सारे आराखडे नि नियोजनयोजना व्यर्थ आहेत; अस्पृश्यतेचा कायदा हा तोंवर दप्तराचेंच भूषण ठरेल. राज्यघटना काय नि समाजसुधार विलें काय, लोकांच्यां मनांतच जर शुभशक्ति जागृत झालेली नसली तर काय सुपरिणाम घडवून आणूं शकतील ? अन्नान्नदशा झाली तरी लोक 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेकडे ढुंकून कां पहात नाहींत ? दरवर्षी लोकसंख्या १·५ टक्क्यांनीं (प्रतिवर्षी ५ लाख) वाढत आहे. आणि दरडोई धान्यपेरीचें क्षेत्रफळ मात्र कमी होत आहे, याची खंत कुणाला आहे ? आणि उद्यां महायुद्ध सुरू झालें तर ? अन्नधान्य-वस्त्र याब्यावतींत आपण राष्ट्रीय प्रमाणावर, कंबर कसून प्रयत्न केला तरच आम्ही स्वावलंबी होऊं शकूं. पण त्या दृष्टीनें आपण मुळींच प्रगति केलेली नाहीं.

अमेरिका व रशिया यांचा एक चहाता वर्ग आपल्या देशांत आहे. या दोन बलाढ्य देशांपैकीं कोण एकाचें मांडलीक बनावें व त्याच्या मदतीनें व आश्रयानें आपलें राष्ट्रीय धोरण ठरवावें असें मानणारे ऐतखाऊ सुखवस्तु किंवा परप्रत्ययनेय लोक आहेत. सुदैवानें पं. नेहरू जयप्रकाशजी व कृपलानीजी यांचें या प्रश्नावर मतैक्य आहे कीं आपण युद्धमान बड्या राष्ट्रांपासून झटकून अलग व तटस्थ राहिलें पाहिजे व आपली सर्व शक्ति पणाला लावून आपला देश सत्तेच्या जागतिक युद्धापासून अलग ठेवली पाहिजे. जागतिक युद्धांतून अलग राहावयाचें, तर आपल्या मूळ गरजा, बाबत तरी आपण स्वयंपूर्ण झालें पाहिजे. अद्यापही आपण परदेशावर जोंवर अवलंबून आहों तोंपर्यंत महायुद्धापासून आपल्याला अलिप्त राहतां येणार नाहीं. प्रत्येक तालुक्यामध्यें दोन किंवा तीन विभाग कल्पना सामुदायिक सहकारी शेती व खरेदीविक्रीचे प्रयत्न सुरू केली पाहिजे. धंदेशिक्षणासाठीं हस्तव्यवसाय सुरू केले पाहिजेत. नियोजन खालून ग्रामीण जनतेच्या सहकार्यानें झालें तरच तें परिणामकारक होईल.

म्हणजे योजनांपेक्षां योजकदृष्टि व संशोधनबुद्धि व उत्साह अधिक आवश्यक आहे. भारतामध्यें लोकशाही समाज आपल्याला निर्माण करावयाचा आहे. 'एक ना धड अन् भाराभर चिंध्या' असा हांवरेपणा किंवा उतावीळ न करतां अन्नधान्य, कापड व घरें या बाबतींत स्वयंपूर्ण होण्यासाठीं आपण आपली सर्वशक्ति एकवटली पाहिजे. या प्रयत्नांतूनच कदाचित् राष्ट्रामध्यें 'स्वधर्म' पाळण्याची श्रद्धा व कसोटी निर्माण होण्याची आशा आहे.

सॉक्रेटिस नेहमीं म्हणे कीं आचारापेक्षां विचारांचा गोंधळ भयावह आहे.

सध्यांसारख्या गोंधळलेल्या परिस्थितींत 'स्वतंत्र' विचार करणें फार कठीण झालें आहे. आपलीं मतें आपण आपल्या सवडीप्रमाणें बनवतों. भीति हीच मुख्य प्रेरक शक्ति बनली आहे. सर्व जगभर कमी अधिक प्रमाणांत अशीच परिस्थिति आहे. अणुशस्त्रें अधिकाधिक विध्वंसक बनत आहेत. पाश्चात्य यांत्रिक संस्कृति विनाश पत्करणार आहे, असें नव्हे किंतु युरोप-अमेरिका खंडांतील विचारवंत बोलत आहेत. तिसरें महायुद्ध अटळ आहे असें मानलें तर पाश्चिमात्य संस्कृतीचा विनाश अटळच आहे. जागतिक युद्ध परिस्थितीचा आपल्या देशावर अधिक परिणाम होत आहे. बाहेरच्या शक्ती पाश्चात्यांच्या पैसा खर्चून भारतामध्यें तळ निर्माण करण्याचा यत्न करीत आहेत.

दारिद्र्य निवारण करण्याच्या व शिक्षणाच्या थांबविण्याच्या योजनांना सर्वच पक्ष करतील. पण या योजनांच्या मागें लोकशाही वागत असेल व आपला देश महायुद्धापासून अलिप्त ठेवण्याचा निर्धार असेल म्हणजे खरी सत्याग्रही वृत्ति असेल तरच या प्रयत्नांना कांहीं यश येण्याचा संभव आहे.

आपल्या उज्ज्वल ध्येयांमुळें प्रांतीयता, जातीयता, विषमता दूर करण्यासाठीं झगडणारे सत्याग्रही वीर तुम्हांला हवे आहेत. ही आस्था आपल्या अंतःकरणामध्यें कशी निर्माण होईल अशी योजना लागली पाहिजे.

निवडणुकीच्या पळणीचा दुरुपयोग न करतां आपण जनतेला सर्व प्रश्न समजावून सांगितले पाहिजेत. आर्थिक दैनाई दूर करण्यासाठीं कोणती उपाययोजना आपण योजणार आहों तें समजावून सांगितलें पाहिजे. 'पी हळद अन् हो गोरी' असा झटपट रंगारी इलाज आपल्याजवळ नाहीं हें सर्व पक्षांनीं प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. 'जागा मिळविणें, हें निवडणुकीचें ध्येय न समजतां नागरिकांचे जागरणांत कुरूपे निर्माण करणें, सहकार्याची वृत्ति जागृत करणें, सामुदायिक कार्याची नवीन स्फूर्ति देणें, हें आपलें उद्दिष्ट असलें पाहिजे. स्त्रियांना मताचा अधिकार मिळालेला आहे. त्या मानानें स्त्री उमेदवार फार कमी आहेत. स्त्रियांमध्यें मतासंबंधीं कुतूहल व उत्साह निर्माण करण्याचा आपण खास यत्न केला पाहिजे. "आम्हांला एक तें हवें; स्वराज्यां अर्थानें." असें म्हणत ... तीं पाही ! ... मग— कीं ...

## येत्या निवडणुकींत

कि. म. प्रजापक्ष



अहो, धावता काय ! ही झोपडी मतदारांच्यासाठींच (भाड्यानें) देणें आहे !

...ाली खेडोपाडीं फिरणारे स्वयंसेवक, प्रत्येक गांवीं निर्माण झाले होते तसे नवीन समाजनिर्मितीचा संदेश गांवोगांव देणारे स्वयंसेवक जो उमेदवार व पक्ष अधिक प्रमाणांत निर्माण करील त्यानेंच निवडणूक जिंकली असें समजलें पाहिजे. समाजवादी पक्षाचे श्री. अशोक मेहता म्हणाले कीं "आम्ही दहा लाख स्वयंसेवकांचें सैन्य खडें करणार आहों. हे सैनिक घरोघर प्रचार करतील व मतांचें महत्त्व मतदारांना समजावून सांगतील." याच्या निम्मे जरी ते प्रत्यक्ष घाडूं शकले तरी थोडें थोडकें काम होणार नाहीं.

निवडणुका उच्च पातळीवरून व्हाव्या, लायक माणसें विधिमंडळांत जावीं, सार्वजनिक जीवनाचा दर्जा वाढावा असा प्रयत्न कॉंग्रेस संस्थेकडून केला जाईल, अशी पं. नेहरूंनीं कॉंग्रेसचीं सूत्रें हातीं घेतांच जीं पत्रकें काढलीं त्यांवरून आशा वाटत होती. व्यक्तिशः पं. नेहरू व समाजवादी पक्षाचे नेते तसा यत्न करतीलहि, पण निवडणूक म्हटली कीं थोडा अवास्तव अभिनिवेश येणारच.

भारतीय समाजांत खालवर पसरलेली आर्थिक व सांस्कृतिक विषमता नाहींशी केल्याशिवाय आपली लोकशाही सुस्थिर होणार नाहीं, सामान्य माणसाला लोकशाहीची कदर वाटणार नाहीं. ही विषमता कमी करण्यासाठीं सर्व प्रकारचें उत्पादन वाढविलें पाहिजे व समाजांतील सर्व वर्गांना समप्रमाणात आवश्यक वस्तू मिळतील अशी नियंत्रित विभाजनपद्धति जारी केली पाहिजे. समाजविद्रोही कृत्यें करण्याची लोभी लोकांची ताकद होणार नाहीं असें वातावरण निर्माण होईल तेव्हांच लांचलुचपत, काळाबाजार व असले असत्य प्रकार थांबतील. सरकारवर किंवा पक्षावर अवलंबून न राहातां आपण आपले प्रश्न स्वावलंबनानें व सहकार्यानें सोडविण्याचा यत्न केला पाहिजे. प्रत्येक मोहल्ल्यांत, वस्तींत, विभागींत सहकारी दुकानें, वाचनालयें, दवाखाने, करमणूक मंदिरें उघडलीं पाहिजेत. आपलें जीवन अत्यंत स्वयंकेंद्रित व एकाकी झालेलें आहे. शेजारधर्महि उरलेला नाहीं. दळण-वळण खऱ्या अर्थानें वाढवलें पाहिजे. अशी सामाजिक संघटनाच कदाचित् सामूहिक उत्साहाची लुप्त झालेली सरस्वती शोधून काढण्यास मदत करील. स्पर्धा किंवा हेवादावा न करतां निरपेक्षी असा जो आनंद नि सहानुभूति व माणुसकी असते ती थोडी अधिक दिसली तर सृजनशीलतेची झुळक कदाचित वाहूं लागेल.

मग माझं मन म्हणूं लागलं, हें यंत्राचं जीवन आतां असह्य झालं

# यंत्र

आज वासुदेवानं माणूस म्हणून जगायचं ठरविलं आणि त्या भावनेच्या आवेगांत तो घराबाहेर पडलाहि. पण—



वि. स. खांडेकर

घड्याळांत सहा ठोके पडले. मोठे गोड वाटले ते वासुदेवाला. त्यानें मान वर करून पाहिलें, हुश्श म्हणून भला मोठा सुस्कारा सोडला आणि हात वर करून अंगाला आळोखेपिळोखे दिले. कारकून ही ब्रह्मदेवाची मोठी विचित्र निर्मिती आहे. सकाळी सहापासून संध्याकाळी सहापर्यंत तो यंत्र असतो आणि संध्याकाळच्या सहापासून तों सकाळच्या सहापर्यंत तो मनुष्य बनतो, असें त्याचा एक विनोदी मित्र नेहमीं म्हणत असे, त्याची दररोज कचेरींतून बाहेर पडतांना वासुदेवाला आठवण होई. आजहि ती तशी झाली. तो स्वतःशींच हंसला. पण त्या हास्याचा क्षीणपणा त्याचा त्याला बोचला. त्यानें पुन्हा हंसण्याचा प्रयत्न केला. आतां बारा तास आपण माणूस म्हणून जगणार आहों या कल्पनेनें कचेरीच्या कामानें कोमेजून गेलेलें आपलें मन त्यानें किंचित् फुलविलें. उन्हानें गळून गेलेल्या फुलानें सावलीचें स्वागत करावें तशी त्यानें बाहेरच्या जगाकडे दृष्टि वळविली.

रस्त्याच्या एका बाजूनें चोंहीकडे भिरभिरी पहात तो चालला. दिवाळी जवळ आल्यानें लुगा दुकानादुकानांत दिसत होत्या, हंसत होत्या. त्या नटलेल्या सजलेल्या लहानमोठ्या वस्तू पाहून हळदीकुंकवाला निघालेल्या प्रमदांचा घोळका त्याच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. तो दचकला. अवखळपणानें रस्ता ओलांडूं पहाणाऱ्या मुलाचा हात धरून आईनें त्याला खसकन् मागें ओढावें तसें कांहीं तरी त्याला वाटलें. तो विचार करूं लागला. अलीअलीकडे अशा प्रकारच्या सुंदर नायकांविषयींच्या कल्पना आपल्या मनांत वारंवार कां येतात हें कोडें त्याचें त्यालाच उलगडेना. सिनेमा पहाण्याचा योग सटीसामासींच त्याला येई. तो पहातांना इंदिरा बरोबरहि असे. पण खुर्चीला खुर्ची लावून बसलेल्या नायकोची [illegible] न करतां त्याचे डोळे पडद्यावरल्या नटीचें लावण्य अधाशीपणानें न्याहाळीत. समोरच्या उत्तान दृश्यांनीं तो अतिशय अस्वस्थ होई. इतकेंच जवळ बसलेल्या नायकोकडे पाही आणि मग—

मग त्याला वाटे, दहा वर्षांपूर्वी आपण लट्टू होऊन पसंत केलेली हीच का ही इंदिरा ? हिनें कांहीं जादूटोणा तर केला नव्हता ना आपल्यावर तेव्हां ? त्या वेळीं आपल्याला भुलवेणारी हिच्या डोळ्यांतली ती मादक खोडकर चमक कुठें गेली ? या पृथ्वीवरल्या अप्सरेची दासी होण्याचीसुद्धां हिची लायकी नाहीं ! अशा या दासीबरोबर आपण गेलीं दहा वर्षे संसार करीत आहों —यापुढें जन्मभर करीत राहणार आहों ! यांत काय काव्य आहे, काय सुख आहे ! सौंदर्याशीं काडीचासुद्धां संबंध नसलेला आपला हा संसार—छे ! तो आपला विनोदी मित्र म्हणतो त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारकुनाचें आयुष्य हें यंत्र आहे हेंच खरें. अगदीं चोवीस तास तो यंत्रच असतो. कचेरींत जशी त्याला तींच तींच कंटाळवाणीं कामें करावीं लागतात, त्याप्रमाणें घरींहि त्याला त्याच फडतूस बायकोचा तोच कधीं उतरलेला, कधीं हिरमुसलेला असा चेहरा पहावा लागतो, मुलांचे तेच तेच—कधींहि न पुरवितां येण्याजोगे हट्ट कान किटेपर्यंत ऐकावे लागतात.

त्यांचें प्रेमसुद्धां यांत्रिक होतें. त्या घटका दोन घटकांतसुद्धां काव्याचा लवलेश नसतो ! रात्रीं दहा-अकरा वाजतां इंदिरेचीं कामें संपतात. थकून भागून ती आपल्या खोलींत येते. कितीहि लाडकेपणानें तिनें तोंडावरून हात फिरविला तरी तिच्या हाताचे ओरखडे आपल्याला तीव्रतेनें जाणवतात. करवतीच्या दांत्यासारखे ते आपल्याला भासतात. कधीं कधीं शेगड्या सारवून घाईघाईनें हात धुवून ती येते, आणि मग तिच्या हाताला येणारा तो शेणकाल्याचा पुसट घाणेरडा वास—कॉलेजमधें असतांना सदानंद आणि आपण शाकुंतल शिकत होतों. शकुंतलेच्या सौंदर्याविषयीं तास तास चर्चा करीत होतों. त्या दुष्यंताचा हेवा वाटे आपणा दोघांना ! कुठें ती आपल्या स्वप्नांतली शकुंतला आणि कुठें ही प्रत्यक्षांतली इंदिरा-

सदानंद पुढें एका पोरीच्या प्रेमांत पडला, तिनें त्याला फसविलें, तो कॉलेज सोडून लढाईवर गेला—लढाई संपल्यावर व्यापारांत पडला—मोठ्या मजेंत आहे तो मुंबईत—आणि आपण मात्र ? बी. ए. होऊन कारकून झालों. अगदीं रंभा समजून हें शेजारीं बसलेलें पात्र गळ्यांत बांधून घेतलें. आणि आतां हा संसाराचा घाणा ओढीत दिवस काढीत आहों. त्याच त्याच चकरा, तोच तोच चुना, तेच तेच चाबकाचे फटकारे—अवघीं पांच माणसें आपण, पण पगार पुरत नाहीं म्हणून दर महिन्याच्या पहिल्या तारखेला जीव रडकुंडीला येतो. ज्ञानेश्वरासारखे पूर्वीचे मोटमोठे लोक ब्रह्मचारी राहिले ते कांहीं उगीच नाहीं. ज्ञानेश्वराच्या मानानें रामदास थोडा कच्चा पण तोसुद्धां कांहीं अगदीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता. तो निदान बोहल्यावरून सुंबाल्या करून पळाला. आपण मात्र महामूर्ख—

"अहो मिस्टर, थोडे डोळे उघडून चला ना ? का दारूबिरू प्यालाय्—" तांबारलेले डोळे वटारून एक लॉरीचा ड्रायव्हर आपल्यावर खेंकसत आहे असें दिसतांच वासुदेव गोंधळला. आपण इंदिरेला घेऊन त्या फटाकड्या नटीचा चित्रपट पहात बसलों आहों कीं रस्त्याच्या एका कोंपऱ्यावरून वळत आहों, हेंच त्याला क्षणभर कळेना. त्याची ती भांबावलेली नजर पाहून गाडी वळवितां वळवितां चित्रपटांतल्या राक्षसासारखें हास्य करीत ड्रायव्हर उद्गारला, "मिस्टर, सध्यां दारूबंदी सुरू आहे म्हटलं !—"

वासुदेवाला त्या ड्रायव्हरचा असा राग आला—पण त्याची लॉरी धुळीचा लोट उडवीत केव्हांच दिसेनाशी झाली होती. तो स्वतःवरच चिडला. लगेच त्याला वाटलें, हल्लीं हे जे सुंदर नायकांविषयींचे विचार आपल्या मनांत येतात त्यांत आपला काय दोष आहे ? हा सारा अपराध इंदिरेचा आहे. तिला काव्य कळत नाहीं, सौंदर्य समजत नाहीं, प्रेम उमजत नाहीं. तिचे ते दहा वर्षांपूर्वीचें उन्मादक रूप आपल्याला अजून आठवतें. आणि दररोज आरशापुढें बसून एवढ्याशा केसांची घटका घटकाभर वेणी घालणाऱ्या इंदिरेला मात्र त्याचें विस्मरण होऊं नये ? स्वतःविषयीं माणसें इतकीं बेफिकीर होतात ?

अस्वस्थ मनःस्थितींतच तो घरीं आला. वीणा, लीना व मीना माजघरांत मोठमोठ्यानें भांडत होत्या. तो मुकाट्यानें आंत आला, कपडे काढून स्वयंपाकघराकडे वळला. दारांतच इंदिरा कांदे चिरीत बसली होती. तो दिसतांच ती झटकन् उठली. पेलाभर पाणी ओतून तिनें कपबशी शेगडीवर ठेवली. आतां कांद्याची फोडणी दिलेला चहा आपल्याला प्यावा लागणार, या विचारानें वासुदेव अधिकच चिडला. पाय धुवून तो माजघरांत येऊन बसला. तिन्ही मुली त्याच्याभोंवतीं गोळा झाल्या. गुळाला डोंगळे चिकटावेत तशा तिघींनीं त्याला मिठ्या मारल्या. क्षणभर त्याचें मन उल्हासलें. आपलें हें चिमुकलें घरटें—हीं चिवचिवणारीं चिमणीं पांखरें—हे हंसरे गोजिरवाणे चेहरे—घरांत कांहीं तरी विशेष सुख असतें असें त्याला क्षणभर वाटलें. पण पुढल्याच क्षणीं तीं पांखरें आपल्या जखमांवर चोंची मारीत आहेत असा भास त्याला झाला. तिघींनीं एकदम मागण्या करायला सुरुवात केली. जणुं कांहीं त्या त्याचा लिलांव पुकारीत होत्या. प्रत्येकजण मोठमोठ्यानें पुनःपुन्हा ओरडत होती, 'भाऊ, मला दिवाळीला अॅयरनबॉम्ब हवेत !' 'भाऊ, मला फटाक्यांच्या लडी हव्यात.' 'भाऊ, मला मोठी मोठी बाहुली हवी !' मिनीच्या मधूनच येणाऱ्या एखाद्या बोबड्या शब्दाची वासुदेवाला एरवीं

मोठी गंमत वाटे. कधीं कधीं तो एकटा असला म्हणजे सुद्धां तिला भलभलतीं उत्तरें देत बसे. पण आतां मात्र वीणा आणि लीला यांच्याइतकाच तिचाहि राग आला त्याला. तो मनांत म्हणत होता, 'हीं सारीं पंचांगं जाळून टाकलीं पाहिजेत. यंदां दिवाळी भलत्याच वेळेला छापली आहे त्यांनीं! आज वीस तारीख. आपल्या खिशांत पुरे दहापंधरा रुपयेसुद्धां नाहींत. अशा वेळीं दिवाळी आली तर—दिवाळी कसली ! शिमगाच—

इंदिरा चहाचा पेला घेऊन आली. तिनें आपल्याकडे पहावें आणि हंसावें—ग्रामीण चित्रपटांत न्याहारी घेऊन शेतावर जाणारी नायिका हंसते ना, तसें हंसावें—असें कांहीं तरी वासुदेवाच्या मनांत येऊन गेलें. त्यानें तिच्याकडे त्या अपेक्षेनें पाहिलें. तो अधिकच उद्विग्न झाला. इंदिरेचा चेहरा अगदीं कळकट दिसत होता. कांदे चिरतांना गालावर ओघळलेलें पाणी सुद्धां पुसलें नव्हतें तिनें ! चहाचा पेला त्याच्या हातांत देत रुक्ष स्वरानें ती म्हणाली, "या तिघींना फ्रॉक तरी करायला हवेत दिवाळीला. दुसरं कांहीं नाहीं तर नाहीं. निदान फ्रॉक — वीस रुपये लागतील—'

वासुदेवाला वाटलें, हा पेला असा भिरकावून द्यावा, त्यांतला सारा उनउनीत चहा इंदिरेच्या तोंडावर सांडावा, आपण रागारागानें उठावें आणि तिचे खांदे गदगदां हलवून तिला विचारावें, 'माझ्या खिशांत काय सोन्याची खाण लागलीय होय?"

चहाचे दोन घोट कसेबसे गिळून त्यानें वर पाहिलें. इंदिरा तिथें नव्हती. तो पुन्हा पेला तोंडाला लावणार इतक्यांत स्वयंपाकघरांतून हातांत एक कागद घेऊन ती आली. वासुदेव चमकला. कसलें तरी बिल—

इंदिरा कागद पुढें करीत रुक्ष स्वरानें उद्गारली, "तार आहे!"

"तार?"

हिची आई आजारी होती, ती मेलीबेली तर नाहीं ना? आतां मुलांसकट हिला माहेरीं पाठवायचे म्हणजे निदान पन्नास रुपये...

तार वाचीत तो उद्गारला, "सदानंद येतोय् आठच्या गाडीनं. स्टेशनवर बोलावलंय्" त्यानं! आपल्याकडे उतरला तर—त्याची सरबराई कशी करायची? "लक्षाधीश झालाय् बेटा आतां!"

इंदिरा स्वतःशींच पुटपुटली, 'आतां कसले फ्रॉक् होताहेत डोंबलाचे!'

वासुदेवाला तें पुटपुटणें ऐकूं आलें. ती बोलली त्यांतलें एक अक्षरसुद्धां खोटें नव्हतें. सदानंदासारख्या श्रीमंत झालेल्या जुन्या दोस्ताची उठाबस करायची म्हटलें तर सहज पांच-पंचवीस रुपयांचा खार—

पण इंदिरा बोलली तें खरें असूनसुद्धां त्याला तिचा राग आला होता. नटून थटून सुंदर दिसणारी इंदिरा लाडालाडानें हें कुजबुजली असती तर आपल्या जुन्या मित्राविषयींची तिची ही उपेक्षावृत्ति आपण कदाचित् सहन केली असती. पण या कळकट चेहऱ्याच्या, निस्तेज डोळ्यांच्या आणि कर्कश आवाजाच्या बाईनें आपल्या जीवश्चकंठश्च मित्रावर असें तोंडसुख घ्यावें—अशी कोण लागून गेलीय् ही? हिचें हें बोलणें आपण मुकाट्यानें ऐकून घेतलें तर तो आल्यावर त्याचा अपमान करायलासुद्धां कमी करणार नाहीं ही!

आपण काय बोलत आहों हें कळायच्या आधींच त्याच्या तोंडून शब्द निघून गेले, "कुणी सांगितलं होतं तुला माझ्यासारख्या भिकारड्या कारकुनाबरोबर लग्न करायला? एखादा चांगला लक्षाधीश गांठायचा होतास—"

इंदिरा त्याच्याकडे टकमक पहातच राहिली. तो असें वेड्यासारखें कां बोलत आहे हें तिला कळेना.



## तिचें दुभंगे अखेर अंतर

दगड काढले खाणींतुन नर
रचिलें मंदिर—इमले भरभर
राजधानिचा दिमाख देखा
मिनारेंही चुंबितात अंबर

खडेहि खाणींमधें गवसले
द्युतीस त्यांच्या तारे दिपले
मनुजाची किती हाव अनावर
रणांगणीं दळभार भडकले

विजयी वांछी ते नजराणे
नटल्या रमणी नटले राणे
मंदिर मत्त थैमान तयांचें
त्रिभुवन तेणें अखिल दणाणे

करील धरणी सहन कोठवर ?
तिच्या कुशींचे कलिजे हे तर
तिच्यापासुनी हिरून घेतां
आणि नाचतां तिच्या उरावर ?

असो कोळसा किंवा गंधक
असो दगड वा हिरा नि माणिक
मँगॅनीज असो वा सैंधव
जननीला प्रिय सकल अमोलिक

शोक वेव्हल कांपे थरथरें
तिचें दुभंगे अखेर अंतर
गडप भराभर कुशींत होती
इमले, शहरें, मिनार,—डोंगर !

—यशवन्त

स्टेशनावर जातांना ब्रोंकसप्रमाणें खांद्यावर मीन टकून पडलेली मिनी पोपटासारखी बोलत होती, "आतां जे पाहुणे येणार आहेत त्यांना काका म्हणायचें कीं मामी म्हणायचें? त्यांच्या बायकोचें नांव काय? ती त्यांच्याबरोबर येणार आहे कीं नाहीं? त्यांना किती मुलं आहेत? ते दांत राखुंडीनं घांसतात कीं ब्रशानं..." तिला उत्तरें देतां देतां वासुदेवाची पुरेवाट झाली. एरवीं तिच्या असल्या किलबिलीचें त्याला कौतुक वाटे पण आतां त्याचें मन राहून राहून इंदिरेशीं उडालेल्या खटक्याचा विचार करीत होतें. मनांत त्याला वाटे, गाडीला अजून वेळ आहे, आपण असेंच परत फिरावें, घरीं जाऊन इंदिरेला क्षणभर एकांतांत गांठावें, आवेगानें तिचें दीर्घ दीर्घ चुंबन घ्यावें आणि म्हणावें—पुढें कांहीं म्हणायला कशाला हवें? इंदिरा खुदकन् हसेल. हा कांहीं तिचा आणि आपला पहिला खटका नाहीं—लग्न झाल्यापासून आपण भांडतच आहोंत. तो आपला विनोदी मित्र म्हणतो ना प्रीति आणि कलह हीं जुळीं भावंडें आहेत—पण पूर्वीं आपला खटका झाला कीं दुधांत साखर पडल्यासारखं वाटे. हल्लीं आपलें भांडण रोज रोज होतें आणि प्रत्येक वेळीं आपल्याला वाटतें—अगदीं दुधांत मीठ पडल्यासारखें वाटतें—काय झालेय् असें आपल्याला अलीकडे? आपली प्रकृति बरी नाहीं? छे! मग तो आपल्यांतला पूर्वींचा वासुदेव—क्षणांत इंदिरेबरोबर भांडणारा आणि दुसऱ्याच क्षणीं स्वयंपाक-घरांत जाऊन तिच्याभोंवती घुटमळणारा वासुदेव—कुठें आहे?

काळजांत खोल खोल कुठें तरी एक तार कंपित झाली. तिचे अस्फुट स्वर वासुदेवाच्या कानांत गुणगुणले. तो आतां एका कोंपऱ्याशीं आला होता. मनाचा निश्चय करून घरीं जाण्याकरितां तो परत वळला. इतक्यांत याचें लक्ष कोंपऱ्यावरल्या चित्रपटाच्या पोस्टरकडे गेलें. मोठी नाजुक, मोहक रमणी होती ती. तिचा पदर मागें ढळला होता. विरल पांढऱ्या ढगांतून चंद्रबिंब दिसावें तसा तिचा एक स्तन—वासुदेव जागच्या जागीं खिळला. त्या सुंदरीच्या डोळ्यांतली ती खोडकर चमक—ती पाहतां पाहतां वासुदेवाला मोठा विचित्र भास झाला—मध्यरात्र झाली आहे, आपण आणि ती सुंदर स्त्री अशीं दोघंच फक्त या चौकांत उभीं आहोंत. ती चित्रांतून हळूच खालीं उतरत आहे, आपल्या केंसांतून रातराणीचीं फुलें उधळीत आपल्या कुशींत मस्तक घुसळीत आहे आणि आपल्याला म्हणत आहे, 'माझ्या राजा, आपण दूर दूर कुठं तरी जाऊं—समुद्रांतल्या एका बेटांत—जिथें हिरेमाणकांची झाडं आहेत—'

आगगाडीची कर्कश शिटी दुरून ऐकूं आली. आगगाडी—या गाडींतून आपण या सुंदरीसह दूर दूर जाणार आहों? छे! या गाडीनें सदानंद येणार आहे...

●

——सदानंद पहिल्या वर्गांतून उतरतांच मीनीनें 'काका, काका!' म्हणून त्याला दोनतीन लाडिक हांका मारल्या. त्यानें तिच्याकडे वळून पाहिलें, लगेच तिनें बापाच्या कुशींत आपलें मुख लपविलें. सदानंद हमालाला कांहीं तरी सांगूं लागला. लगेच मीनानें आपलें तोंड वळविलें आणि ती पुन्हा किलबिलली 'काका, काका!' सदानंदानें वळून पाहिलें. ती मिस्किलपणानें हंसत होती. त्यानें तिला वासुदेवाच्या कडेवरून उचलण्याचा प्रयत्न केला, तिनें क्षणभर आढेवेढे घेतले, दुसऱ्याच क्षणीं ती त्याला अशी बिलगली—

हातगाड्यावर टाकलेलें सामान बाहेर यायला थोडा वेळ लागला. पण तेवढ्या वेळांत मिनीची सदानंदाशीं अगदीं गट्टी जमली. तो वासुदेवाला

म्हणालासुद्धां, " मला मिशा नाहींत म्हणून बरं. नाहीं तर तुझ्यासारखी पोरीनं एव्हांना तें जंगल उपटून टाकलं असतं ! "

सदानंदानें भलतें भाडें कबूल करून तब्बल तीन दिवसांकरितां नवी चकचकीत सुंदर गाडी ठरविलेली पाहून वासुदेव थक्कच झाला. त्याला राहवेना. तो म्हणाला, " इतकीं वर्षं लढाईवर होतास तरी तुझी मोटारीची हौस अजून फिटलेली दिसत नाहीं ! "

त्याच्याकडे मिस्किलपणानें पहात आणि त्याच्या पाठीवर थाप मारीत सदानंद म्हणाला, " लेका वास्या, तुझा अगदीं कारकुंड्या झालेला दिसतोय्. थांब हं, कारकुनाचा कवि कसा करायचा हें मीच सांगतों इंदिरावहिनीला ! लेका तुझ्या या भिकार गांवांत मी आलोंय् तों मोटार उडवायला नाहीं, मजा करायला ! "

" मजा ? " वासुदेवाच्या तोंडून नकळत उद्गार निघाला.

" मजा शब्दाचा अर्थ प्रत्येकीच्या कोशांत निराळा असतो हें विसरूं नकोस, लेका. माझी मजा म्हणजे छोकरी— एका छोकरीसाठीं आलोंय् मी. "

सदानंदाच्या खांद्यावर मस्तक ठेवून हें अभावित कौतुकानें ऐकत असलेली मिनी एकदम त्याच्या मिठीतून वासुदेवाला म्हणाली, " भाऊ, काका कुणा तुमच्यासाठीं आले नाहींत ते माझ्यासाठीं— होय ना हो, काका ? भाऊ मला छोकरीच म्हणतात ! "

तिला काय उत्तर द्यावें तें सदानंदाला कळेना. त्यानें तिचा एक पटापट मुका घेतला आणि तो म्हणाला, " लहान मुलींनीं बाहुलीशीं खेळावं ! मोठ्या माणसांच्या गोष्टींत— "

चिमुकल्या हातांनीं त्याचें तोंड आपल्याकडे वळवून मिनी मधेंच म्हणाली, " पण भाऊ बाहुलीच देत नाहींत मला ! मला मोठी मोठी बाहुली— "

गाडींत बसतां बसतां सदानंद ड्रायव्हरला म्हणाला, " खेळण्याच्या दुकानाकडे गाडी घे आधीं. "

गेल्या [illegible]कीत सोशालिस्ट



वस्त्रें का मतें ?

गांवांतल्या सर्वांत मोठ्या खेळण्यांच्या दुकानापुढें गाडी उभी राहिली. सदानन्द मीनाला घेऊन उतरला. गाडीच्या मागें बांधलेल्या नाटाळ गुराप्रमाणें वासुदेव त्यांच्या मागून मुकाट्यानें आंत गेला, एका कोपऱ्यांत उभा राहिला. मिनीनें आपल्याएवढी एक मोठी बाहुली पसंत केली. सदानंदानें ती तिला घेऊन दिली. एखादी चिठ्ठीचपाटी खिशांतून काढावी त्याप्रमाणें एक हिरवी नोट काढून त्यानें ती काउंटरवर फेंकली. काचेवर पडलेली ती हिरवी नोट विजेच्या प्रकाशांत मोठी विचित्र भासली वासुदेवाला. ऊन खिडकींतून येऊन पडलेलें हिरव्या ठिपक्यांचें जिवाणूं—

मिनी खेळण्यामागून खेळणें मागूं लागली. सदानंद तीं घेऊं लागला. आपण पुढें व्हावें आणि मिनीच्या मुस्कटांत मारून तिला दुकानाबाहेर फरफटत ओढीत न्यावें असें वासुदेवाच्या मनात आलें. पण तो जागेवरून हलला नाहीं. त्यानें आपलें तोंड उघडलें नाहीं. रंगीबेरंगी, भारी किंमतीच्या खेळण्यांनीं नटलेलें तें दुकान एखाद्या परीच्या राजवाड्यासारखें भासत होतें. गिऱ्हाईकें एकसारखीं आंत येत होतीं, बाहेर जात होतीं. त्या गिऱ्हाइकांतल्या नट्टापट्टा केलेल्या बायकांकडे तो नुसता टकमक पाहत होता. ही त्या डॉक्टराची बायको—इंदिरेच्याच वयाची आहे. पण—या डॉक्टरनें एका केमिस्टाशीं संगनमत करून त्याच्या दुकानांत पडून राहिलेला हजारों रुपयांचा माल खपवायला त्याला मदत केली. आणि—ही त्या कापड-दुकानदाराची बायको—गतवर्षी लाखाचा काळाबाजार केला हिच्या नवऱ्यानें—कशी नटली आहे पहा छबकडी...

दुकानांत येणाऱ्या नटव्या श्रीमंत बायकांकडे पाहतां पाहतां वासुदेवाच्या मनांत मोठी विचित्र कल्पना येऊन गेली. त्याला वाटलें, एकदम दुकानांतले दिवे जावेत, घाबरून या साऱ्या बायकांनीं धांवायला सुरुवात करावी, त्यांतली एक—एक अतिशय सुंदर—अगदीं अप्सरा असलेली—आपल्या गळ्यांत येऊन पडावी, आपण तिचें मस्तक थोपटीत म्हणावें, 'भिऊं नकोस, भिऊं नकोस, मी आहें ना? मी—छे! तसें काय म्हणून म्हणायचें! ती आपल्याला बिलगतांच आपण खिशांतून चाकू काढावा, तिचे नाककान कापून टाकावेत आणि मग लक्ष्मणानें शूर्पणखेचे कापले तसे...'

एखादी [illegible] वेल फुलांनीं डंवरून जावी त्याप्रमाणें खेळण्यांनीं [illegible]लेली मीना वासुदेवाजवळ आली. तिच्या मागोमाग सदानंद आला आणि त्याला हलवीत हलकेंच म्हणाला, "या बायकांकडे काय बघत बसला-हेस वेड्या? रात्रीं तुला अशी अप्सरा दाखवितों—!"

एखाद्या भ्रमिष्टाप्रमाणें आपल्या तंद्रींत वासुदेव सदानंदाच्या मागून त्या बादशाही हॉटेलच्या पायऱ्या उतरूं लागला.

तें झगमगणारें, खिदळणारें, लकाकणारें, तिरप्या नेत्रकटाक्षांनीं पाहणारें खेळण्यांचें दुकान आणि तें आपलें निस्तेज दरिद्री घर!—मिनीनें हट्ट धरला म्हणूनच सदानंद त्या दुकानांतून प्रथम आपल्या घरीं आला, मिनी फार आवडलेली दिसतेय त्याला. तुझी नटलेली बाहुली पहायला मी रात्रीं परत येणार आहें म्हणून तो तिला सांगून आला आहे. इंदिरेनें चहाबरोबर पोहे केले होते [illegible], पण कुठें ते इंदिरेनें केलेले बीतड पोहे—या गांवांत आपण इतकीं वर्षें आहों. जातां येतां या हॉटेलाची पाटी तेवढी वाचीत होतों आपण—सदानंदानें आग्रह करून आपल्याला आणलें म्हणून. इंदिरेबरोबरच्या या भिकार संसारांत कधीं आपल्या डोळ्यांची तृप्ति झाली नाहीं, कधीं कानांची [illegible] किंवा कर्कशपणानें ओरडत असते ती जेवतांना मुलांवर. वाढावें कसें हें शिकायला या हॉटेलांतल्या वेटरच्या हाताखालीं चार दिवस तिला ठेवायला हवी. तो वेटर मघाशीं किती अदबीनें सदानंदाशीं बोलत होता. त्याचें बोलणेंसुद्धां किती नाजुक होतें. चित्रपटांत नायिका नायकाच्या कानांत कुजबुजते ना? अगदीं तसें—छे! इंदिरेबरोबर दहा वर्षें संसार केला आपण, पण एखाद्या यंत्रासारखा. त्यांत काव्य नाहीं, भावना नाहीं, सौंदर्य नाहीं—तेच तेच फेरे—त्याच त्याच क्रिया—

खर्रर्रर्र आवाज करीत मोटार थांबली, त्या आवाजानें वासुदेव आपल्या तंद्रींतून जागा झाला. मोटार गांवाबाहेरच्या एका टुमदार बंगल्यापुढें उभी राहिली होती. झगझगीत प्रकाशामुळें वरचा दिवाणखाना जणुं कांहीं मुक्त हास्य करीत आहे असें भासत होतें. त्याच्या खिडकीखिडकींतून येणारा विद्युत्प्रकाश बागेंतल्या फुलांवर बागडत होता, कारंजाच्या तुषारांना कुरवाळीत होता. वासुदेव सदानंदामागून जिन्याच्या पायऱ्या चढून वर गेला तरी त्याच्या डोळ्यांपुढें तें सुंदर कारंजें नाचतच होतें. दिवाणखान्यांत पाऊल टाकल्यावरसुद्धां त्याचा तो भास क्षणभर कायम राहिला.

छे! तें कारंजें नव्हतें. ज्या छोकरीसाठीं सदानंद मुंबईहून धांवत आला होता, जिच्यासाठीं तो पाण्यासारखा पैसा खर्च करीत होता, ती लावण्यवती नर्तिकेच्या वेषांत उभी आहे हें आतां कुठें त्याच्या लक्षांत आलें.

तिचें नृत्य सुरू झालें. ती नृत्यनिपुण आहे हें तिच्या प्रत्येक पदक्षेपावरून दिसून येत होतें. पण वासुदेवाचें मन त्या नृत्यांत रमेना. तो पुनः पुन्हा तिच्याकडे पहात होता—अगदीं अधाशीपणानें—पुनः पुन्हा तिची इंदिरेशीं तुलना करीत होता!

त्याची अतृप्तीची जाणीव त्या नर्तिकेच्या प्रत्येक पदक्षेपाबरोबर, अंगविक्षेपाबरोबर वाढूं लागली. नाहीं नाहीं त्या कल्पना त्याच्या मनांत येऊं लागल्या. आपण तलम रेशमी वस्त्र झालों असतों तर समोरच्या या परीच्या स्पर्शसुखाचा आनंद आपल्याला मनमुराद लुटतां आला असता! आपण—

निग्रहानें त्यानें तिच्यावर खिळून राहिलेली आपली नजर दुसरीकडे वळविली. दिवाणखान्याच्या आंतल्या खोलीचें दार अर्धवट उघडें होतें. त्यांतून त्या खोलीचा शृंगार त्याला दिसूं लागला. तो अधिकच अस्वस्थ झाला. पलंगाच्या मच्छरदाणीचा एक कोंपराच त्याला दिसत होता. ती मच्छरदाणी किती नाजुक आणि मोहक दिसत होती. अगदीं थेट आपल्या मालकिणीसारखी!

आतां त्याची नजर त्या पलंगावर खिळली. मघाशीं जेवतांना सदानंद त्याला ज्या गंमती सांगत होता, त्या साऱ्या त्याच्या डोळ्यांपुढें उभ्या

THE BIG SIX

Unity is strength at all times and in all spheres of activity. When a group or combine of textile mills pools resources, technical knowledge and skill, experience, and productive potentialities with the end in view of manufacturing only the best, then it can be taken for granted that every standard, however exacting, by which one judges the quality and finish of textiles, is not merely approximated, but fully attained.

The Big Six group of mills has, steadily and assiduously over a period of years built up a reputation, born of the will to produce only the best, and this fixed and settled policy to produce only woven material of the highest quality will never be deviated from.

The Big Six is India's largest group of textile mills. It is equipped with 2,40,482 spindles, 6,637 looms and employs about 10,000 workers. The annual output of cloth is expected to reach the figure of 80,000 miles, more than three times the girth of the earth. Does this not convey in a striking manner the vastness, in conception and execution, of the whole scheme to play a contributory part in meeting the cloth requirements of the country? Correspondingly great is the will to ensure that every yard of cloth will stand up to the severest test for quality, durability and finish, and, as technical knowledge in the improvement of woven materials advances apace, so will these be progressively bettered for the benefit of the public.




THE INDIA UNITED MILLS LTD.

**INDIA'S LARGEST TEXTILE GROUP**

**2,40,482 Spindles & 6,637 looms**

**AGENTS: MESSRS. AGARWAL & CO.**

**Indu House, Dougall Rd., Ballard Estate, Bombay 1**

INDU-51 (2)

राहिल्या. पहिल्यांदां लढाईत्ता व मग व्यापाराच्या निमित्तानें सदानंद खूप खूप फिरला होता. प्रत्येक गांवीं त्याला सुंदर बाई मिळाली होती. त्यांच्यापैकीं कित्येकांचे चेहरेसुद्धां त्याला आंतां आठवत नव्हते. त्याचें आयुष्य मजेत चाललें होतें. पाठीमागें कसलाहि पाश नाहीं, कुणाची काळजी नाहीं, पैसा मिळवावा, उधळावा, एखाद्या गांवीं चांगली छोकरी दिसली कीं तिथें चार दिवस मुक्काम ठोकावा...

अर्धवट उघड्या दारांतून दिसणाऱ्या त्या पलंगावर सदानद बसला आहे, लाजत लाजत पुढें येणाऱ्या त्या लावण्यवतीला ओढून जवळ घेत आहे...

तो भास आहे हें कळत असूनहि वासुदेवाला तें दृश्य पहावेना. तो ताडकन् उठला.

नृत्य पहाण्यांत तल्लीन होऊन गेलेल्या सदानंदानें विचारलें, "कंटाळलास वाटतं? गाडी वरी सोडून येईल तुला."

घर–इंदिरा !—

जिन्याची पहिली पायरी उतरतांना वासुदेवानें वळून पाहिलें. ती लावण्यवती हंसत हंसत—

जड पावलांनीं तो खालीं आला.

घरापाशीं गाडींतून उतरेपर्यंत तिचें तें हास्य त्याच्या डोळ्यांपुढें नाचत होतें. त्या धुंदींतच तो घरांत आला. दार उघडणाऱ्या इंदिरेकडे त्यानें ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं.

तो अंथरुणावर जाऊन पडणार इतक्यांत त्याला कुणाचा तरी हुंदका ऐकूं आला ! मिनी–मिनीच रडत असावी !

"मिनी अजून जागी आहे ?" त्यानें रुक्ष स्वरानें विचारलें.

"काका माझी बाहुली घ्यायला येणार आहेत म्हणून जागत बसली होती. किती समजूत घातली तरी ऐकेना. दोन चापट्या दिल्या तेव्हां गप्प झोंपली. झोंपेंत मुसमुसतेय ती !"

वासुदेव तिच्या अंगावर ओरडून म्हणाला, "मिनीला मारलंस तूं ? आई आहेस कीं राक्षसीण आहेस ?"

इंदिरा रागानें म्हणाली, "ती जागी राहिली असती तर तुम्ही आल्यावर कीकांनीं घेऊन या म्हणून तुमच्यामागं लागली असती ! त्या छंदीफंदी काकांना शोधायला तुम्ही कुठं जाणार या वेळीं ? तुमची झोंपमोड होऊं नये म्हणून मी तिला—पण म्हणतात ना ! ज्याचं करावं बरं—"

"ठाऊक आहे काय काय बरं केलंयस तूं माझं तें ! आला दिवस हा घाणा ओढतें..."

"तुम्ही एकटेच ओढत असाल अगदीं—"

वासुदेवाचा राग अनावर झाला. तिच्याजवळ जाऊन तिचे खांदे गदगदां हलवीत तो म्हणाला, "उलट बोलतेस ? नवऱ्याला उलट बोलतेस ? एक शब्द काढ पुढें कीं तुझं मुस्कट—"

त्याच्या हातांतून आपले खांदे सोडवून घेऊन इंदिरा त्याच्या डोळ्याला डोळा भिडवीत उद्गारली, "फोडा—खुशाल फोडा. तेवढेच सोहाळे राहिले आहेत आतां !"

वासुदेव झटकन् मागें झाला आणि आपल्या स्वराला उपहासाचें विष माखीत उद्गारला "तुझ्या मुस्कटांत मारायला सुद्धां कुणी तयार होणार नाहीं ! जरा आरशापुढं जाऊन उभी रहा नि बघ आपलं तोंड कसं दिसतंय तें !"

दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेऊन इंदिरा एकदम स्फुंदूं लागली. वासुदेव अधिकच संतापला. त्यानें रागारागानें खोलींतल्या प्रत्येक गोष्टीकडे पाहिलें. या असल्या दरिद्री खोलींत या कुरूप बाईबरोबर आपण वर्षानुवर्षें कसे रहात आलों याचें त्याला आश्चर्य वाटूं लागलें.

इंदिरेचे हुंदके वाढतच होते.

त्या बंगल्यांतला तो सुंदर पलंग त्याच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. ती लावण्यवती तरुणी—या क्षणीं सदानंद तिला जवळ घेऊन तिच्याशीं हास्यविनोद करीत बसला असेल आणि आपण इथें इंदिरेचें हें रडगाणें ऐकत—

तो इंदिरेच्या अंगावर ओरडून म्हणाला, "गप्प बसतेस कीं नाहीं ?"

इंदिरा अधिकच स्फुंदूं लागली.

तो ओरडून म्हणाला, "बैस रडत. हा मी चाललों बाहेर. दहा रुपये आहेत माझ्या खिशांत. रात्रभर कुठंहि मजा करीन मी. मी वेडा म्हणून तुझ्या नादाला लागलों. आजपर्यंत एखाद्या यंत्रासारखा जगलों. झाला तेवढा मूर्खपणा बस्स् झाला—आतां—आतां मनुष्य होणार आहें मी !"

इंदिरेनें मान वर करून पाहिलें. वासुदेव खरोखरच तावातावानें बाहेर जात होता. अंगांत कोट चढवीत होता. ती लगबगीनें त्याच्याजवळ गेली. तिनें त्याच्या हातांतून कोट काढून घेण्याचा प्रयत्न केला. तिला दूर ढकलीत तो म्हणाला, "तुझा माझा यापुढं कांहीं संबंध नाहीं. मी स्वतःचा मालक आहें. मी हवा तसा वागेन, हवं तें करीन. हवी ती बाई—"

(पान १५१ पहा.)













अनुक्रमणिका

प्रेमानें, लोभानें, अपार आसक्तीनें तो तिच्याकडे पहांत राहिला

# इंगोंका



पु. भा. भावे

कांहीं काळ एकमेकांच्या आतुर डोळ्यांत
तीं दोघें पहातच राहिलीं. आणि मग
एका अनावर आवेगानें
तो उद्गारला—!

रेखानें चहाचें तबक मेजावर ठेवलें व पलंगाकडे पाहिलें. रात्रींच्याच सुरांत अद्याप मधुकर तेथें घोरत पडला होता.

"मधू" तिनें हांक मारली. त्यानें कूस पालटली व वेगळ्या पट्टींत तो घोरूं लागला. त्याला हलवून जागें करण्याचा विचार रेखेच्या मनांत येण्यापूर्वीच नाहींसा झाला. घामानें त्याचें केसाळ शरीर भिजून गेलें होतें.

"मधू!" थोड्या चढ्या सुरांत तिनें पुन्हा हांक मारली. मधूनें तंगडी चाळवली. रेखेचा हात नीटसा पुढें होण्यापूर्वीच मागें झाला. मधुकराचा पायजमा मळलेला होता. दाढी वाढलेली होती व त्याचा धष्टपुष्ट देह तिला ह्या क्षणीं अतिशय अनाकर्षक वाटत होता. तीन वर्षांपूर्वीच तिनें प्रोफेसर मधुकरशीं प्रेमलग्न केलें होतें व सहा महिन्यांपर्यंत त्याचा तो सुदृढ सांवळा देह तिला हवाहवासा वाटत असे. परंतु प्रेमाचीं दोन वर्षें व लग्नाचीं तीन वर्षें तिला जें कधीं वाटलें नाहीं तें आतां तिला वाटूं लागलें होतें. मधूच्या शरीराला तिच्यानें स्पर्श करवेना. तिनें 'टाइमपीस' उचलून कळ फिरवली व मधूच्या कानाशीं ठणठण करणारी घड्याळघंटा धरली. विंचू डसल्यासारखा ताडकन् मधू उठून बसला.

"हलो!" तो चिडक्या स्वरांत म्हणाला.

"चहा." ती म्हणाली.

"पण तूं माझ्या कपाळाशीं अलार्म कां वाजवलास?" चहाचा घोट घेत त्यानें विचारलें.

"नुसत्या हांकांनीं तुला जागच येईना. मग काय करूं?" रेखा म्हणाली.

"तर मग काय घड्याळाचा आवाज तुझ्या आवाजापेक्षांसुद्धां बिघडला म्हणतेस?" मधू दाढी खाजवीत म्हणाला.

रेखा दचकली. तिच्या जाड आवाजाचा असा उल्लेख त्यानें कधीं केला नव्हता. रेखा सडपातळ होती, गोरीगोमटी होती. पण तिचा आवाज जाड होता. त्या आवाजाचा लाडानें मधू कधीं तरी उल्लेख करीत असे. पण आज त्याचा सूर टोमणा मारण्याचा होता.

"तुझ्या घोरण्यापेक्षांसुद्धां माझं बोलणं जास्त बेसूर आहे का रे?" रेखेनें परतफेड केली. आतां मधू दचकला. त्याच्या घोरण्याचा असा उल्लेख रेखेनें पूर्वी कधीं केला नव्हता. त्याच्या दोषांवरसुद्धां तिनें प्रेम केलें होतें.

"जाऊं दे झालं!" मधू म्हणाला, आणि त्यानें जांभया देत चुटक्या वाजविल्या. मग तो वर्तमानपत्र वाचूं लागला. पूर्वी तो असें कधीं करीत नसे. उठल्याबरोबर तो तिला जवळ घेई—खरें सांगायचें म्हणजे दिवसभर तीं एकमेकाला चिकटून असत. त्यांच्या लगट करीत राहणाऱ्या प्रेमाला लोक हंसतसुद्धां. काल रात्रीचेंच पहाना! कांहीं वेळ तो तिच्याजवळ आला, व मग पुढें उकडण्याचें निमित्त करीत दुसऱ्या पलंगावर जाऊन झोंपला. तसेंच म्हणाल तर मधूच्या तोंडाला सिगरेटची घाण येत होती. त्याचें अंग केसाळ होतें व घामानें निथळत होतें. सायंकाळीं स्नान करून अंगाला पावडर लावणें त्यानें अलीकडे सोडून दिलें होतें. त्यामुळें त्याच्या शरीराला एक प्रकारचा दर्प येत असे. ह्या गोष्टीची पूर्वी रेखेला जाणीवहि होत नसे. काल ती जाणीव तिला झाली होती. आणि तरी तिनें सारें सहन केलें होतें. वास्तविक त्याचा तो स्पर्श तिला अगदीं नकोसा वाटत होता. आणि त्यालाहि तिच्या स्पर्शाची आतां तितकीशी ओढ वाटत नसावी. म्हणूनच उकडण्याचें निमित्त करून काल तो तिच्यापासून दूर गेला. हें एका परीनें रेखेला बरेंच वाटलें व दुसऱ्या परीनें तो तिचा अपमान होता. खरोखरच मधू पालटत होता. जातीपातीचीं बंधनें तोडून तिच्याशीं प्रेमलग्न करणारा मधू पालटूं लागला होता.

रेखेनें कप मेजावर ठेवला व मधू कितीसा पालटत आहे हें पहाण्यासाठींच जणूं दृष्टि वर उचलली.

"मधू" ती म्हणाली.

"अं" वर्तमानपत्रांत खुपसलेलें डोकें वर न उचलतां तो म्हणाला.

"जरा दाढी करून टाक ना! दोन दिवसांत केली नाहींस."

"पाहूं." मधू म्हणाला.

"आणखी तो पायजमा पालट. फार मळला आहे."

"हूं."

"दुसऱ्यांदां स्नान करणंसुद्धां तूं आजकाल सोडून दिलं आहेस. रात्रीचे दांत घासत नाहींस. पूर्वी दिवसांतून दोनदां दाढी करीत होतास आतां दोन दोन दिवस दाढीचा पत्ता नसतो!"

"पूर्वी मी प्रेमांत होतों. कोर्टिंग करीत होतों." मधू वर्तमानपत्र क्षणभर खालीं करून म्हणाला.

"म्हणजे?" भुंवई उचलून रेखेनें विचारलें.

"विशेष कांहीं नाहीं. सध्या जरा मला वाचूं दे."

"नाहीं वाचूं देत!" त्याच्या हातांतलें वृत्तपत्र हिसकून घेत रेखा म्हणाली.

"आधीं तूं दाढी कर, स्नान कर, कपडे पालट. भारी ओंगळ अवतार असतो बाबा तुझा आजकाल!"

रेखेनें मधूच्या कानाशीं घंटा वाजवली तेव्हांच वास्तविक पहातां तो रागावला होता. तिनें त्याच्या हातांतला 'पेपर' हिसकावून घेतांच तो राग दुप्पट वेगानें उसळून आला.

"रेखा!" तो ओरडला, "माझी दाढी फार वाढली आहे नाहीं काय?"

"हो." रेखा म्हणाली.

"आणि माझा पायजमा फार मळला आहे! मी सायंकाळचें स्नान सोडून दिलें आहे! त्यामुळें माझ्या अंगाला भयंकर दर्प येतो!"

"होय."

"तुझ्या केसांना किती खवट घाण येते तें तुला ठाऊक नसेल, रेखा! पण मला तें ठाऊक आहे. किती दिवसांत न्हाली नाहींस तूं!"

रेखा गेल्या पंधरा दिवसांत न्हाली नव्हती. म्हणून या प्रश्नाचें तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. पूर्वी ती दर दोन दिवसांनीं न्हात असे व कोणत्याहि क्षणीं स्नानगृहांतून बाहेर आल्यासारखी निर्मळ दिसत असे. रेखा गप्प बसलेली पहातांच मधुकरनें आपला हल्ला चालू ठेवला.

"तुझी साडी मळकी आहे. झिपऱ्या विसकटलेल्या आहेत. नखांवरचा रंग उडून गेला आहे. तूंहि आतां पूर्वीसारखी रहात नाहींस रेखा!"

"आणि तूं तरी पूर्वीसारखा कुठें राहतोस?"

"तुझा गुण मला लागला—दुसरें काय?"

"नाहीं, तुझा मला लागला—"

"नाहीं, तुझा मला—"

"नाहीं, तुझा मला—"

दोघांचेही सूर पहातां पहातां चढले. रेखेच्या डोळ्यांत पाणी आलें. तिच्या डोळ्यांतलें पाणी पुसण्यासाठीं मधू समोर झाला नाहीं. मधूचें तोंड ज्या प्रकारानें अशा वेळीं रेखा बंद करीत असे, त्या प्रकारांतली जादूच संपल्यासारखं तिला वाटलं. सिगारेटची घाण मारणारें त्याचें तोंड तिला

आठवलें. काल रात्रीं त्यानें केलेला प्रकार आठवला. तेव्हां तें सारें तिनें कसें तरी सहन केलें होतें. तोच प्रकार आपण होऊन करणें तिला शक्य नव्हतें. प्रेमाच्या दिवसांत त्यानें धूम्रपान अगदीं बंद केलें होतें. गेल्या सहा महिन्यांत तें पुन्हा मूळ पदावर आलें. छे! मधूचें तोंड त्या प्रकारें बंद करणें आतां तिच्या शक्ती पलीकडचें होतें. मधूलाहि तसेंच वाटत असावें. त्यानेंहि तिचे डोळे ओठांनीं टिपले नाहींत. तो आपल्या वर्तमानपत्रांत तोंड घालून बसला. रेखा बराच वेळ थांबली व म्हणाली—

"आज सिनेमाला जायचं. तूं तयार हो."

"तयार होण्याचं कांहीं कारणच नाहीं!"

"कां?"

"आज सिनेमाला जायचंच नाहीं."

"मला जायचं आहे. 'डबल लाइफ' आहे."

"डबल असो कीं सिंगल असो, मला यायचं नाहीं."

"मी जाणार!"

"जा बापडी! मास्तरकी करते आहेस, पैसे मिळवते आहेस!—जा एकटी!"

"पण तूं कां येत नाहींस?"

"बजेटांत बसत नाहीं." स्थिर दृष्टीनें केस पिंजारलेल्या रेखेकडे पहात मधू म्हणाला. 'बजेट' बसण्यापेक्षां तिच्या शेजारीं अडीच तास बसण्याचेंच त्याला भय वाटत होतें. काल रात्रीं थोडा वेळ कां होईना, पण आपण तिच्यापाशीं कां गेलों तेंच त्याला आतां कळेना! रेखा ह्या क्षणीं कराकरा पाय खाजवीत होती.

"बजेट!" रेखा म्हणाली, "पूर्वीं प्रेम करतांना नव्हतास कुठें तूं बजेटाच्या गोष्टी करीत?"

"त्याचींच आतां फळं भोगतों आहें. म्हणजे, प्रेमासाठीं व मधुचंद्रासाठीं मोकळ्या मुठीनें खर्च करतांना काढलेलें ऋण अजून फिटायचंच आहे."

"न फिटू दे ऋण. पण आज आपण सिनेमाला जायचं!"

"आपण नाहीं. तूं!"

"तुलाहि पण आलं पाहिजे."

"नाहीं येणार."

"दाढी केली पाहिजे, कपडे पालटले पाहिजेत नि आलं पाहिजे."

"दाढी करणार नाहीं, कपडे पालटणार नाहीं नि येणार नाहीं."

दोघांचेहि सूर पुन्हा चढूं लागले.

"मधू तू पालटलास !"

"तूसुद्धां पालटलीस !"

"मलकट कपडे घालूं लागलास."

"तूं सुद्धां कळकट पातळ नेसतेस. पंधरा पंधरा दिवस केस धुवत नाहींस. करकरा पाय खाजवीत असतेस !"

"मधू !" रेखा खरोखरच चिडून ओरडली, 'तुला मी आतां नकोशी झालें आहे.'

"तसंच कांहीं नाहीं म्हणा." मधू थंडपणें म्हणाला, "पण जरा हा आरसा पहा. आणि तें तुझं जुनं छायाचित्र पहा. हें चित्र पहा आणि तें चित्र पहा."

मधूनें रेखेसमोर आरसा धरला व तिच्या खांद्यावर पंजा ठेवला. त्याचीं बोटं जणूं तिच्या मांसांत चटका देत रुतलीं. त्याचा हा स्पर्शसुद्धां वेगळा होता. तो नुसता थंड आणि मुर्दाड स्पर्श नव्हता. त्या स्पर्शांत विटलेला राग होता. त्या स्पर्शानें रेखा वेभान झाली. तिनें त्याचा तो हात झिडकारला, आरसा हिसकला व ताडकन् समोरच्या भिंतीवर फेंकून मारला. दाबून ठेवलेल्या मधूच्या रागानेंहि उसळी घेतली. दांतओठ खात त्यानें टाइम-पीस उचललें व पलीकडच्या कपाटावर फेंकून मारलें. नंतर तो ताडताड चालत आपल्या अभ्यासिकेंत गेला व धाडकन् त्यानें दार बंद करून घेतलें. ह्या थरापर्यंत गोष्टी आज प्रथमच आल्या होत्या. प्रेमाच्या भोंवऱ्यांत एक-रूपतेनें गरगरणारीं तीं दोघें सावकाश दूर होत होतीं. तें अंतर आज मापलें जात होतें. हा तो जुना मधू नव्हे असें रेखेला वाटत होतें. व ही ती जुनी रेखा नव्हे, असें मधूला वाटत होतें.

भुईवर पडून बराच वेळ ती रडत राहिली. मग तिनें सहजच समोरच्या आरशांत पाहिलें. तिचा चेहरा डागळलेला होता. केस विसकटलेले होते. पातळ मळलें होतें. कुंकवाचा फरफाटा निघाला होता. मधुचंद्रापूर्वीं काढलेलें स्वतःचें छायाचित्र तिनें पाहिलें, तेव्हां तिला स्वतःची ओळख पटेना. मनोमन तिनें मधूला दूषणें दिलीं. तो पालटला होता व त्याच्या संसर्गानें ती पालटली होती. त्याचा तो घाणेरडा स्पर्श अद्याप तिच्या खांद्यावर चटका ठेवून होता. सिगरेटी ओढून आणि दाढी वाढवून काल रात्रींहि असाच तो तिच्यापाशीं दांडगाईनें आला आणि—आणि ती पालटत गेली. त्यानें तिला पालटून टाकलें. त्याच्या अमंगळपणाचा संसर्ग तिलाहि बाधला.

एकाएकीं रेखा उठली. तिनें डोळे पुसले. कडकडीत पाण्यानें चांगलं तासभर ती स्नान करीत बसली. तिनें अगदीं जुन्या कुसराईनें केस विंचरले. वेषभूषा केली, अंगाला अत्तर लावलें, डोक्यांत फुलें घातलीं व आरशांत पाहिलें. आतां ती छान दिसत होती, पण तिचें मन मात्र अद्यापहि उदास होतें, विरक्तीनें भरलेलें होतें. तिचा जीव आंबून, गुदमरून गेला होता आणि कुठें तरी पळून जावें असे तिला वाटत होतें. आयुष्यांत कांहीं तरी वेगळें, नवीन घडावें असें तिला वाटत होतें. क्षणार्धांत रेखेचा विचार ठरला. तिनें चिठ्ठी लिहिली, "मी नलूकडे जात आहें. तिथून आम्ही सिनेमाला जाऊं. रात्रीं अकरापूर्वीं केव्हां तरी परत येईन."

"रात्रीं अकरापूर्वीं केव्हां तरी !"

रेखेला तो शब्दप्रयोग फारच आवडला. वास्तविक पहातां तो मधूचा शब्दप्रयोग होता. गेल्या सहा महिन्यांत तो शब्दप्रयोग त्यानें निदान बारा वेळां तरी तिला नजर केला होता. 'मित्रांबरोबर बाहेर जात आहें. रात्रीं एकदीड-पर्यंत केव्हां तरी परत येईन.'



अनुक्रमणिका

तो परत येत असे—आणि तेंच केसाळ शरीर, तोच यांत्रिक मेलेला स्पर्श, तेंच तंबाखूची घाण मारणारें तोंड—

चटका बसल्याप्रमाणें रेखेनें पायांत सॅंडल्स सरकविल्या, पर्स उचलली नि ती घराबाहेर पडली.

आज पुष्कळ दिवसांनीं रेखा एकटी घराबाहेर पडली होती. एरवीं गेलीं तीन साडेतीन वर्षें सतत मधुकर तिच्यासमवेत असे. तिच्या मनांत अद्याप अस्वस्थता होती. अंगावर पडलेला एकादा चिकट पदार्थ धुवून टाकल्यावरसुद्धां त्याच्या आठवणीनेंहि शहारे यावेत तसें तिला होत होतें. मधूनच तिला वाटे कीं, दणकट केंसाळ मधू आपल्या शेजारीं आहे आणि मग ती दचकून उठे. पण आतां ती खरोखर एकटी होती. पूर्वीसारखें अगदीं एकट्यानें ती मैत्रीणीकडे जायला निघाली होती. नलू तिला घरींच सांपडली.

"यावं, बाईमहाराज!" नलू म्हणाली, "लग्नानंतर आजं तुला वेळ सांपडला?"

"तुझे यजमान कुठें आहेत.?" बाईनें रेखेनें विचारलें.

"पंधरा दिवस झाले, दौऱ्यावर गेले आहेत. कंटाळा आला बाई!"

"कंटाळा आला?" रेखा चपापून म्हणाली.

"तर काय?" आपल्या तीन वर्षांच्या पोराचें तोंड पुसत नलू म्हणाली, "मधून मधून त्यांना सारखें दौऱ्यावर जावें लागतें. एकटं रहाणं माझ्या अगदीं जिवावर येतं!"

"हूं!" रेखा म्हणाली, 'तिला वाटत होतें. मधूला दौऱ्याची चाकरी असती तर किती बरें झालें असतें?"

"घरांत पोरं आहेत एवढं तरी बरं आहे!" नलू मुलाचा भांग पाडत म्हणाली, "त्यांचं करण्यांत वेळ निघून जातो."

"पोर असणं फार बरं असतं का ग?" रेखेनें विचारलें.

"तुला झालीं म्हणजे कळेल!" नलू हंसून म्हणाली, "किती वर्षं झालीं ग तुझ्या लग्नाला? अडीचतीन झालीं असतील, नाहीं? बर्थकंट्रोल करतां कां ग?"

"हं" रेखेनें मान खालीं घातली.

"चैन आहे बाई" नलू म्हणाली, "नुसत्या राजाराणीचा संसार. पण—पण आतां युवराज येऊं द्या एकादा. शाळेंतून रजा घ्यावी लागली थोडी तरी चिंता नाहीं."

"बरं ग!" खरोखर येणारा राग खोटा आहे असें दाखवीत रेखा म्हणाली.

नलूनें कांहीं तरी आठवल्यासारखा चेहरा केला व तिनें विचारलें, "आज एकटी बरी आलीस माझ्याकडे? यजमानांना आज सोडवलं कसं तुझ्यानें?"

"कां बरं?" रेखाची भुंवई उंच गेली.

"आम्हीं तर ऐकलं होतं कीं तुम्ही दोघं एकमेकांना चिकटून असतां, क्षणभर एकमेकांना सोडत नाहीं!"

"पण आज मी तुला सिनेमाला न्यायला आलें होतें. नाहीं म्हणू नकोस." एका दमांत रेखा बोलून गेली.

"मधुकरऐवजीं मला सिनेमाला नेणार आज तूं?"

"हो."

"कां! त्यांच्या संगतीची सर मला कशी येईल?"

"ते आज फार कामांत आहेत. त्यांना पेपर्स तपासायचे आहेत. शिवाय त्यांचं थोडं डोकंहि दुखत आहे. त्यांनींच आग्रह करून मला म्हटलं कीं हें चित्र पाहिल्याशिवाय राहूं नकोस म्हणून." रेखा धडधडीत खोटं बोलत सुटली.

"कोणतं चित्र आहे?" नलूनें विचारलें.

"डबल लाईफ. रोनाल्ड कोल्मनचं काम आहे. भारी सुंदर चित्र आहे म्हणतात."

"मीसुद्धां पुष्कळ दिवसांत चांगलं चित्र पाहिलेलं नाहीं." नलू विचार करीत म्हणाली.

"चल तर मग! आपण कॉलेजांत असतांना करत होतों तशी आज चैन करूं. खूप भटकूं. शॉपिंग करूं. बाहेरच कुठं तरी जेवूं. आणि मग संध्याकाळीं पिक्चरला जाऊं.—"

"तें खरं ग! पण या पोरांचं काय करूं नी?"

"त्यांनाहि घे बरोबर."

"छे! तिथें तीं क्षणभर चैन पडूं देणार नाहींत."

"पहा, कांहीं तरी तोड काढ ना—" रेखा काकुळतीनं म्हणाली.

"बरं. आपण त्यांना माझ्या मावशीकडे ठेवूं. जेवायचं मात्र बाहेर नाहीं. इथेंच जेवायचं. स्वयंपाक होतच आला आहे माझा." त्या दोघी जेवल्या. नलूनें घर आंवरलें व मुलांना कपडे घातले. नीटनेटका पोषाख केला व त्या दोघी बाहेर निघाल्या. लग्नापूर्वीं नलूनें बी. ए. ची पदवी बुडविण्यापूर्वी जशा त्या दोघी भटकत असत तशा त्या आतां भटकूं लागल्या.

इकडे मधुकर अद्याप आपल्या खोलीचं दार बंद करूनच बसला होता. कांहीं वेळ त्यानें पेपर्स तपासले. त्याचा त्याला कंटाळा आला. मग कांहीं वेळ तो पेशन्स खेळत राहिला. त्याचीहि त्याला कंटाळा आला. एकंदरीत आयुष्य फार कंटाळवाणें झालें होतें. मधलीं दोनअडीच वर्षें बरीं गेलीं. पण मग लग्नाचीहि मळमळ बनली. थरारणारे स्पर्श थंड पडूं लागले. रेखेवरील सहवासावर धूळ साचली. त्यापेक्षां फार दिवसांनी लाभलेला हा एकांत बरा होता. मधुकरनें एकदोनदां दाराला कान लावून पाहिलें. रेखेची चाहूल त्याला कुठें

येत्या निवडणुकींत फॉरवर्ड ब्लॉक



या हातावर राष्ट्राचें (म्हणजेच आमचें) भवितव्य अवलंबून आहे! म्हणून आम्हालाच मतें द्या!

ऐकूं येत नव्हती. रेखा मुकाट्यानें रडत बसली असेल अशी त्याची कल्पना झाली. पण तरीहि त्याला दार उघडावेंसें वाटत नव्हतें. रेखेचा सहवास त्याला नको होता. हातांत धरून धरून चिकट झालेल्या खंडीसाखरेविषयीं वाटावें तसें त्याला तिच्या सहवासाविषयीं वाटत होतें. मधुकरनें जांभया दिल्या, चुटक्या वाजविल्या आणि दोनचार सिगरेटींची राख करून टाकली. दारावर रेखेची थाप पडेल असें भय त्याला सारखें वाटत होतें. पण तसें कांहीं झालें नाहीं. आणखी कांहीं वेळ गेला. जांभया देण्याचा व चुटक्या वाजविण्यापूर्वींच त्याला त्यांचा कंटाळा आला. रॅकवर त्याला तो कॉलेजांत असतांना त्यानें आवडीनें विकत घेतलेलें मॉपासांच्या गोष्टींचें पुस्तक दिसलें. किती तरी वर्षांत त्या पुस्तकाला त्यानें हात लावला नव्हता. तो कोचावर लवंडला व वाचूं लागला. त्यानें 'The Sigh' वाचली. 'How he got the legion of honour' वाचली. 'Double Pins' वाचली. जुन्या ओळखीचीं माणसें पुन्हां भेटल्यासारखें त्याला वाटत होतें. किती तरी रंगेल व सुंदर फ्रेंच स्त्रिया पुन्हा त्यानें पाहिल्या. माणसांच्या गोष्टी वाचून जें होत असतें तेंच मधुकरला झालें. त्याच्या चित्तवृत्ती उत्तेजित झाल्या. गोष्टींचें तें पुस्तक त्यानें टाकलें व तो उठला. त्याली अनेक गोष्टी हव्याहव्याशा वाटूं लागल्या. चाकोरी सोडून दूर पळावेंसें वाटूं लागलें. खाडकन् त्यानें दार उघडलें. रेखेचा विचारहि त्या क्षणीं त्याच्या मनांत नव्हता. दार उघडतांच त्या विचाराचा मळूल करणारा चटका बसला व जवळ जवळ त्या क्षणींच आरशावर लावलेली तिची चिठ्ठी त्यानें पाहिली. ती चिठ्ठी वाचून त्याचा तीव्र भांड्यांत पडला. सहजच त्यानें आरशांत पाहिलें. खरोखरच त्याची दाढी विद्रूप दिसत होती. केस पिंजारलेले होते. पायजमा मळलेला होता. आपण इतके गबाळ कसे बनलों ह्याचेंच त्याला आश्चर्य वाटूं लागलें. मॉपासांचे रंगेल नायक लग्न झाल्यावर असेच मळके पायजमे घालून दाढ्या वाढवीत असतील काय? नि चटकदार नायिका केस पिंजारून पाय खाजवीत असतील काय?—मॉपासांचीं अनेक रंगीबेरंगी स्त्रीपात्रें त्याच्या दृष्टीपुढून धांवत गेलीं. व भरभर तो दाढी करूं लागला.

त्यानें गालांवर सुगंधी द्रव्य चोळलें. स्नान केलें. केसांचा तिरपा पण उलटा भांग पाडला. आज तो एकटा मनसोक्त बाहेर फिरणार होता—पूर्वींसारखा. पूर्वींसारखेच तो ऐटदार कपडे करणार होता. तशीच शीळ घालणार होता. तसेच खांदे उडविणार होता. तसेंच स्मित करीत चालणार होता. त्यानें शीळ घालीत ल्हॅवेंडर फुलांचा नाजुक टाय बांधला. स्मित करीत रेशमी सूट चढविला. चकचकीत टॅन बूट घालून खांदे उडविले. खिशांत निळा रेशमी रुमाल ठेवून दिला. हीनाचें अत्तर लावलें व स्वतःच्याच आरशांतील प्रतिबिंबाला वांकून वंदना दिली. आतां तो थेट पूर्वींसारखा दिसत होता. परंतु अद्याप त्याला पूर्वींसारखें वाटत नव्हतें. रेखेचें भिंतीवरील छायाचित्र त्याच्याकडे पहात होतें, आणि तें आपला पाय खाजवीत होतें. घराबाहेर पडावयास मधुकर उत्सुक झाला. तो घराबाहेरच जेवणार होता.

रेखेच्या चिठ्ठीशेजारींच आरशावर त्यानें चिठ्ठी लावून ठेवली.

"बाहेर जात आहें. बाराएकपर्यंत केव्हां तरी येईन..." आणि बोटा-भोंवतीं किल्ल्यांचा झुबका फिरवीत तो घराबाहेर पडला. समोरच्या माळ्या-कडून त्यानें सोनचांफ्याच्या फुलांचा गुच्छ घेतला, आणि त्याचा सुगंध घेत खाडखाड बूट वाजवीत बाहेरच्या रंगीबेरंगी गर्दींत तो मिसळून गेला.





अनुक्रमणिका

सायंकाळच्या रंगीबेरंगी गर्दीतून रेखा व नलू वाट काढीत होत्या. दुपारभर त्या दोघींनीं 'त्रिवाची मुम्बई' केली. त्या महालक्ष्मीच्या खडका-वर समुद्रांत पाय सोडून बसल्या. 'हँगिंग गार्डन' मधील एका हिरव्या कोपऱ्यांत लोळल्या. मधून मधून त्यांनी 'शॉपिंग' केलें. चौपाटीवर त्यांनीं भेळ व कुल्फी खाल्ली व रेक्लमेशनवरच्या एका झकास रेस्टोरांत त्यांनीं चहा घेतला. आतां 'डबल लाइफ' बघण्यासाठीं त्या पटगृहाच्या दिशेनें चालत होत्या. वातावरणांत हिंवाळ्याच्या आगमनाची गोड चाहूल होती. मावळतीच्या प्रकाशानें भरलेले पिवळे-गुलाबी ढग प्रचंड कागदी दिव्यांसारखे दिसत होते. माडांच्या माना हालत होत्या. दूरवर पसरलेला समुद्र रंगीबेरंगी हास्य हंसत होता व मार्गानें माणसांचे प्रसन्न प्रवाह सारखे वहात होते. रेखेच्या मनांतलें दुःख अगदीं बोथट होऊन गेलें होतें. उत्तम वेषभूषा करून दिवसभर ती यथास्थित भटकली होती.

समोर पटगृह दिसूं लागलें. 'डबल लाइफ'चें रंगबेरंगी विज्ञापन दिसूं लागलें. कर्णे फुंकत मोटारी मागोमाग धांवत होत्या.

"आधींच तिकीट रिझर्व केलं असतं तर बरं झालं असतं बाई!" रेखा म्हणाली.

"अग, पण आधीं आपलं जायचं ठरलं कुठं होतं?" नलू म्हणाली.

"चल लवकर, नाहीं तर परत जावं लागेल हात हलवत." रेखा म्हणाली व ती झपझप चालूं लागली. थिएटरसमोरच्या त्या प्रचंड वर्तुळांत नाना प्रकारच्या रहदारीची मनस्वी वर्दळ चालू होती. व्हिक्टोरिया, मोटारी, ट्रॅम्स, पादचारी!

परंतु व्हिक्टोरिया व मोटारींतून वांकून पहाणारीं मुंडकीं बाहेर निघा-ल्यावेळा त्या रेखा व नलूवरून जात नसत. ट्रॅमच्या खिडक्यांतून त्यांच्या दिशेनें माना लांबत होत्या व पादचाऱ्यांना तर काय कुतूहलच होतें. त्या दोघींची जोडी खरोखरच फार आकर्षक दिसत होती. रेखा गर्द निळी बंगलोरी साडी नेसली होती. तिच्या अंगांत फिकट आस्मानी ब्लाऊज होता. कानांत रत्नांच्या [illegible] लालभडक खडे होते. ते तिच्या वेषाच्या पार्श्वभूमीवर विलक्षण उठून दिसले. तिच्या पायांत पांढऱ्या शुभ्र सँडल्स होत्या व केसांवर चांफ्याची भरदार वेणी होती. रेशमी रुमालावर 'गार्डेनिया'चे मधुर थेंब फुलले होते. नलूचा सारा वेषच पांढरा शुभ्र होता. तिच्या सतेज सांवळ्या वर्णाला तो फार खुलून दिसे. —त्या दोघींचेहि देह लवचिक होते. नलूचा थोडा अधिक भासत होता. पण परस्परांच्या साहचर्यानें त्या दोघींचेहि वर्ण, वेषभूषा, आकृती अधिकच उठावानें डोळ्यांत भरत. वाहनांतून जाणाऱ्या अनेक जीवांना त्या दोघींच्या मागोमाग जाण्यासाठीं खालीं उडी टाकण्याचा मोह होत असल्यास ती मुळींच नवलाची गोष्ट नव्हती.

आणि बरोबर अगदीं हेंच दोन तरुण पादचारी करीत होते. रेखा व नलू ट्रॅम स्टेशनच्या दिशेनें जात असतांच त्या दोघांनीं त्यांना हेरलें होतें व जवळ जवळ त्यांच्याच गतीनें आतां ते दोघेहि चालत होते. त्या दोघांपैकीं एक गोरा आणि अतिशय सुदृढ होता. त्यानें रेशमी सूट घातला होता. दुसरा किडकिडीत व सांवळा होता व तो धोतर आणि बंगाली सदरा पेहनला होता.

"तिकीट मिळण्याची मारामारीच पडणार आहे." धोतरांतला तरुण म्हणाला.

"पाहूं या." सुटांतला बांधेसूद युवक म्हणाला.

"हा मोह आवरून जरा झपाट्यानं चाललं पाहिजे." धोतरवाला म्हणाला.

"चल." सूटवाल्यानें उत्तर दिलें.

ह्या वेळीं रेखा व नलू अतिशय झपाट्यानें चालूं लागल्या होत्या. रेखा पुढें होती व नलू तिच्या मागें दहा हात धांवत होती. त्या दोन तरुणांनींहि गति वाढवली व त्यांनीं नलूला मागें टाकलें. रेखा ट्रॅमच्या रुळाच्या अगदीं जवळ जाऊन पोहोंचली होती. ती आपल्याच नादांत होती: वळण घेऊन अकस्मात् समोर येणाऱ्या ट्रॅमकडे तिचें लक्षच नव्हतें. पण तिच्या अगदीं मागें येऊन ठेपलेला सुटांतला तरुण, सारख्या खणाणणाऱ्या घंटेनें अकस्मात् भानावर आला. रेखेनें एक रूळ ओलांडला होता व तिचें पाऊल दुसऱ्या रुळापलीकडे पडलें नव्हतें. क्षणार्धांत काय होईल त्याची स्पष्ट कल्पना सुटांतल्या तरुणाच्या मनश्चक्षूसमोर नाचली. तो झटक्यानें धांवला. रेखेला त्यानें पुढें लोटलें व ती खालीं पडण्यापूर्वीच तिला सावरून घेतलें. धांवती ट्रॅम त्या तरुणाच्या शरीराला जवळ जवळ चाटून गेली. कुठेंहि क्षणभराचा उशीर झाला असता तर रेखा तरी ट्रॅमखालीं गेली असती किंवा तो रेशमी सुटांतला तरुण तरी कापला गेला असता.

ट्रॅम निघून गेली व नलू आणि धोतरांतला तरुण धांपा टाकीत रेखेजवळ आलीं. रेखा आतां हंसत असली तरी तिची छाती धडधडत होती. तिचा हात अद्याप त्या बांधेसूद तरुणाच्या हातांत तसाच होता. आणि अस्पष्ट स्वरांत ती त्याला म्हणत होती, "थँक यू, थँक यू सो मच्."

"ओ! दॅट वॉज नथिंग!" तो गोरा तरुण म्हणाला. रेखेनें पाहिलें. त्यानें रेशमी सूट घातला होता. नि क्रीम रंगाच्या त्याच्या टायवर लव्हेंडरचीं नाजूक फुलें होतीं. रेखेचें काळीज वेगानें उड्या मारीत होतें. तिच्या अंगावर शहारे येत होते. अद्याप तिचा हात त्या पोरसवद्या तरुणाच्या हातांतच होता.

"धन्यवाद!" नलू त्याला म्हणत होती, "तुम्ही होतांत म्हणून निभावलं." नंतर रेखेकडे वळून ती म्हणाली, "चल रेखा!" आणि तो धोतरांतला सांवळा तरुण आपल्या सोबत्याला टोमून म्हणाला, "चल चंदू." आणि मग त्या गोऱ्या तरुणाचा सुखद स्पर्श रेखेच्या हातावरून रेंगाळत गेला. मग त्या दोन्ही जोड्या वेगळ्या झाल्या.

रेखा व नलू यांनीं पटगृहांत पाय टाकून आपल्या जागा घेतल्या व अंधार झाला. रेखाचें अंग अद्याप शहारतच होतें. अगदीं थोडक्यांत आतां ती वाचली होती. पण औदासीन्याची पुसट छायाहि आतां तिच्या मनावर नव्हती. तिच्या वृत्ती पूर्णपणें उफाळून आल्या होत्या. अगदीं पूर्वीसारख्या उफाळून आल्या होत्या. सांबर-हिंगाची व लांडगा छाप वनस्पति तुपाचीं पडद्यावर सरकणारीं विज्ञापनेंहि तिला आतां मोठीं रोमांचकारी वाटूं लागलीं होतीं. मधूनच तिच्या डोळ्यांपुढून कांहीं मिनिटांपूर्वी घडून गेलेला प्रसंग पुन्हां पुन्हा सरकत होता. घंटा वाजवत खडखडत गेलेली ट्रॅम, एका गोऱ्या सुदृढ हातानें तिला दिलेला झोंका... त्या नितळ, लोमशून्य हातांची तिच्या पंजावरील पकड... रेशमी सूट, लव्हेंडरचीं कोमल फुलें काढलेला टाय... रवरी फुग्यांच्या झुपक्या सारखे आकाशांत तरंगणारे अनेकरंगी ढग... सायंप्रकाशांत जादूनें पालटल्यागत सुंदर झालेलें जग...

मार्गदर्शकाची विजेरी अंधारांत चमकली व तिचा झोत रेखेच्या चेहऱ्यावर पडला, तिच्या शेजारच्या रिकाम्या आसनावर पडला.—"दैवानें खैर केली, चंदू. बरोबर दोनच जागा रिकाम्या होत्या." तिच्या कानांवर शब्द आले. ती दचकली. होय, तिच्या शेजारच्या आसनावर तो मघांचाच गोरा बांधेसूद तरुण येऊन बसला होता. तिला वाटलें कीं त्यानें तिच्याकडे पाहून स्मित केलें. ती समोर पाहूं लागली. चित्र चालू झालें. चित्रांत आगगाडी धडधडत होती, तेव्हां रेखेच्या डोळ्यांसमोरून ट्रॅम खडाडत गेली. "रिटा–रिटा–रिटा–रिटा" चित्रांतला कोलमन जप करीत होता. "चंद्रशेखर कीं चंद्रकांत?" रेखेच्या मनांतलें कुतूहल उगाचच तिला विचारीत होतें.






अनुक्रमणिका

मध्यंतरांत प्रकाश झाला. होय, तो मघांचाच तरुण होता. रेखा डोळ्यांच्या कोपऱ्यांतून पहात होती. त्या गोऱ्या तरुणाच्या अंगावर एकंदरीतच केस कमी होते. त्याचा चेहरा नितळ होता. त्यानें केस उलटे पण तिरपे फिरविले होते. त्याच्या वळकट मनगटावर तर मुळीं केसच नव्हते. त्याचे सारे कपडे निर्मळ परीटघडीचे होते. वरच्या खिशांतून निळा रेशमी रुमाल डोकावत होता. त्यानें कोटांत चाफ्याचें फूल खोंचलें होतें. त्याचे ओठ धूम्रपानामें काळवंडलेले नव्हते. ते चांगले लाल होते. (कदाचित् एकाद्या मुलीच्या प्रेमासाठीं त्यानें सिगरेट सोडून दिली असेल!) व त्याच्या कपड्यांवरुन सारखा हीनाचा सुगंध दरवळत होता.

त्यानें तिच्याकडे पाहून स्मित केलें. नलूनें त्याच्याशीं कामापुरतीच ओळख दाखविली व रेखा त्याच्याकडे पाहून स्मित करित असतांच पुन्हा काळोख झाला. मध्येंच दोनचारदां त्याचा हात चुकून तिच्या हाताला लागला. तो म्हणाला "सॉरी." ती म्हणाली, "दॅटस् ऑल राइट!" चित्र चालत राहिलें व संपलें. प्रकाश झाला. तिचा शेजारी अद्याप आपल्या आसनाला खिळलेलाच होता. धोतरांतला तरुण त्याला हलवून म्हणाला, "उठा, महात्मा चंद्रशेखर!"

"इट् वॉज् ग्रेट!" चंद्रशेखर म्हणाला.

"इंडीड ग्रेट!" धोतरांतला किडकिडीत तरुण मिस्कील स्मित करीत म्हणाला.

चित्र छान होतं, पण पहातांना मनाला त्रास फार झाला बाई!" वाटेनं चालतांना नलू रेखेला म्हणाली.

"त्रास झाला?" आश्चर्यानें रेखेनें नलूला विचारलें.

"नाहींतर काय?" नलू म्हणाली. "मला तर अजूनसुद्धां उदास वाटत आहे. तुला काय आनंदानं नाचावंसं वाटतं, हें रडविणारं चित्रं पाहून?"

रेखेला खरंच नाचावंसं वाटत होतं. तिच्या साऱ्या वृत्ति टवटवीत झाल्या होत्या. तिला तीन वर्षांनीं तरुण झाल्यासारखं वाटत होतं. हरवलेलं सांपडल्यासारखं वाटत होतं. तिचं हृदय आनंदानं सारखे झोके घेत होतं. आणि सिनेमांतले शब्द-तिला सरमिसळीनें ऐकूं येत होते...

"त्रिल—रिटा. त्रिल रिटा"

—चंदू, चंद्रशेखर—चंदू...

तिच्या पंजावर एका गोऱ्या वळकट हाताची पकड बसत होती. तिची मुर्दाड बनलेली स्पर्शभावना हातावरुन जात होती व हीनाचा सुगंध तिच्या मस्तकांत भरत होता. रात्रीं साडेदहाच्या सुमाराला नलूला सोडून तिची टॅक्सी घराकडे भरधांव निघाली तेव्हां रेखा प्रसन्नतेच्या त्याच हिंदोळ्यावर झोंके घेत होती.

मधुकरचें मनहि ह्या वेळीं उल्हसानें डोलत होतें. फार दिवसांनीं आज त्यानें तें सारे केलें होतें. आज तो जुन्या मित्रांच्या अड्ड्यावर जाऊन पत्ते खेळला होता. अगदीं ट्रिशेवन् ठेवतां त्यानें धूम्रपान केलें होतें. एवढेंच नव्हे तर बरोबरशी व्हिस्कीहि आज त्यानें घेतली होती. त्याची भटकन्ती चालू असतांच वाटेंत त्याला कॅप्टन खन्ना भेटला. सहासनवेंत तो खन्नाबरोबर अर्धांग्ल मित्राकडे गेला. तिथें त्यांनीं एकमेकांना यथास्थित रंगेल कहाण्या सांगितल्या. विनोद केला. पत्त्यांचा डाव मांडला. व्हिस्कीहि घेतली. आणि ते नाचलेसुद्धां. लग्न झाल्यावर धूम्रपानाचीहि त्याला चोरी झाली होती. व्हिस्कीचें तर नांव काढण्याची सोय उरली नव्हती. पण आज त्याच्या छातीवरचें दडपण पार नाहींसें झालें होतें. तो लग्न विसरला होता. लग्नाचा शिळा उबग विसरला होता. सारें जग आतां पुन्हा तरुण होत होतें. कोमटलेल्या मनोवृत्तींत पुन्हां धीर भरत होता. दरनीतीसाठीं रात्र दिव्यांनीं नुसनुसली होती. अंधारानें जें कुरुप होतें तेवढेंच नष्ट केलें होतें व सौंदर्य तितकें प्रकाशांत आणलें होतें. येथें वाढलेल्या दाढीच्या नायकांना अथवा पाय लांबविणाऱ्या नायिकांना थारा नव्हता. दिवसाचें कुरुप सत्य मिटलें होतें व रात्रीच्या रोमांचकारी ग्रंथांतून मॉपासांचीं रंगीबेरंगी पात्रें फुलपांखरांमारखीं उडत बागडत बाहेर पडत होतीं.

मलबार हिलखालचा तो भाग शांत व निर्मनुष्य होता. मधुकरच्या बुटांच्या आवाजानेंच ती शांतता भंग पावत होती. ह्यूजेस रोडवरील एका दिव्याखालीं घुटमळणाऱ्या वीसबावीस वर्षांच्या तरुणीनें तो आवाज ऐकला व समोरुन येणाऱ्या नीटनेटक्या व बांधेसूद तरुणाकडे ती पाहूं लागली. तिची चलबिचल पाहतांच मधुकरनें आपली गति मंद केली. आतां ती मुलगी समोर झाली व सफाईदार इंग्रजींत ती त्याला म्हणाली,—

"मी वाट चुकलें आहें. मला साहाय्य कराल काय? ×× ह्या पत्त्यावर मला जायचं होतं." तिनें मधुकरच्या हातांत एक कार्ड दिलें. मधुकरनें त्या चिठ्ठीकडे एकदां पाहिलें व मग त्या मुलीकडे आपादमस्तक पाहून घेतलें! ओहो! मॉपासांच्या नायिका कांहीं केवळ पुस्तकांतच नव्हत्या. ही आतां एक त्याच्यासमोरच उभी होती. त्या मुलीचा चेहरा रुमट होता. वर्ण झगझगीत गोरा होता. डोळे बदामी होते. आकृति डौलदार होती. ती गर्द निळी साडी नेसली होती. तिच्या कानांत दोन लालभडक खडे होते व त्यांची प्रभा तिच्या गालांवर सांडत होती. तिच्या केसांवर चांफ्याची वेणी होती. पायांत पांढऱ्या शुभ्र सॅण्डल्स होत्या व तिच्या वस्त्रांवरुन 'गार्डेनिया'चा मोहक सुगंध उधळला जात होता. तिच्या त्या सुगंधित दर्शनानें मधुकरच्या अंगावर शिरशिरी आली. त्यानें तिच्याकडे पाहिलें तिनें हातांत दिलेल्या कार्डकडे पाहिलें, व पुन्हा तिच्याकडे पाहिलें.

"प्लीज्..." ओठांना लाडिक आकार देऊन ती म्हणाली.

"अहो, पण हा पत्ता अॅटॉप हिलचा आहे." मधुकर आश्चर्यानें म्हणाला, "आणि ही आहे मलबार हिल!"

येत्या निवडणुकींत कॉंग्रेसपक्ष



या बैलोबांचें बुद्धिसामर्थ्य माहीत आहे ना? मग आतां तर आम्हालाच मतें द्या!

"खर ?" ती उद्गारली.

"हो ना !" मधुकर म्हणाला, "इतक्या लांब तुम्ही इथें कुठें आलांत बुवा !"

"मी इथें अगदीं नवखी आहें. मी नागपूरची आहे. प्रथमच मुंबईला येत आहें."

"नागपूर ?" पुन्हा आश्चर्यानें मधुकरनें त्या मुलीकडे पाहिलें.

'नागोबाची गल्ली' नि 'टिमकी' अशा भयंकर जागा असणाऱ्या त्या गांवांत अशा 'पॉश' मुलीहि असतील ही त्याला कल्पना नव्हती. ह्यापुढें नागपूरविषयीं अधिक आदरानें विचार करणें त्याला भाग होतें.

"नागपूरहून तुम्ही थेट मलबार हिलवर आलां म्हणतां ?"

"नव्हे हो," हंसून ती म्हणाली, "मी उतरलें आहे खारला. पैजेवर एकटी संध्याकाळीं मी ह्या पत्त्यावर जायला निघालें. तिथें मला आज रात्रीं जेवायला आणि रहायेला जायचं होतं. पण रात्रीं या मुंबईंत कशाचा कशाला पत्ता लागत नाहीं. मीं चुकीच्या गाड्या पकडल्या. मीं चुकीच्या बसमध्यें बसलें—"

"मुलींनीं स्वतांविषयीं फाजील विश्वास धरला म्हणजे हें असेंच होत असतं." तो बोलून गेला.

ती पुन्हा हंसली. लाल मखमलींतून हिरकण्या चमकाव्यात तसे तिचे दांत चमकले. ती म्हणाली, "बरं, चला ! आतां मी तुमचा विश्वास धरतें. कसं कसं जायचं ह्या अॅन्टॉप हिलकडे ?"

"मीच तुम्हांला नेऊन पोहोंचवितों तिथपर्यंत. मला तिकडेच जायचं आहें."

समोरून धांवत येणाऱ्या टॅक्सीच्या दिव्यांचा झोत त्या दोघांवर पडला. त्यानें हात हलवला. टॅक्सी थांबली. ती तरुण मुलगी किंचित् घुटमळली.

"चला बसा !" मधुकर म्हणाला, "तुम्ही नागपूरचीं माणसं धाडसी ना ?"

तिनें क्षणार्धांत निश्चय केला व ती टॅक्सींत चढूं लागली. पण मधुकराचे तारे आतां उंचीवर असले तरी त्या मुलीचे नव्हते. साडीच्या सोग्यांत तिचा पाय अडखळला व तिचा झोंक गेला. चटकन् मधूनें तिचा हात धरला, तिला सांवरलें व आंत बसवलें. पण एवढ्यानें सारें संपलें नव्हतें. ड्रायव्हरनें फाडकन् दार ओढलें, व त्यांत तिचें बोट सांपडलें. गाडीनें वेग घेतला. मधुकरनें पुन्हा तिचा हात हातांत घेतला.

"फार लागलें का ?" त्यानें विचारलें.

"विशेष नाहीं." ती म्हणाली.

"थांबा, मी तुमच्या बोटाला रुमाल बांधतों." तो म्हणाला.

तिनें आपला रेशमी रुमाल त्याच्यापुढें धरला. एकदां तो त्यानें तिच्या बोटाभोंवतीं बांधला व सोडला. पुन्हा बांधला व सोडला. आणि मग सावकाशीनें पुन्हा बांधला. तिच्या हाताच्या स्पर्शानें त्याचें शरीर रोमांचित होत होतें, काळीज धडधडूं लागलें होतें. त्याला पांच वर्षांनीं लहान झाल्यासारखें वाटत होतें. रुमालाला त्यानें अखेरची गांठ दिली व तो म्हणाला,

"आतां ठीक वाटेल तुम्हाला."

तिनें नुसतें स्मित केलें व त्याच्या हृदयांतले सारे थंड, उदास कोपरे थरथरून गेले, उजळले. मोटार धांवत होती. दिव्यांच्या रांगा मागें पडत होत्या. वाटेवरची रहदारी विरळ पडली होती. त्याचे डोळे गरगरत होते. मधूनच गाडी वेगानें वळण घेई व तिचें शरीर त्याला स्पर्शून जाई. तो स्पर्श तिच्या मादक मृदुतेची साक्ष देत होता. एकदोनदां तिचा हात त्याच्या हातावर चुकून पडला. त्याचाहि हात तिच्या हातावर पडून गेला. मुक्कामावर गाडी थांबली. तिनें त्याचे मनःपूर्वक आभार मानले. मघापासूनच त्याला कुतूहल वाटत होतें व आतां निरोप घेतांना तर त्याला राहावेना,

"आपलें नांव कळेल का ?" त्यानें विचारलें.

"इंदुमती देशमुख." ती म्हणाली, आणि हात हलवत पाठमोरी झाली, गाडीनें पुन्हा वेग घेतला. मधुकरचें हृदय फुलून आलें होतें. तो शीळ घालत होता व म्हणत होता, "इंदू–इंदुमती देशमुख...इंदू देशमुख.."

त्याच तंद्रींत मधुकरनें दारावरची घंटा दाबली. गर्द निळें पातळ व कानांत रक्तरंगी खडे ! पायांत शुभ्र सॅण्डल्स व डोक्यांत चांफ्याचीं फुलें ! कपड्यावरून येणारा 'गार्डेनियां'चा सुगंध ! प्रेमानें, लोभानें, अपार आसक्तीनें तो रेखेच्या आकृतीकडे पहातच राहिला !

रेखाहि त्याच दृष्टीनें त्याच्याकडे पहात होती. परीटघडी रेशमी सूट ! लव्हेंडरच्या फुलांचा टाय ! तिरपे उलटे वळविलेले केस ! कोटांत चांफ्याचें फूल ! कपड्यांवरून येणारा 'हीना' चा सुगंध !

त्यानें तिचे हात धरले. तिनें त्याच्या हातांचा दाब परत केला. तीं दोघेंहि एकमेकांना लगटून सोफ्यावर बसलीं. अगदीं पूर्वीसारखीं ! तिच्या शरारावर उठणारे रोमांच त्याला जाणवले व त्याच्या शरीरावर उठणाऱ्या उर्मींनीं ती हेलावली. कांहीं काळ एकमेकांच्या आतुर डोळ्यांत तीं दोघें पहातच राहिलीं व मग एका अनावर आवेगानें तिच्या गळ्याभोंवतीं हात टाकत मिटल्या डोळ्यांनीं तो उद्गारला, 'इंदुमती !' व जवळजवळ त्याचक्षणीं तशीच धुंद त्रमाळ्यानें त्याच्या गळ्याभोंवतीं बाहू लपटेत ती म्हणाली, "चंद्रशेखर !"

आणि दुसऱ्याच क्षणीं चरचरणारें अंजन पडल्याप्रमाणें त्यांनीं डोळे उघडले व परस्परांना दूर ढकलून दिलें. !

तूं येणार म्हणून एक सदनीं आनंदली आनसें

# सात पावलांवरले आठ आंसू!

तूं जाणार म्हणून एक
सदनीं औलावलीं
लोचनें !




सकाळचे आठ वाजले होते. आणि सदाशिव पेठेंतील नवी वस्ती झालेल्या भागांतील एका घरांतील तिसऱ्या मजल्यावरल्या अण्णांच्या बिऱ्हाडांत...

आज रात्रीच्या गाडीनें सासरीं जाणाऱ्या अण्णांच्या थोरल्या मुलीला आई न्हावूं घालीत होती. धाकटी मुलगी अजून उठली नव्हती. ते तीन बाळजीव, स्वप्नांच्या सोनेरी पंखांना पालवीत पेपरमिंटाच्या प्रचंड डोंगराला वळसा घालून नुकतेच एका बागे-पाशीं येऊन पोहोंचले होते. दारावरच या बागेंत 'मास्तरनी आणि मास्तरणींना यावयास संपूर्ण मज्जाव आहे' अशी जंगी पाटी होती. त्या बागेंतल्या कांहीं झाडांवर वांसावळ्यासारखे बिस्किटाचे पुडे लटकले होते. कांहीं वेली दुध्या भोपळ्यासारख्या होत्या, त्यावर क्रिकेटच्या व हॉकीच्या बॅटी पिकाच्यांच्या बेतांत—म्हणजे पाडाला आल्या होत्या

काहीं झाडांवर एक्झरसाइझच्या वह्या, इसापनेत्या, कंपासपेट्या फुलल्या होत्या. वेताच्या छड्यांची झाडें कुणी निगा न राखल्यामुळें अगदीं वाळून निर्जीव होऊन गेलीं होतीं. खरी कोहुल्यांच्या वेली, चॉकलेटच्या चिंचेसारख्या-झाडावर चढल्या होत्या. पाटीवरल्या पांढऱ्या पेन्सिलींचें गवताचें रान उगवलें होतें. शिसपेन्सिलें शेवग्याच्या शेंगांसारख्या लटकल्या होत्या. एका कलम केलेल्या झाडावर किल्ली दिल्यानंतर चालणाऱ्या आगगाड्या आणि मोटारी एकाच डहाळीवर झुलत होत्या.

आतां ८। वाजले होते.

साडेदहा वाजतां मुलांना शाळेंत जावयाचें होतें.

आणि आज जरा औस्तेकदम चालून चालण्यासारखें नव्हतें.

दिवाळी त्यात भूतकाळांत दडली होती. वहिणींनी गावच्या भोंस्तीं ओवाळिलेलीं निरांजनें आतां देव्हाऱ्यांतल्या देवांना ओवाळूं लागलीं.

शिवाय अक्का आज रात्रीच्या गाडीनें सोलापूरला आपल्या सासरीं जाणार—

धांदल करावयास हवी...

मग अण्णा मुलें झोंपलीं होतीं तेथें आले. आणि मग त्यांनीं पेपरमिंटाच्या डोंगरावर उतरून आपल्या झग्यांचे इवलेसे खिसे कांटोकांठ भरून पाहणाऱ्या ताईला उठविलें. चंद्रू कलम केलेल्या झाडावर मोहरीचे हापूस आणि ओंगाड्यांच्या पायऱ्यांवर डोळा ठेवून चढला होता. त्यालाहि अण्णांनीं खालीं उतरविलें.

मग अपेक्षाभंग झालेल्या वेड्यानें शिसपेन्सिलीच्या शेंगांचे जुडगेच्या जुडगे जमा करीत आपल्या हाफपॅन्टचे खिसे गच्च भरीत असलेल्या पांड्याला जागें करण्याचें काम स्वतःकडेच घेतलें...

रंगीत फुलांच्या सुखशय्येवरून उठलेलीं तीं मुलें जागीं होऊन आतां डोळे चोळूं लागलीं होतीं.

"उठा ! तोंडें धुवा लवकर. साडे आठ वाजून गेले." अण्णा सार्‍यांना म्हणाले.

"अक्का कुठें आहे ?" ताईनें विचारलें.

"आहे नी !" पांडू उद्गारला.

"अण्णा, आज रात्रीं जाणार आहे ना ती ?" मुलांत अधिक समजूतदार असणाऱ्या चंद्रूनें विचारलें.

"होय रे, बाबांनो ! रात्रींच जाणार आहे ती." अण्णा म्हणाले.

अण्णांच्या ह्या उत्तरानें त्या सहा विस्फारित डोळ्यांचें समाधान झालें नाहीं.

"अक्काला आई न्हाऊं घालत आहे." अण्णांनीं त्यांना खुलासेवार माहिती दिली. मग मुलांच्या विस्फारलेल्या डोळ्यांतील संशयाचे सांवळे पक्षी दूर उडाले.

"आहे. अक्का घरीं आहे तर." ताई म्हणाली.

"आपल्याला उगीचच वाटलं कीं आपल्याला चुकवून ती पळाली—" पांडू म्हणाला.



"छे: छे: ! काय खूळ लागलंय काय ? अरे ती जाईलच कशी मुळीं चुकवून. मी साऱ्या रात्री जागाच आहें ना !" चंद्रू छाती पुढें काढून म्हणाला.

"तेंच तर म्हणतें आहें मी." छोटी ताई पुटपुटली.

मग अण्णा स्वतः अंथरुणें गोळा करावयाला लागले. त्यांचाहि रात्रभर डोळा लागला नव्हता.

मग मुलें तोंड धुवावयास गेलीं.

आतां अक्काचें नहाणें संपलें, नेसावयाचें हिरवें लुगडें कसेंतरी गुंडाळून घेऊन ती न्हाणीघराबाहेर आली.

सावलीमागें आकृति असावी तशी तिची आईहि तिच्या मागोमाग होती.

तिच्याकडे पाहून अण्णा सहज हसले.

अक्का एकदम लाजली.

अण्णा माजघरांत अक्काभोंवतीं घोटाळूं लागले.

"तुम्ही आतां पुढच्या खोलींत जा बरं." अक्काची आई अक्काच्या वडिलांना म्हणाली.

"तिकिट काढलं का अण्णा ?" अक्कानीं आपल्या ओल्याचिंब केसांना टॉवेलनें पुसत पुसत विचारलें.

"केली आहे ती व्यवस्था ! पुरंदऱ्यांचा थोरला मुलगा बाबुराव स्टेशनांतच आहे क्लार्क म्हणून कामाला. संध्याकाळीं तो आणून देणार आहे." अण्णा म्हणाले.

"तुम्ही आतां बाहेर जा पाहूं." नंतर आई अक्काकडे पहात म्हणाली, "तशी आतां तूं बोलत उभी राहूं नकोस. आधीं नीट नेसून घे बरं."

मग अण्णा अक्काकडे हंसत हंसत पहात तेथून दूर गेले. जातां जातां ते हलकेच पुटपुटले, "हिला वाटतं, सारखें मुलीला आपल्याजवळ ठेवावं. आम्हांला नाहीं वाटत कांहीं मायाबिया—"

मुलीवरल्या त्या प्रेमाच्या चढाओढींत रात्रींहि आईनेंच आपलें वर्चस्व प्रस्थापित करून 'सासरीं जाणाऱ्या' लाडक्या लेकीचा कबजा घेतला होता—

आणि आपण मात्र...

कालची सारी रात्र...

ती कालची सारी रात्र ? ती रात्र एक कढई होती. तींत अनेक आंसूंना आधण आलें होतें आणि उकळत्या लाव्ह्यांत अण्णांचा आत्मा तळमळत तळमळत पोहत होता.

ते निजले होते त्याच्या पलीकडच्याच खोलींत अक्का आपल्या आईच्या कुशींत निजली होती. आईनें उद्यां दूर जाणाऱ्या आपल्या लेकीच्या मुखावर आपल्या पदराचें पांघरूण टाकलें होतें.

मध्यरात्रीं असें तळमळत अंथरुणावर पडलेल्या अण्णांच्या मनांत आलें कीं हलकेच अक्काला उठवावें आणि तिला आपल्या उरापोटाशीं धरीत जुन्या आठवणी काढीत पहांटेपर्यंत जागत बसावें.

तिच्याबद्दलच्या जुन्या आठवणी काढीत आपण—आपण असे या गादीवर तळमळत पडलों आहोंत आणि ती आपली मुलगी मात्र अगदीं आनंदानें आईच्या कुशींत खुषींत घोरत पडलेली आहे.

आहे कीं नाहीं ?

म्हणजे शेळी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो बात्रट.

—बात्रट नव्हे वातड.

—तर काय ?

परंतु आतां अक्काला नांवें ठेवणें बरोबर नाहीं. अरे! तिला कशीं नांवें ठेवावयाचीं? आतां कांहीं वेळानें सूर्य उगवेल आणि थोडया पुढें कांहीं वेळानें तो मावळेल.

—आणि मग रात्र होईल.

आणि मग कुठल्यातरी धडकेला आपण आपल्या घरीं परत येऊं तेव्हां...!

तेव्हां ती नसेल!

आणि मग?

मग? ..

अण्णांनीं आपले कुसे बदलले. एवढा वेळ डावा हात डोक्याखालीं घेऊन ते विचार करीत होते. आतां त्यांनीं उजव्या हाताची उशी केली.

तें कांहीं नाहीं.

फिरून एकदां पाटी पुसून टाकूं या.

आणि फिरून नव्या आठवणी आठवूं या.

आणि अण्णांच्या बाबतींत तरी अक्काबद्दलच्या आठवणींना तोटा नव्हता.

सतत सोळा वर्षांचा तिचा—त्यांचा सहवास. तिचा जन्म त्यांना आठवला.

त्या वेळीं आपण मुंबईला एका वर्तमानपत्राच्या ऑफिसांत संपादकाचे मदतनीस म्हणून काम करत होतों.

पैशांची फार ओढाताण होती. ते दिवस फार फार संकटाचे होते.

एवढ्याशा खोलींत ती, कागदाच्या रद्दीवर रद्दी विकून आणलेल्या चहासाखरेचा चहा करी.

ती हंसे. मग आपण हंसत असूं.

प्रत्यक्ष उपास असे कधीं पडले नाहींत. परंतु—

परंतु कांहीं जेवणींच अशीं झालीं कीं खाला विषप्रयोग करण्यासाठींच आपण जेवीत आहोंत असें त्या वेळीं वाटे.

वण वण फिरीत वखवखलेल्या दुपारीं आपण घरीं येत होतों.

कधीं ती हंसे—

कधीं ती रागावे—

आणि कधीं ती 'अरग्युमेंट' कां काय म्हणतात तेंहि करूं लागे.

आणि एक दिवस आपण संध्याकाळीं ऑफिसमधून (न विचारतां) नेलेलें जुन्या वर्तमानपत्रांचे अंक विकून परत येत होतो.

चाळींत पाऊल टाकलें..

कांहीं वेळानें खोलींत येऊन पोहोंचलों.

घरांत ती नव्हती...

मग शेजारणीनें सांगितलें.

—अक्का अशी जन्माला आली!

अशी म्हणूनें कशी तर...

पगार पुरत नव्हता, अशा वेळीं ती तिसरी आमच्यांत आली.

खरेंच, आज जसे आपण तिच्या नावेनें खुळे आहोंत तसेंच त्यावेळींहि खुळे होतों.

पुढें अक्का वाढूं लागली.

आणि मग आढ्याला बांधलेल्या कापडाच्या गोधडी झोपाळ्यांत अक्का झुलूं लागली. ही काय? हीच का?...आपण ज्या सतरंजीवर गादी अंथरली आहे तीच सतरंजी, आपण त्या झोळ्यांतून दुनद्दर, तिचा हिंदोळा बनविला होता.

तर काय?

ती सतरंजी आहे. इथेंच आहे. आणि ती, अक्काहि तिथें आहे. अगदीं त्या वेळी ती जशी आईच्या कुशींत झोंपली जात असे तशीच ती आतांहि झोंपली आहे.

त्या वेळीं जशी ती कांहीं वेळेला माझ्या जवळ येऊन निजे तसें आतां होणें शक्य नाहीं. आणि हीच तर वाईट गोष्ट आहे. सान्या जन्मभर हें सत्य अण्णांच्या मनांत रुतून बसलें होतें.

ती रात्र सरली.

आणि दिवस उमाट्यावर आला.

तरी सुद्धां आपल्या मुलीला घटकाभर तिची आई सोडीत नाहीं. काय म्हणावं तरी काय या आमच्या मंडळीला?

आमची मंडळी म्हणजे 'तऱ्हेवाईक नाटक मंडळी' आहे झालं.

एवढ्यांत तोंड धुण्यासाठीं नळावर टाकून हल्ला चढविलेली त्यांची वानरसेना परत आली होती.

मुलें आलीं तीं अण्णांच्या समोरूनच आंत अक्काला बिलगायला गेली. मुलें आलीं तीं खाऊन एक मोठा कट रचून आलीं होतीं.

अक्काचा सहवास अधिक मिळावा म्हणून शाळेला आज त्यांनीं बुट्टी मारावयाचें ठरविलें होतें.

ताईनें आपली अर्धशिशी दुखवायचा 'प्लॅन' आंखला, पांड्यानें आपल्या पोटांत दोनचार डझन कळा भरल्या, बंडूनें आपल्या डोक्यांत एक पिठाच्या गिरणीचा 'टक् टक्' ठेका सोडून टाकला.

आणि आईच्या कठोर नजरेंतून निसटायचें म्हणजे हीं सोंगें अगदीं हुबेहूब वठावयास हवीं होतीं.

चहाचे कप आईनें त्यांच्या पुढ्यांत ठेवले. अक्काहि तिथें येऊन त्यांच्यांत बसली. हलक्या पावलानें अण्णाही मग संपाकघरांत आले, आणि पाट मांडून बसले. ..

"श्रेष्ठा!"

"काय ग ताई?"

"आज डोक्यांत टक् टक् होत आहे." ताई कपाळाला आठ्या घालीत म्हणाली.

"समजलं मला! तें कांहीं

येत्या निवडणुकींत

शे. का. फे.



या प्रचंड देहाचे भन्नाट प्रयोग पहा—आणि याला मतें द्या! विसरूं नका हत्ती = ५० टक्के गणपति!

अनुक्रमणिका

नाहीं. मोटार आली न्यायाला कीं शाळेंत गेलं पाहिजे." आई म्हणाली.

"दुर्लक्ष केलें, दुखणं अंगावर काढलं म्हणजे तें वाढतें असें शास्त्र शिकविणारे शेवडेमास्तर आम्हांला सांगत होते." चंडू म्हणाला.

"आमचे पाळंदेगुरुजीही तेंच म्हणत होते." पांडू म्हणाला.

"तें कांहीं चालायचं नाहीं... शाळेंत हें गेलेंच पाहिजे. तुझं नाहींना दुखत खुपत चंड्या आणि तुझं रे पांड्या?" आईनें विचारलें.

"तेंच तर—"

"...अरे काय? तेंच तर काय?" त्याच्या संदिग्ध उद्गारानें संकटांत पडलेल्या आईनें विचारलें.

"तेंच तर—पांडूचं पोट आणि माझं डोकं दुखतं आहे; म्हणून तर आम्ही सांगतोंय." चंडू म्हणाला.

"सारख्या सकाळपासून कळा मारत आहेत उजव्या बाजूला पोटांत!" पांडू म्हणाला.

"मग जेवूंच नका कुणी आज!" आई म्हणाली.

मुलें अण्णांकडे पाहूं लागलीं.

पण अण्णांच्या मनांतहि कसलातरी कट रचणें चालू होतें.

घरांतल्या साऱ्यांचीच इच्छा आजचा सारा वेळ अक्कांच्या सान्निध्यांत काढावयाची होती.

मुंगीनें गुळाच्या ढेपेभोंवतीं 'सावित्री व्रत' करीत फेरे घालावे तसें लहानसें घर आज अक्काच्या भोंवतीं फिरत होतें.

आईचा जेवणबंदीचा हा हुकूम ऐकतांच, मोटारींतून बालकमंदिरांत जाऊन अक्षरांच्या ठोकळ्यांचे मनोरे रचणारी इटुकली ताइटली एकदम या कटांतून उघड उघड बाहेर पडली.

"आपल्याला कांहीं होत नाहीं बाई! आपण जेवणार आपलें! शिवाय आज बासुंदीपुरी आहे." ती म्हणाली.

तिच्या या बालसुलभ बोलण्यानें आईला हंसूं आलें.

"अगदीं अक्काच्या वळणावर चालली आहे." अण्णा म्हणाले.

"इश्श!" अक्का चहाचे कप मोरीवर विसळण्यासाठीं नेतां नेतां लाजून म्हणाली.

कटांतून बाहेर पडलेल्या ताइटलीकडे चंड्या आणि पांड्या मोठाले डोळे करून पहात होते.

तें असें पहात असतांनाच पुन्हा आई बोलूं लागली.

"काय रे पांड्या, आज बासुंदी आहे. शाळेंत जाणार आहेस कीं नाहीं?"

"जाणार!" पांड्या म्हणाला.

मग चंडूनें पांड्याकडे मोठाले डोळे करून पाहिलें. मग पांडूनें चंडूच्या कानांत हळूच सांगितलें, "अरे आज बहुतेक गेल्याबरोबर आपणाला सुट्टी मिळेल. ते हळदुले-मास्तर आजारी आहेतच कीं."

"अरे, ते कुठले आजच्या आज मरायला. गेले सहा महिने सारीं मुलें त्यांच्या सुटीची वाट पहात पैजात दमून बसलीं आहेत." चंड्या म्हणाला.

"पण मी सांगतों, आज ते नक्की—"

"सोड रे बाबा!"

"बरोबर आहे." चंडू म्हणाला.

मग कांहीं वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं.

आतां बख्याळांत ९-वाजले होते.

मुलांची आंघोळ चालली होती. अण्णांची आंघोळ होऊन ते आतां देवांची पूजा करीत होते. अक्काला त्यांनीं गंध उगाळून घ्यायला बसविलें होतें

'परमेश्वरा! माझ्या सासरीं जाणाऱ्या मुलीला दुःखापासून दूर ठेव. दुःख द्यावयाचीच वेळ आली तर संकटानें नाकडे माझ्या भोंवतीं घाल. कांहीं झालें तरी माझी अक्का सुखी राहिली पाहिजे...'

उदबत्तीच्या सुगंधानें अण्णांच्या भोंवतालचें सारें आसपास एका पवित्र वातावरणाच्या आधीन झालें होतें. मिटल्या डोळ्यांनीं ते देवापुढें बसले होते.

गंध उगाळीत बसलेली अक्का त्यांच्याकडे पहात होती. अण्णांच्या मनांत चाललेल्या कालवाकालवीची कल्पना त्या मायाळू कन्येला आली होती.

या अण्णांपासून आपण आज रात्रीं दूर जाणार आहोंत. गेल्या सोळा वर्षांत त्यांनी कधीं आपल्या अंगावर हात टाकला नाहीं. उलट मुला-मुलींच्या भांडणांत कोणी आपल्या अंगावर हात टाकलेले त्यांना कळलें कीं एरवीं बर्फासारखे शांत असलेले ते वाघासारखे त्या मारणाऱ्याच्या अंगावर धावून जात.

आपण नापास झालों—ते बोलले नाहींत.

आपण पाट्या फोडल्या—ते बोलले नाहींत.

आपण खेळतां खेळतां परकर फाडले—ते बोलले नाहींत.

शाळेंत जातांना फीचे पैसे हरवले—ते बोलले नाहीत.

स्वतःच्या किती तरी हौशी त्यांनीं आपल्याला गमतीप्त रहातां यावें म्हणून कमी केल्या—

दिवाळींतल्या आपल्या दारूच्या हट्ट पुरविण्यासाठीं त्यांनीं मोठ्या हौसेनें जमा केलेल्या लायब्ररींतील आवडतीं पुस्तकें येईल त्या किंमतीला विकलीं.

दिवे लागले नि आपण घरांत दिसलों नाहीं कीं ते किती कावरे बावरे होत.

आणि आपल्याला हें स्थळ मिळावें म्हणून अण्णांनीं किती खर्च केला! त्यांनीं केलेला हा खर्च मायाळू व्यवहारी असलेल्या आपल्या आईलाहि पसंत नाहीं.

आणि तिला आठवलें—सप्तपदीवरलीं सात पावलें आपण चालत होतों—आपण आठ आंसू गाळले होते.

... आणि होमापाशीं बसलेल्या अण्णांच्या..? त्यांच्या डोळ्यांतून सोळा आंसू सांडत होते.

असे विचार तिच्या मनांत चालू होते.

आणि अण्णांच्या मनांत आपल्या मुलाबद्दलचे विचार चालू होते.

देवापाशीं जें मागणें आपण मागितलें तें मोठ्या मनाचें आहे. तें मुलीच्या वडिलांचें आहे.

अण्णांना स्वतःबद्दलचाच स्वतःला अभिमान वाटला. परंतु क्षणभरच टिकला. आत्मगौरवानंतर ते विचार करूं लागले.

आणि आपल्याच मायाममतेनें आपण एवढें प्रस्थ मांडून इथें असे बसलों आहोंत. मुलांची माया. मुलामुलींची आईबद्दलची, वडिलांबद्दलची माया काय कमी असते?

त्या पराकोटीच्या प्रीतीनेंच पंढरपुरांतल्या पांडुरंगाला युगायुगांच्या संधिकालांत एका वीतभर विटेवर, कर ठेवून उभें रहावें लागलें आहे ना?

वडिलांच्या वात्सल्यानें वेड्या झालेल्या रघुरायानेंच ना राज्यत्याग करून कांट्यांनीं भरलेल्या रानांतून—वणव्यानें वेढलेल्या डोंगरांतून चवदा वर्षें पोट काढली.

वडिलांनीं मागितलीं म्हणून कर्णानेंच ना कवचकुंडलें काढून दिलीं अंगावरलीं?

त्या रामाप्रमाणेंच आपला बंडू आहे.

त्या पुंडलिकाप्रमाणेंच आपला पांडू आहे. आणि धाकट्या ताईला अजून कांहीं कळत नाहीं, परंतु ही अक्का अगदीं मायाळू आहे.

आठवतं का? आपण आजारी होतों. रात्रीं कण्हत होतों. सारीं मुलें अतिश्रमानें निजलेल्या आईजवळ झोंपलीं होतीं. फक्त आपणच जागे होतो.

भिंतीवरचें टिकटिकतें घड्याळ सेकंदा सेकंदाच्या अंतरानें आपल्या तापलेल्या डोक्याला टोले हाणीत होतें.

असह्य वेदनेनें आपण कण्हत होतों आणि तेवढ्याच असह्य वेदना सहन करीत दिवसभर धुणेंपाणी, स्वैंपाकउठीखरकटीं, मुलांचीं न्हाणीं, जेवणीं, करून झोंपली होती...

श्रमाच्या सागरांत निद्रेनें तिला एखाद्या दगडासारखें हलकें केलें होतें. त्या घरट्यांतला तो दगड माझ्यापासून किती किती दूरवर गेला होता.

कोणीतरी पुसतपास करावी म्हणूनच अपरात्रीं माणूस कण्हत असतो.

हाक मारली तर कोणीही उठतें. जवळ येतें. विचारपूस करतें.

तें तर आहेच... परंतु—

त्यांत काय गम्मत आहे. पुसटतें कण्हणें ऐकून जे जवळ येतात.

डोकें दाबूं का विचारतात.

पाय दाबूं का विचारतात.

लिंपशी करूं का विचारतात...

असें ज्या घरांत होतें, त्या घरांत दोनचार वर्षांत आजारीपण आलें नाहीं तर माणूस त्या मायेचा अनुभव घेण्याच्या हव्यासानें तरी आजारी पडल्याशिवाय राहणार नाहीं.

त्या घरांत अशीं ममतेचीं माणसें नाहींत त्या घरांतील आजाऱ्याला बहात्तर भडकमकरांनीं लिहिलेलें प्रिस्क्रिप्शन कोळून पाजलें तरीहि गुण येणार नाहीं.

परंतु आपली गोष्ट तशी नव्हती.

ती निजली होती... कबूल.

निजली असेल. दमली होती.

पण म्हणून काय माझें म्हणणें फुकट गेलें काय? छे! छे!

अक्का जागी झाली. आपल्या उशागती आली. आणि डोक्यावरून हात फिरवूं लागली.

पहांटेपर्यंत... साऱ्यांना जाग येईपर्यंत आपल्या मांडीवर माझें डोकें घेऊन ती बसली होती.

अशी आहे म्हटलं ही अक्का!

आपल्या मिटल्या डोळ्यांतून एकाएकी आंसवें बाहेर पडत आहेत असें अण्णांच्या प्रत्ययाला आलें. त्यांनीं अक्काकडे पाहिलें.

ब्रह्मपुत्रेला मिळावयासाठीं सरस्वती तिकडून आवेगानें निघाली होती.

एवढ्यांत आई देवघराच्या दाराशीं आली. तिनें आंत डोकावलें. परंतु न डोकावल्यासारखें करीत ती तेथून जराशी दूर गेली. आणि म्हणाली,

"दहा वाजायला आले बरं का? अजून जेवायचं आहे, ऑफिस आहे. मुलं पानावर बसून वाट पहात आहेत. उठ अक्का. झालें ना गंध उगाळून, रांगोळ्या काढ."

मग अक्का डोळे कोरडे करून बाहेर आली.

"तिकिटाचं लक्षांत आहे नं?" आईनें पुन्हां आठवण दिली.

टरलेल्या वेळीं ते ऑफिसांत जाऊन पोहोंचले.

लक्ष अक्काकडे ठेवूनहि ते करीत असलेली आंकडेमोड हातवशीमुळें बरोबर होत होती. असे दोन तास गेले, तीन तास गेले... मग...

आणि मग अण्णा साहेबाच्या खोलींत गेले.

आणि ऑफिसमधून ते बाहेर पडले. आणि मग रस्त्यावरलें पहिलें पाऊल पुढें टाकलतां टाकलतां ते एकदम गंभीर झाले. परंतु ते घराकडे वळले नाहींत. आपल्या ओळखीच्या घड्याळजीच्या दुकानांत ते गेले.

दहा मिनिटांनीं हातांतलें सोन्याचें घड्याळ सोडून आणि मोजलेल्या नोटा खिशांत घालून खालीं उतरले ते.

पुन्हा ते गंभीर बनून रस्त्यावरून चालूं लागले.

त्या घड्याळाचें वजन तें किती होतें? परंतु आपला डावा हात एकदम हलका झाल्यासारखें त्यांना वाटूं लागलें. चालतां चालतां त्यांनीं आपल्या हाताकडे पाहिलें. सोन्याच्या साखळीचा वळ अजूनहि मनगटावर उमटलेला होता.

त्या वळाकडे—त्या हाताकडे—पहाण्यांत आतां कांहीं अर्थ नव्हता.

त्यांच्या मनांतून अक्काचा हात शृंगारावयाचा होता. वास्तविक तिच्या लग्नांत मोठें आणि चांगलें स्थळ मिळालें म्हणून त्यांनीं आधींच आपल्या आवांक्याबाहेर खर्च केला होता. परंतु तो खर्च (पान १६४ पहा)

"एल के" टाइप प्रेस

# भारतांत मशिन-टुल्स बनतात !

तंतोतंत मोजमापें आणि सुबक घडण मिळण्यासाठीं तैयार केलेली भारतांतील पहिलीच आणि अद्यावत् मशीन टुल्सची ही पलटण आज औद्योगिक क्षेत्राच्या आघाडीवर आहे. 'म्हैसूर किर्लोस्कर' निर्मित हीं यंत्रें कारखान्यासाठीं अधिक कार्यक्षम, टिकाऊ आणि कौशल्यपूर्ण कारागिरीसाठीं उपयुक्त आहेत. भारतांत ही मशीन टुल्स अजोड आहेत.

HARIHAR No1

"हरीहर" नं. १ लेथ

MK

## किर्लोस्कर मशिन टुल्स

TOM & BAY (ADVT.) LTD. (R)

अनुक्रमणिका

## शेअर्स! माफ करा महाराज!!

The
GREAT INVESTMENT TRUST Co
LIMITED.

Share Certificate No.

This is to certify that ... 5% Cumulative ...
the Registered Holder of ...
Rupees one each, hundred numbered ...
subject and Memorandum and Articles of Association
and there has been paid in respect of cash of such share

Managing Director
Director

*तरीपण—*

### या कंपनीच्या शेअर्समध्यें रक्कम गुंतविणं फायद्याचें कां आहे?

— वैशिष्ट्यें —

- संचालक मंडळांतील सर्व सभासदमंडळी कापडविषयक व्यवसायांत मुरलेली अनुभविक आहेत.
- कंपनीच्या प्रारंभापासून व्यवसायतज्ज्ञ संचालकांच्या सल्ल्यानें खरेदीविक्रीचे व्यवहार हाताळले जातात. साहाजिकच या बाब-तींत अनाठायी खर्च होण्याची धास्ती नाहीं.
- कंपनीचे मॅनेजिंग एजंटस्, त्यांना कायदेशीर रीत्या घेतां येईल असें खरेदीविक्रीवरील कमिशन घेत नाहींत. त्यामुळें लाखों रुपयांची बचत होऊन त्याचा लाभ शेअरहोल्डर्सना मिळणार आहे.
- कामगार वर्गाचा एक प्रतिनिधी संचालक-मंडळावर घेण्याची प्रथा ही कंपनी नव्यानें सुरू करीत आहे. हेतु हा कीं कामगा-रांच्या अडचणी वेळोवेळीं दूर व्हाव्यात. त्यामुळें उत्पादन वाढण्यास मदत होईल असा विश्वास आहे.

उपरोक्त वैशिष्ट्यें लक्षांत घेतां, कंपनीची उभारणी किती भक्कम पायावर झाली आहे हें समजेल. अतएव कंपनीची आर्थिक भरभराट होईल असा भागीदारांना विश्वास वाटतां येईल.

होय, तुमचें सर्वांचें म्हणणें खरें आहे. अलिकडे शेअर्स... [illegible]

*अधिकृत भांडवल १ कोटी रुपये*

## श्री यल्लामा कॉटन, वुलन अँड सिल्क मिल्स कंपनी लि.

(मॅनेजिंग एजन्टस्: आंबेरकर कॉर्पोरेशन (इंडिया) लि.)

मिल्स: तोलहुनसे (म्हैसूर स्टेट)

रजिस्टर्ड ऑफिस: जयशंकर बिल्डिंग, दावणगिरी सिटी

TOM & BAY (ADVT.) LTD., (R)

अनुक्रमणिका

"आमची बायकापोरं — आमच्या चाळी!" अशी मुकंचे आरोळी सर्वत्र उठली —

# छोटीं वर्तुळं आणि मोठीं वर्तुळं




**माणूस मोठ्या वर्तुळांत एकदां गेला कीं छोट्या वर्तुळाला साफ विसरतो! काय मनुष्यस्वभावाची गंमत आहे!**

आज तुम्हांला मी जी गोष्ट सांगणार आहें ती गोष्ट म्हणजे दुसरं तिसरं कांहीं नाहीं. गिरगांव बॅकरोडवरल्या पितळवाला चाळ नंबर १ आणि पितळवाला चाळ नंबर २ या चाळींत रहाणाऱ्या लोकांच्या आयुष्यांतले चारपांच प्रसंग मी तुम्हांला सांगणार आहें. ही गोष्ट ऐकतांना तुम्ही म्हणाल, सामान्य चाळकरी आयुष्यांतले हे सामान्य आणि अगदींच क्षुल्लक प्रसंग हो सांगतोय तरी कशाला? हे प्रसंग अगदींच सामान्य आणि क्षुल्लक आहेत, जागतिक किंवा राष्ट्रीय घडामोडींच्या मानानं कांहींच नाहींत, हें मी एकदम मान्य करतों. पण सांगायचं कारण इतकंच कीं, वीस–बावीस वर्षांपूर्वी पितळवाला चाळ नंबर २ मध्यें मी रहात होतों आणि परवां सहज त्या चाळींतल्या जीवनाचा विचार करीत पडलों असतां हे प्रसंग एका-मागून एक आठवले. याचा अर्थ असा नव्हे कीं, आज एक घडला, उद्यां एक, परवां एक असे ते एकामागून एक घडले होते. छे छे! तसं मुळींच नाहीं. कांहीं प्रसंग एकदोन महिन्यांच्या अंतरानें घडले असतील तर कांहीं वर्ष दोन वर्षांच्या अंतरानेंही घडले असतील.

मी त्या चाळींत होतों तेव्हां कितीतरी प्रसंग दररोज हरघडीं घडत होते. पण सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे हे चारपांचच एकदम आठवले. यांचाच अर्थ हा कीं य चारपांचांना एकत्र आणणारं कांहीं तरी सूत्र होतं, आणि तें माझ्या ध्यानांत आल्याबरोबर मी स्वतःशीं उद्गारलों, 'काय मनुष्यस्वभावाची गंमत आहे!'

तुम्ही म्हणाल, एवढी ही प्रस्तावना करण्यापेक्षां काय ती गंमत सांगून टाका कीं. तेंच करणं बरं नव्हे असं मला वाटतं. थोडी कळ सोसून सर्व प्रसंग तुम्ही ऐका — कदाचित् मला आढळली त्यापेक्षांही जास्त गंमत तुम्हाला आढळेल. तेव्हां आतां वेळ न काढतां ते प्रसंगच एकदम सांगायला सुरुवात करतो. म्हणजे झालें.

माझे आईवडील कोंकणांत होत. मॅट्रिक होऊन इलेक्ट्रिशियन आणि वायरमनची परीक्षा पास होईपर्यंत माझा वडीलभाऊ, पितळेवाला चाळ नंबर एकमधल्या तळमजल्यावर रहात होता. त्याच्याकडेच मी रहात होतों. दादा, वहिनी मी आणि त्यांचीं दोन मुलं—तीन वर्षांची वेबी आणि दीड वर्षांचा मुलगा रोंम्या एवढीं माणसें आम्ही एका खोलींत रहात होतों. दादा म्युनिसिपालिटीच्या शाळेंत मास्तर होता. पगार पुरत नाहीं, हेड-मास्तर छळतात, म्हणून सदानूकदा तो कुरकुरत असे. चोवीस तास किरकिर करणाऱ्या रोंम्याला संभाळून धुणीं भांडीं, सैंपाक करतां करतां वहिनी कटकुटील यायची आणि नेहमीं आदळ आपट करायची. दोघेंही माझ्यावर चडफडायचीं, कधीं नीट बोलायचीं नाहींत आणि दादा तर जरा कांहीं निमित्त सांपडलं कीं मला चांगलंच बडवून काढायचा.

एकदां गणितांत माझा पहिला नंबर आला होता म्हणून मोठ्या ऐटीनं माझं प्रगतिपुस्तक दादापुढं सही करायला मीं नेलं, कौतुक करणं दूरचं राहिलं, सही करून पुस्तक बाजूला भिरकावून देत दादा म्हणाला, "त्यांत काय मोठंसं—कुणी तरी पहिला येतोच !"

एकदां मी जेवायला बसलों होतों. वहिनी कांहीं तरी धुणं झटकीत होत्या. इतक्या जोरानं त्यांनीं झटकलं कीं माझ्या ताटांत जमिनीवरचा केर उडाला. "हें काय वहिनी, माझ्या जेवणांत केर उडाला ना ?" मी ओरडलों. दादा बाहेर गॅलरींत उभा होता. तो तितक्यांत आंत आला. वहिनीनं रडून ओरडून एकच गिल्ला केला. 'जरा कुठं केर उडाला तर तुला दिसत नाहीं कां, तुझे डोळे फुटले कां म्हणून नाहीं नाहीं त्या शिव्या विनूभावोजींनीं मला दिल्या,' असं दादाला सांगून त्या थयथयाट करूं लागल्या. मी 'नाहीं,' 'नाहीं,' म्हणत असतां कोंपऱ्यातली काठी घेऊन 'बोलशील तिला पुन्हा असं ?' असं म्हणत दादानं माझ्या पाठीवर वळ उठेपर्यंत मला झोडून काढलं. जगांत माझे कुणी एक नंबरचे शत्रू असतील तर ते दादा आणि वहिनी असं त्या वेळीं मला वाटे. म्हणूनच त्या दोघांनींहि माझी बाजू एकदां अगदीं कडकडून घेतली तो प्रसंग अजून माझ्या डोळ्यांसमोर उभा राहातो.

आमच्या शेजारच्याच पांच नंबरच्या खोलींत पांडोबा कंपाउन्डर रहायचे. त्यांच्या कुटुंबांत ते, त्यांची बायको, त्यांची म्हातारी आई आणि त्यांच्या बहिणीची मुलगी भिमी एवढीं माणसं होतीं. तिची आई लहानपणींच वारल्या-मुळें पांडोबाकडेच ती लहानाची मोठी झाली होती. पांडोबाच्या आईला आम्ही आजीबाई म्हणत असूं. उमामामींना, म्हणजे पांडोबांच्या बायकोला मूल नव्हतं आणि चाळिशीच्या जवळपास त्या आल्यामुळें मूल होण्याचीहि विशेष आशा नव्हती. पण त्यांच्या बोलण्याचालण्यांतल्या टसक्याला दोन्ही चाळींतलीं माणसं वचकून होतीं. पांडोबा गिरगांवांतल्या एका मोठ्या डॉक्टरचे कंपाउंडर होते. पण चाळींतले आम्ही सर्व लोक त्यांना डॉक्टरच म्हणत असूं. त्यांच्या घरचीं माणसंहि त्यांचा उल्लेख डॉक्टर म्हणूनच करीत. आणि पुढें आलेल्या पोटावरलं जाकीट खालीं ओढत तेहि डॉक्टरच्याच ऐटींत चालत. हें सगळं सांगायचं कारण म्हणजे ही मंडळी स्वतःला कुणीतरी समजणारी होती हें तुम्हाला कळावं इतकंच. आमच्या वहिनी आजीबाईंशीं बोलतां बोलतां सहज एकदां म्हणाल्या "आमच्या विनूभावो-जींचा आणि भिमीचा जोडा छान शोभेल नाहीं, आजीबाई ?"

त्या वेळेला आजीबाई कांहीं बोलल्या नाहींत. नुसतं 'हं' म्हणून आंत गेल्या. पण नंतर वहिनींच्या या सहज बोलण्याचा भलताच गाजावाजा आजीबाईनीं आणि उमामामींनी दोन्ही चाळींत—पितळवाला चाळ नंबर एक आणि पितळवाला चाळ नंबर दोनमध्यें केला. "आमची भिमी काय अशी रस्त्यांत पडल्येय का वाटेल त्याला द्यायला ? आम्ही आठशें रुपये देणार आहोंत ! आमच्या भिमीला डॉक्टर नवरा आम्ही करणार !" वगैरे वगैरे घोषणा आमच्या चाळींतल्या आणि समोरच्या पितळवाला चाळ नंबर दोनच्या चाळींतल्या मजल्यामजल्यावर, नळानळावर चांगल्या आठ-पंधरा दिवस दुमदुमत होत्या. दादाच्या कानावर हा प्रकार गेला तेव्हां तो संतापून वहिनीला म्हणाला, "कशाला त्या बाटलीविसळ्याची पोरगी हवी आपल्याला ? आमच्या विनूसारख्या तरतरीत मुलाला एकाहून एक चांगल्या पोरी पायाशीं सांगून येतील !"

"अहो, कुणी कुठं मागणी केली ?" वहिनी म्हणाल्या, "मीं सहज थट्टेनं म्हणालें. त्याचा केवढा गवगवा त्या म्हातारडीनं नि त्या गांवभवानीनं केला, गोरेपणाखेरीज कांहीं तरी आहे का त्या भिमींत ?" आमचे विनू-भावोजी कुठं नी ती पांढरी पाल कुठं ? हजार रुपये हुंडा पायाशीं ओतला तरी आम्ही तिला करणार नाहीं."

वहिनी कांहीं घरांतच बोलून स्वस्थ बसल्या नव्हत्या. उमामामींच्या घोषणांविरुद्ध वहिनींच्याही कांहीं घोषणा नळावर मधूनमधून उठत असत—

"बाटल्या भरतांना जन्म गेला, पण ऐट किती ! तीन तीन महिन्यांचं भाडं थकतं नि म्हणे आठशें रुपये हुंडा देणार ! तरी बरं, नवरा भोळा सांब मिळालाय म्हणून !" हा शेवटचा उल्लेख उमामामींबद्दल आणि वरच्या मजल्यावर रहाणाऱ्या एका इसमांबद्दल चाळींत नेहमीं कुजबुज चालायची त्याला उद्देशून होता. या कडाक्यांत मला विशेष वाटत होतं ते हें कीं मला चुकून कधींहि चांगला न म्हणणारा दादा आणि सांपडेल ती संधि साधून



अनुक्रमणिका

मार द्यायला लावणारी वहिनी दोघींही मला सावरीत, हुशार, देखण्या म्हणत होतीं. आणि माझ्यासाठीं पांडोबांच्या कुटुंबाविरुद्ध जीव तोडून लढत होतीं. हा लढा पाहून हीं दोन कुटुंबं पुन्हा कधीं एकमेकांशीं नीटपणें वागतील असं मला वाटलं नव्हतं. पण दोनचार महिन्यांनीं एक प्रकार घडला तो मला आठवतो.

वरच्या मजल्यावर पावशे पहिलवान रहात असे. पावशे पहिलवान ही एक व्यक्तीच होती. त्याचा मोठा भाऊ रघू पावशे एका गिरणींत स्टोअर-क्लार्क होता. बायको, तीन मुलं आणि हा धाकटा पहिलवान भाऊ हें रघू पावशाचं कुटुंब. पहिलवान कुठल्या तरी व्यायमशाळेंत मास्तर होता म्हणे. त्याचं लग्न झालेलं नव्हतं. मलमलीच्या सदऱ्याचं बटन न लावतां गळ्यांतली सोन्याची पेटी दाखवीत छाती पुढें काढून इकडे तिकडे पहात तो नेहमीं चालायचा. आपल्या छातीकडे पाहून लोक कांहीं तरी कुजबुजतात असा त्याचा कायमचा ग्रह झाला होता. त्याच्याकडे कुणी सहज पाहिलं, तरी "काय, रोखून काय पहातां ?" म्हणून तो उगाच गुरगुरायचा.

मला एकदां सर्दी झाली होती. घसा खवखवत होता. चाळींतून बाहेर पडतां पडतां मी खाकरलों. समोरून पावशे येत होता, त्याला मीं पाहिलंच नव्हतं. तो एकदम माझ्यासमोर येऊन उभा राहिला. माझा दंड धरून मला गदगदां हलवीत तो म्हणाला, "कुणाला पाहून खाकरतोस ? माझी थट्टा करतोस काय ? याद राखून ठेव. पुन्हा असं कांहीं केलंस तर हाडं खिळीखिळीं करून टाकीन !"

"अहो, मला खोकला झालाय, तुम्हांला मी पाहिलंही नव्हतं." असं कांहीं तरी पुटपुटत मीं सुटका करून घेतली.

पावशे वरच्या नळावर स्नान करायला आला कीं तळमजल्यावरच्या लोकांना खालीं नळ सोडायची सोय नव्हती. खालीं थोडासा नळ सोडला तरी वरचा नळ बारीक व्हायचा आणि पावशे ओरडाआरड करायचा. एके दिवशीं सकाळीं वहिनी चुलीकडे पोळ्या करीत बसल्या होत्या, मी कोंपऱ्यांत बसून अभ्यास करीत होतों, दादा नळावर आंघोळीस गेला होता. इतक्यांत नळाच्या बाजूला मोठा गलबला झालेला मला ऐकूं आला. आमच्या मजल्यावरच्या बायकापुरुष, मुलं नळाकडे धांवत होतीं. वहिनी आणि मी बाहेर धांवलों. दादाची खालीं आंघोळ चालू असतां वरच्या नळावर पावशे आला होता. नळ बंद करा, म्हणून त्यानं आरडाओरड केली. त्यानं कांहीं शिव्याहि हांसडल्या तेव्हां दादाहि कांहीं उलटून बोलला होता. खालच्या नळाकडून वरच्या नळाकडे एक मोठा पाइप गेला होता. आणि बाजूला मोकळी जागा होती. त्या पाइपवरून सरकत पावशे खालीं आला होता. आणि दादाची मानगूट त्यानें पकडली होती. वरच्या मजल्यावरची पुरुष मंडळी—पावशेचा भाऊ, दिघे, देशपांडे, नाना पितळे, गोविंदपंत बुधले—सगळे खालीं जिन्यावर येऊन खालच्या नळावरची मजा पहात उभे होते. आमच्या तळमजल्यावरचीही झाडून सारी मंडळी नळाकडे धांवली होती. पांडोबा कंपाउन्डर, सावर्डेकरबुवा, मिराशी दूधवाले दादाला सोडवीत होते. आजीबाई, उमामामी, मिमी, सावर्डेकरवहिनी आमच्या वहिनीच्या खांद्याला खांदा लावून उभ्या होत्या. आणि एकसुरांत ओरडत होत्या, "दोन रुपये भाडं जास्त देतात म्हणून ही वरची मंडळी अगदीं बंगलेवाली समजतात!"

जिन्यावर उभ्या असलेल्या वरच्या मजल्यावरच्या बायका म्हणत होत्या, "कधीं कधीं म्हणून बऱ्या बोलानं ही खालच्या मजल्यावरची मंडळी नळ बंद करीत नाहीं. एक कळशी भरून घ्यायला एक एक तास लागतो मेला !"



अनुक्रमणिका





"सदान् कदा हीं पाण्याचा त्रास—वीट आलाय अगदीं!" वरचे पुरुष बडबडत होते, "सदान् कदा तुम्हांला सर्व पाणी देऊन आम्ही काय पाण्याशिवाय तडफडायचं कीं काय!" पांडोबा मिराशी वगैरे खालचे पुरुष विचारीत होते. समोरच्या दोन नंबरच्या चाळींतल्या गॅलऱ्या एक नंबरच्या चाळींतला हा तमाशा पहाण्याकरितां स्त्रीपुरुषांनीं फुलून गेल्या होत्या. शेवटीं समोरच्या चाळींतले घारुअण्णा पराडकर आले आणि आमच्या दोन्ही मजल्यावरच्या लोकांची समजूत घालून त्यांनीं पेंचप्रसंग सोडवला.

वरच्या मजल्यावरचीं सोनार, कायस्थ वगैरे कुटुंबं आणि ब्राह्मण कुटुंबं यांच्यांत नेहमीं धुसफूस चालायची, पण या वेळीं सर्व मजला एक झाला होता. तळमजल्यावर आमच्या आणि पांडोबाच्या कुटुंबांतली तेढ पार वितळून गेली होती. आमच्या वहिनी वेणी चांगली घालतात म्हणून मिमी वेणी घालून घ्यायला त्यांच्याकडे यायला लागली, आणि उमामामींनीं वहिनींची जरीची चोळी शिवून दिली! खालचा मजलाहि वरच्यासारखाच एक झाला होता. मात्र या दोन मजल्यांत पुन्हा केव्हां चकमक झडेल, याचा नेम नव्हता. पण तोही प्रसंग टळला.

आमच्या पितळवाला चाळी कधींकाळीं बांधल्या होत्या कोण जाणे, त्या इतक्या जुनाट झाल्या होत्या कीं रस्त्यावरून एखादी मोठीशी लॉरी गेली तरी त्या गदगदां हलायच्या. मधूनमधून अफवा उठायच्या कीं म्युनिसिपालिटी त्या चाळी पाडायला लावणार. या अफवा उठल्या कीं लोक हवालदील व्हायचे. दहाबारा वर्षांत कांहींच झालं नव्हतं. अफवा उठली कीं चाळ नंबर दोनमध्यें वरच्या मजल्यावर रहाणारे घारुअण्णा पराडकर आपल्या पांढऱ्या मिशांवर हात फिरवीत गंभीरपणें सांगायचे, "मी आहें तोंपर्यंत कुणी कांहीं करीत नाहीं. तुम्ही स्वस्थ रहा!" दहाबारा वर्षांत खरोखरच कांहीं झालं नव्हतं. घारुअण्णा म्युनिसिपालिटीच्या कुठल्याशा खात्यांत हेडक्लार्क होते. त्यांचा पिंड मुत्सद्याचा होता. बोलणं थोडं आणि कृति मोठी अशी त्यांची ख्याति होती. दोन्ही चाळींत त्यांचं चांगलं वजन होतं. दोन्ही चाळींचा मिळून मधल्या जागेंत गणपति उत्सव व्हायचा त्याचे अध्यक्ष घारुअण्णाच असायचे. पण अलीकडे कांहीं वेगळाच प्रकार दृष्टीस पडत होता. घारुअण्णा कचेरींत जायला निघाले कीं आमच्या नंबर एकच्या चाळींतली पुरुष मंडळी त्यांच्याकडे संशयित नजरेनें पहात रहायची संध्याकाळीं परत येतांना ते दृष्टीला पडले कीं आमचे लोक एखाद्या कारस्थानी कटवाल्याकडे पहावं त्याप्रमाणें त्यांना टवकारून पहायचे. आणि एकमेकांना खुणाकरून कांहींतरी कुजबुजायचे. आमच्या चाळींतल्या बायकांच्या किंवा माझ्यासारख्या पोरांच्या हा प्रकार लक्षांत आला होता. पण काय झालंय तें कळत नव्हतं. एके दिवशीं तर मला धक्का बसला. दादांची मानगुटी धरणारा पावशे पहिलवान त्या दिवशीं संध्याकाळीं दादांच्या खांद्यावर हात ठेवून कांहीं तरी त्यांच्याशीं हितगुज करीत चाळींत शिरतांना माझ्या दृष्टीला पडला.

"तुम्हीं म्युनिसिपालिटींत मास्तर आहांत ना? तुमची कांहीं तरी ओळख असेलच कीं म्युनिसिपालिटींत?" दादांना तो म्हणत होता. तीन चार दिवसांनीं रात्रीचीं जेवणं झाल्यावर आमचा दादा, पांडोबा कंपाउण्डर, मिराशी दूधवाले, वगैरे तळमजल्यावरची मंडळी आणि गोविंदपंत बुधले, नाना पितळे, दिघे वगैरे वरच्या मजल्यावरची मंडळी पावशाच्या खोलींत बसून जोरजोरानें कांहीं तरी वादविवाद करीत होती, मी उगाच कांहीं तरी निमित्त काढून तिकडे घिरट्या घालीत होतों. निळ्या रंगाच्या कागदावरले दोन तीन नकाशे पांडोबा कंपाउण्डर सर्वांना दाखवीत होते. दांत–ओठ खाऊन पांडोबा सर्वांना सांगत होते, "अरे, घारुअण्णा काय समजलाय. आमचे डॉक्टरसाहेब कॉर्पोरेटर आहेत. डॉक्टरसाहेब माझ्या शब्दाबाहेर मुळींच नाहींत. घारुअण्णांचे चांगलेच दांत पाडतों!"

दुसऱ्या दिवशीं रात्रीं दोन्ही चाळींतल्या मंडळींची त्या वर्षीचा गणेशोत्सव करण्यासंबंधीं सभा होती. घारुअण्णा अर्थात् अध्यक्ष होते. त्या सभेंत झालेल्या हमरीतुमरीवरून सर्व संशयित हालचालींचं रहस्य बाहेर पडलं आणि नंबर एकच्या चाळींतल्या बायकापोरांनासुद्धां सर्व कांहीं कळून चुकलं. "घारुअण्णा आम्हाला मुळींच अध्यक्ष नकोत. यंदां नंबर एकच्या चाळीचा आम्ही वेगळा गणेशोत्सव करणार!" म्हणून आमची मंडळी ओरडत होती. "करा, करा. यंदां करून घ्या वेगळा उत्सव." नंबर दोनच्या चाळींतील माणसं म्हणत होतीं, "पुढच्या वर्षी उत्सव करायला तुमची चाळच शिल्लक उरत नाहीं!"

गिरगांव बॅकरोडवर एक नवा आडवा रस्ता करण्याकरितां म्युनिसिपालिटी पितळवाला चाळींपैकीं कुठली तरी एक चाळ पाडण्याच्या विचारांत होती, आणि पाडायची तर एक नंबरची चाळ पाडावी अशी खटपट घारुअण्णा पराडकर करीत होते, हेंच तें रहस्य होय. हें कळल्यापासून आमच्या नंबर एकच्या चाळींतले लोक घारुअण्णांना आणि त्यांच्याबरोबर नंबर दोन चाळींतल्या सर्व लोकांना हाणून पाडायला सज्ज झाले होते. आमच्या नंबर एक चाळींतला तळमजला आणि वरचा मजला हा भेद केव्हांच नष्ट झाला होता. नंबर एक आणि दोन चाळींमध्यें इकडचें खरकटें तिकडे भिरकावणें वगैरे शीतयुद्धाचे प्रकार सुरू झाले होते. पावशे पहिलवान तर हड्डी नरम करणें वगैरे ऊष्ण युद्धाच्या गोष्टी बोलत होता.

तोंच मुंबईंत हिंदुमुसलमानांचा दंगा सुरू झाला. नळबाजाराकडून बॅकरोडवर मुसलमान गुंडांचा हल्ला आज रात्रीं होणार, उद्यां पहांटे ते निश्चित येणार, वगैरे अफवा उठूं लागल्या. पितळवाला चाळी तर बॅकरोड आणि नळबाजाराच्या आघाडीवर होत्या. दोन्ही चाळींतल्या मंडळींची तांतडीची बैठक झाली. सुरवातीलाच घारुअण्णांनीं एक आनंदाची बातमी सांगितली, कीं बॅकरोडवरील नवा आडवा रस्ता करण्याचा बेत म्युनिसिपालिटीनें बेमुदत तहकूब केला. दोन चाळींच्या संयुक्त संरक्षण समितीचे अध्यक्ष घारुअण्णांनाच एकमतानें निवडण्यांत आलें. दोन्ही चाळींतल्या तरुणांचें एक स्वयंसेवक दल तयार करण्याचें ठरून पावशे पहिलवानाला दलनायक नेमण्यांत आले. लाठ्या विकत घेण्याकरितां जागच्याजागीं पन्नास रुपये गोळा झाले. रात्रीं दहा ते सकाळीं सहापर्यंत गस्त घालण्याकरितां स्वयंसेवकांच्या पाळ्या ठरविण्यांत आल्या. नंबर एक कीं नंबर दोन हा विचारसुद्धां कुणाच्या मनांत आला नाहीं. "पितळवाला चाळकऱ्यांचं सर्वांगीण संरक्षण!" "आमचीं बायकापोरं—आमच्या चाळी!" अशी एकच आरोळी उभी उठत होती.

पितळवाला चाळींतल्या वीसबावीस वर्षांपूर्वीच्या माझ्या जीवनाचा विचार करीत पडलों असतां हे सर्व प्रसंग मला एकामागून एक आठवले. आणि मी स्वतःशीं म्हणालों, काय मनुष्यस्वभावाची गम्मत आहे महा! माणूस मोठ्या वर्तुळांत गेला कीं छोट्या वर्तुळांतलं विसरतो कीं काय! काय आहे कीं नाहीं गम्मत!







अनुक्रमणिका



स. आ. जोगळेकर

# संकेत

संकेत म्हणजे खूण, इशारा किंवा भेटीचें आश्वासन
आणि संकेतस्थान म्हणजे प्रियांनीं
भेटीसाठीं ठरविलेलें ठिकाण —
**( RENDEZVOUS )**

[ शालिवाहन वंशांत पहिल्या शतकांत हाल नांवाचा राजा होऊन गेला. त्यानें समकालीन कवींच्या एक कोटि गाथा एकत्रित करून त्यांतील सातशें निवडक सुभाषितांचा संग्रह केला. या संग्रहाचें नांव गाथाकोष किंवा गाथासप्तशती. पहिल्या शतकापासून हा सुभाषित संग्रह हिंदुस्थानांतील कवींना स्फूर्ति देता झाला आहे. प्राकृत वाङ्मयाला ललामभूत असलेल्या या ग्रंथाचा परिचय श्री. जोगळेकर यांनीं यापूर्वींच 'दीपावली'च्या वाचकांना करून दिलेला आहे. या ग्रंथाचें संपादन व भाषांतर पुरें झालेलें असून तो प्रसिद्धीच्या मार्गावर आहे. त्याच्या प्रस्तावनेंतील एक कडवें येथें दिलें आहे.]

गाथासप्तशतींत संकेतांचे व संकेतस्थानांचे अनेक उल्लेख आलेले आहेत. संकेत म्हणजे खूण, इशारा किंवा भेटीचें आश्वासन; संकेतस्थान म्हणजे प्रियांनीं भेटीसाठीं ठरविलेलें ठिकाण ( rendezvous ). गाथासप्तशतींतील संकेतांचे व संकेतस्थानांचे बहुतेक सर्व उल्लेख व्यभिचाराशीं संलग्न आहेत. यांपैकीं कांहीं उल्लेख स्पष्ट आहेत आणि बरेच ध्वनित आहेत; कांहीं टीकाकारांनीं मूळ गाथांवर लादलेले आहेत. गाथासप्तशतींतील वचनें शृंगारिक व वक्रोक्तिपूर्ण आहेत आणि गाथांच्या नायिका व्यभिचारिणी आहेत असें टीकाकारांनीं गृहीत धरलें आहे. या पद्धतीनें अशा उल्लेखांची संख्या सहज आणखी फुगवतां येण्यासारखी आहे.

संकेत ठरविणें व संकेतस्थान निश्चित करणें हें कार्य दूतीचें किंवा सखीचें. परिचितांची व अपरिचितांचीहि अनुनयाला अनुमति मिळविण्यापासून त्यांच्या प्रीतीची परिपूर्ति होईपर्यंतच्या सर्व योजना त्याच ठरवीत असत. उभयतांना सोयीची वेळ व भेटीसाठीं निर्धास्त असें स्थळ यांची निश्चिति त्याच करीत असत. कांहीं अनपेक्षित कारणांमुळें संकेताचा अगर संकेतस्थानाचा भंग झाला तर शक्य तोंवर इतरत्र संकेत ठरविण्याचें कार्यहि त्यांचेंच. यासारख्या सूचना त्या नायक व नायिका यांना सांकेतिक भाषेंत देत. वेळप्रसंगीं संकेतस्थानाभोंवतीं टेहळणी ठेवण्याचें कामहि दूतीला किंवा सखीला करावें लागे. प्रत्यक्ष परिचय झाल्यानंतर पुढल्या भेटीची वेळ व स्थळ हीं नायक-नायिकांनीं आपसांत परस्पर ठरवावींत हें मनुष्यस्वभावाला धरून आहे. स्वयंदूती नायिकांनीं इच्छित नायकाला संकेत दिल्याचीं आणि तो कधीं सफल तर कधीं विफल झाल्याचीं उदाहरणेंहि गाथासप्तशतींत आहेत.

येथें दूतींबद्दल थोडी माहिती सांगितली पाहिजे.

वात्स्यायनानें दूतीकर्मासाठीं कोणाची योजना करावी याचा तपशील ( कामसूत्र. अधि. ५, अध्याय ४ ) दिलेला आहे. विधवा, ईक्षणिका ( भविष्य सांगणारी ), भिक्षुकी ( भिकारीण ) व शिल्पकारिणी. रतिरहस्य

(परिच्छेद १३-२०३), अनङ्गरङ्ग (अध्याय ८. ९६), पञ्चसायक (चतुर्थसायक २१) आणि नागरसर्वस्व (परिच्छेद ९.८) या कामशास्त्रावरील ग्रंथांत दूतीकर्माला योग्य असे पुढील वर्ग नमूद केलेले आहेत. प्रव्रजिता (जैन-संन्यासिनी), धात्री (दाई), संबंधिनी, सखी, सैरन्ध्री (अंतःपुरवासी), चेटी, शेजारीण, गवळण, कोष्टीण, शिंपीण, धोबीण, माळीण, न्हावीण, मणिहारिणी (कासारीण), फेरीवाली आणि नटी. अनङ्गरङ्गांत प्रतिगेहिका—घरोघर जाणारी—हा एक वर्ग नमूद केलेला आहे. स्त्रियांच्या समरंभांसाठीं स्त्रियांना आमंत्रणें देत हिंडणारी ही निरोपी असावी. दूतीकर्मप्रकाशांत (काव्यमाला, गुच्छक १३) एकवीस दूतींची यादी दिलेली आहे. यशोधर सांगतो : (वात्स्यायन : कामसूत्र. अधि. १ अध्याय ६, सूत्रें ३७–३८) स्त्रियांना परगृहीं जाऊन तेथील स्त्रियांना वश करावयास मिळते तशी संधि पुरुषांना मिळत नाहीं. यासाठीं या कर्मासाठीं दूतींची योजना करावयाची. वात्स्यायनाची यादी त्रोटक आहे. समाजाची रचना संकीर्ण होऊं लागली तसतशी ही यादी वाढूं लागली. या किंवा तत्सम वर्गांतील स्त्रिया आजहि दूतीकर्म करीत असतात असें जाणते सांगतात आणि या विषयावरील परदेशी लेखकहि.

गाथासप्तशतीवरील टीकेंत गंगाधरानें संकेतस्थानांबद्दल दोन उतारे उद्धृत केलेले आहेत. पहिला उल्लेख चौथ्या गाथेच्या प्रस्तावनेंत आलेला आहे. या गाथेचा सरळ अर्थ असा :

'पहा, कमळाच्या पानांमध्यें बगळी एकाकी व निश्चल बसलेली आहे. जणूं निर्मल पाचूच्या पूजापात्रांत चंदनासाठीं जोडशिंपली ठेवावी, तशी ती शोभत आहे.'

जेथें कमल तेथें जल, बगळी निश्चल त्याअर्थी तें स्थान निर्जन व मनोरम; अर्थात् मनसिजोद्दीपनाला व दीर्घरताला अनुकूल; असेंच कवीला सुचवायचें आहे असें गृहीत धरून गंगाधरानें येथें सिद्धपण्डित कोक्कोक याच्या रतिरहस्यांतील पुढील श्लोक उद्धृत केलेला आहे :

> कल्लोलिनीकाननकन्दरादौ दुःखाश्रये चार्पित चित्तवृत्तिः ।
> मृदुक्रमारंभमभिन्नधैर्य श्लथोपि दीर्घं रमते रतेपु ॥

प्रस्तुत विषयापुरतें आपल्याला या श्लोकाच्या पहिल्या चतुर्थांशाकडेच पहावयाचें आहे. वाहत्या नदीतीरावरील कुञ्ज, वनांतील गर्द राई व पर्वतांवरील गुहा हीं सोइस्कर सुरतस्थानें होत असें कोक्कोकाचें सांगणें आहे. यावरून गंगाधराचें सांगणें आहे कीं, या गाथेंतील उल्लेख संकेतस्थानाचाच असला पाहिजे! गंगाधराचाच नव्हे, गाथासप्तशतीवरील अनेक टीकाकारांचा व ही गाथा उद्धृत करणाऱ्या अनेक साहित्यशास्त्रकारांचा असाच आग्रह आहे. काव्यप्रकाश, साहित्यदर्पण वगैरे ग्रंथांत या गाथेच्या अभिप्रेत अर्थांच्या अनेक छटा चर्चिलेल्या आहेत. त्या वाचून चवळलेले श्री. राजारामशास्त्री भागवत (प्राकृत भाषेची विचिकित्सा. आवृत्ति दुसरी. पृ. ६४) म्हणतात, "अलंकारानें स्वमंगपणा आलेली स्वभावोक्ति उघड झळकत असतां मुद्दाम आडवाटेनें जाऊन जारिणीचा उजू किंवा दासीच्या द्वारां जाराशीं संबंध लावणाऱ्या काव्यप्रकाशकारास शृंगाराची कावीळ झाली असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईलशी वाटत नाहीं." टीकाकारांनीं अनेक गाथांवर लादलेल्या शृंगाराबद्दल अशीच टीका करतां येण्यासारखी असली तरी गाथासप्तशतींतील शृंगाराकडे शास्त्रीबुवांनीं पक्षपाती डोळेझांक केलेली आहे असें दिसतें. गंगाधरानें संकेतस्थानाबद्दल केलेला दुसरा उल्लेख आठव्या गाथेच्या टीकेंत आलेला आहे. ह्या गाथेचें भाषांतर असें :

"आत्या, गांवाला शोभा देणाऱ्या तळ्यांतील कमळांची थंडीनें कोण दुर्दशा केली आहे? तिळाचें सुंदर पीक कापल्यावर नुसते बुडखे राहातात ना, तसे तळ्यांतल्या कमळांचे दांडे मात्र राहिलेले आहेत."

गंगाधर सांगतो, तिळाचें शेत व कमळांचें तळें हीं शानदार संकेतस्थानें होत; सबब सूचना अशी कीं, तिळाच्या फुलदार शेतांत संकेत टरला होता, पण पीक कापावयास शेतकरी तिकडे जाणार आहेत, सबब कमळांच्या तळ्याजवळ संकेत ठरविला आहे, थंडी असल्यामुळें तिकडे कोणी फिरकणार नाहीं! दुसरा एक टीकाकार सांगतो कीं या दोन्ही ठिकाणीं जमणार नाहीं म्हणून घरींच संकेत ठरविला आहे अशी या गाथेंत सूचना आहे! गाथासप्तशतींतील अनेक संकेत असे टीकाकारांनीं निर्मिलेले आहेत. गाथासप्तशती हें खरेंखुरें व अकृत्रिम जानपदवाङ्मय आहे. हें वाङ्मय लोकांनीं, लोकांकरितां निर्माण केलेलें आहे. त्यांतील भावना, विचार व प्रसंग प्रत्यक्ष जीवनांतून निवडलेले आहेत. उलटपक्षीं गाथासप्तशतीवरील टीका आणि साहित्यशास्त्रकारांनीं निवडलेल्या गाथांवरील त्यांच्या टीपा या पण्डितांनीं पण्डितांकरितां लिहिलेल्या आहेत. त्यांमध्यें पण्डितांच्या भावना, विचार व विद्वत्ता प्रकट झालेलीं आहेत. पण्डितांच्या कल्पकतेचें कौतुक करावें, त्यांचे सर्वत्र निष्कर्ष मान्य करूं नयेत, एवढेंच.

गाथासप्तशतींत संकेतांचे व संकेतस्थानांचे प्रत्यक्ष व संज्ञापूर्वक असे उल्लेख फारच थोडे आहेत. क्र. ३१८ ह्या गाथेंतील नायिकेचा संकेत वेळूच्या वनांत टरला होता. वन विस्तृत होतें म्हणून म्हणा किंवा नक्की बेट तिच्या ध्यानांत राहिलें नाहीं म्हणून म्हणा, तिची व नायकाची चुकामूक झाली. कवि सांगतो, ठेव पुरून ठेवावी आणि जागेचें विस्मरण व्हावें, म्हणजे होते तशी तिची अवस्था झाली. क्र. ३६५ व ६२६ या गाथांतील संकेतस्थानें कुञ्जांत आहेत आणि हंगाम ग्रीष्माचा आहे. वाळलेला पाचोळाहि चुरगळून आवाज होऊं नये म्हणून नायिका चोरपावलांनीं चालली आहे. क्र. ९५८ ही गाथा अनधिकृत असली तरी तिची धाटणी अस्सल-बरहुकूम आहे. गोदावरीच्या कांठावरील मधूकांच्या मोहरलेल्या शाखा फुलांच्या भारानें जमिनीपर्यंत लवलेल्या आहेत. कवि सांगतो, हें सोइस्कर संकेत स्थान आहे.

गाथासप्तशतींतील संकेतस्थानांचें वर्गीकरण केलें असतां दिसून येतें कीं त्यांतील बहुसंख्य स्थानें खेडगांवांच्या परिसरांतील आहेत आणि संकेत ग्रामीण-जीवनाशीं संबद्ध असे आहेत. शेतांतील विशेष मेहनतीचीं कामें

पुरुषांनीं करावयाचीं आणि काम करणारांना न्याहारी पोंचविणें, शेताची राखण करणें, कपाशीचीं बोंडें काढणें, वगैरे हलकीं कामें स्त्रियांनीं करावयाचीं अशी पद्धत हल्लींप्रमाणें त्या काळींहि प्रचलित होती. हीं कामें करीत असतांना हलिक स्त्रियांना संकेतांच्या संधी सहज मिळत असत. शेतावर दुपारची न्याहारी घेऊन आलेल्या स्त्रीला पाहून नवख्या शेतकामगाराची इतकी धांदल उडाली कीं, जुंवाचा कासरा सोडण्याऐवजी त्यानें बैलांच्या वेसणीच सोडल्या! पिकांची राखण करणाऱ्या गोपींचे अनेक उल्लेख आलेले आहेत. क्र. ९ या गाथेंत सखीनें संकेतस्थान बदलल्याची सूचना दिलेली आहे. शालिक्षेत्रांत संकेत ठरला होता, पण पीक तयार झाल्यामुळें कापणीसाठीं शेतकरी तिकडे वावरत आहेत असें समजल्यामुळें नायिका खिन्न झाली. तिच्या चतुर व कार्यक्षम सखीलाहि शेतकऱ्यांच्या हालचालींची बातमी लागलेली होती. तिनें लगोलग नायकाची भेट घेऊन शणवाटिकेंत संकेत ठरविला आणि नायिकेची भेट घेऊन तिला सांगितलें कीं, साळीचें पीक पांढुरकें झालें म्हणून तूंहि अशी फिकट कां झालीस? पहा, पिंवळ्या फुलांनीं डवरलेलें तिळाचें शेत कसें थटून सज्ज झालेल्या नटीसारखें शोभत आहे!

खेडेगांवांत तरुणींना संकेतासाठीं ज्या सवलतींचा व सवडींचा उपयोग करतां येई त्या नगरच्या नारींना उपलब्ध नसल्यामुळें यांना वेगळ्या युक्त्या योजाव्या लागत. क्रमांक २३७ या गाथेच्या नायिकेनें विंचू चावल्याचें ढोंग केलें आणि औषधोपचाराच्या निमित्तानें तिचा दण्ड धरून तिला तिची सखी वैद्याच्या घरीं घेऊन गेली. सखी वैद्यराजांच्या बरोबर पूर्वीच संकेत ठरवून आली होती! शहरांत व भोंवतीं सारखी रहदारी असल्यामुळें येथील संकेतस्थानें बहुंशीं घरांच्या अंतर्भागांत असत; किंबहुना जेथें गृह हें संकेतस्थान आहे तो संकेत नागरिकांचा आहे, असें सर्वसाधारण अनुमान बसविण्यास हरकत नाहीं. कामकाजासाठीं किंवा व्यापारधंद्यां-करितां नागरिकांना पुष्कळ वेळ घराबाहेर काढावा लागे अगर देशींपरदेशीं वारंवार प्रवासाला जावें लागे; त्यांच्या गैरहजेरींत येथील संकेतिकांना अनायासें सुरक्षित संकेतस्थान उपलब्ध होई. क्रमांक ३३५ या गाथेची स्वयंदूती नायिका शेजाऱ्याला सांगते, 'शेजाऱ्या जागा रहा, कारण हल्लीं चोरांची आवई आहे. आजची रात्र अंधारी आहे, माझे पति प्रवासाला गेलेले आहेत आणि घरांत माझ्याशिवाय कोणीहि नाहीं.' कामकाजानिमित्त शहरांतले लोक बाहेरगांवीं जात त्याचप्रमाणें बाहेरगांवचे लोक उद्योगधंद्या-साठीं किंवा ख्यालीखुशालीसाठीं शहरांत येत आणि कांहीं लागाबांधा लावून एखाद्या ओळखीच्या घरीं मुक्कामाची सोय करीत. चारदोन वेळां ये जा झाली कीं साहजिकपणेंच घरांत थोडीबहुत घसट झाल्यामुळें तेथील परिस्थित्यनुसार त्यांची बरीवाईट सोय होत असे. क्रमांक २५४ च्या गाथेच्या नायिकेच्या कटाक्षाचें प्रोत्साहन मिळाल्यामुळें आगाऊ पथिकानें अंगणाऐवजी ओसरीवर पथारी टाकली. क्रमांक ६६७ या गाथेच्या नायि-केनें तर रातांधळ्या पथिकाला आपलें शय्यास्थान दिवस मावळण्यापूर्वीं दाखवून ठेवलेलें आहे. पतीच्या गैरहजिरीचा असती असा फायदा घेत आणि ऐन वेळीं किंवा आकस्मिकपणें तो परत आला तर त्याचेंहि समा-धान होईल अशीं निमित्तें निर्माण करण्याइतकें चातुर्य त्याच्या अंगीं असे. परक्या घरांत पुरुष पाहुण्यांची वर्दळ असे, त्याच प्रमाणें भरल्या घरांत स्त्रियाहि पाहुण्या म्हणून उतरत असत आणि घरांतील तरुण दूती-मार्फत त्यांचा डाव घेऊन त्यांच्या अनुकूलतेचा कधीं कधीं फायदा घेत असत. पाहुणीला परसांतल्या प्रियङ्गु मण्डपांत पाठवून प्रत्यक्ष भावजयीनें दूतीकर्म केलें आणि भाउजींना संकेत दिला, असा उल्लेख क्रमांक ९५३ या गाथेंत आढळतो. शहरांतील नायक व नायिका व त्यांच्या दूती चाणाक्ष असल्यामुळें दूरान्वित संकेतांचाहि आशय त्यांना समजत असे. दूतीनें नायिकेच्या प्रियकराला पथिकाच्या सबबीवर घरीं आणून अडगळीच्या कोठींत बसवून ठेवण्याचें आणि नायिकेला सूचना द्यावयाची, ती अशी: "शनिवर मुक्काम होतांतोंवर [illegible] धर्मानें व [illegible] आला तेव्हां गवताच्या शेकोटीनें पथिकाचें थंडीपासून रक्षण केलें. आता तो या नगरांत आला आहे. आतांपर्यंत तो [illegible] [illegible] राग[illegible]लेली थंडी त्याला त्रस्त करीत आहे."

वर सांगितलेला संकेत या गाथेंत ध्वनित आहे असें गंगाधर सांगतो. हा ध्वनि कसा निघतो हें आपल्याला समजत नाहीं आणि संकेत दिला, कसा समजला याचीहि कल्पना होत नाहीं. गंगाधर सांगतो म्हणूनच आपणहि तसें मानावयाचें! असले [illegible] सूचनांचा आड आलेला सांकेतिक अर्थ उमजण्याइतका चाणाक्षपणा अंगीं नसेल अशा नायक-नायिकांनीं संकेतांच्या भानगडींत पडूं नये हेंच श्रेयस्कर. नाहीं तर हिरमोड व फजिती हेच पदरीं यावयाचे. पहा: क्रमांक ७८० या गाथेच्या श्यामला नायिकेचें मन एका जवान हलिकपुत्रावर जडलें. संधि साधून तिनें त्याला सांकेतिक प्रतीक म्हणून एक जांभळाची डिकशी दिली, अशा अपेक्षेनें कीं, त्यानें जांभळीच्या झाडाजवळ आपली वाट पहात बसावें. नांगऱ्याला हा संकेत समजला नाहीं व डिकशी कानावर ठेवून दारू प्याल्यासारखा तो रस्तोरस्तीं झुलूं लागला व त्याचा त्याला सांगूं लागला कीं बघा, ही डिकशी मला अमूक बाईनें दिली! अज्ञानीपणामुळें स्त्री











हिरमोड झाला आणि फजीतीहि. हलिकपुत्रापासून एवढ्या चाणाक्षपणाची अपेक्षा करणें हाहि अडाणीपणाच !

गाथासप्तशतींतील संकेतस्थानांच्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष उल्लेखांच्या संख्या पाहतां दिसून येतें कीं, त्या काळीं नदीकांठ हें सर्वांत लोकप्रिय संकेतस्थान होतें; त्याच्या खालोखाल वेळूचीं वनें आणि भातशेतें; तळ्याच्या पाळी आणि ओसाड देवळीं. ह्या संख्या अशा असाव्यात हें तत्कालीन भौगोलिक व सामाजिक परिस्थितीशीं जुळतें आहे. अन्न व पाणी या मनुष्याच्या प्राथमिक गरजा. प्राथमिक कृषियुगांतील अन्नाचें उत्पादन जलाच्या उपलब्धीवर अवलंबून असल्यामुळें प्राचीन काळचीं वसतिस्थानें नद्यांच्या कांठाकांठानें असत. सकाळीं स्त्रीपुरुषांना स्नानासाठीं आणि सांठवणीचें आणावयाला किंवा धुणीं धुण्याला सकाळसंध्याकाळीं नदीवर जावें लागे आणि नदीकांठीं असलेल्या अनेक ठिकाणीं ही प्रथा अजून चालू आहे. धुण्यापाण्याचीच नव्हे, तर संकेतस्थानांचीहि. नदीवर सकाळीं स्त्रीपुरुषांची बरीच गर्दी असते, पण या वेळीं सर्व आपापल्या कामांत गर्क असतात आणि घरीं परतण्याच्या घाईंत असतात. दुपारीं नदीवर किंवा घाटावर फारशी रहदारी नसते. धुणीभांडीं घाटावर किंवा शेजारणीच्या हवालीं करून प्रेमळ तरुणींना जरा इकडे तिकडे चक्कर मारून व नंतर काम आटपून घरीं परत येण्याला पुरेसा अवसर सांपडत असे. म्हणूनच हें संकेतस्थान सर्वांत अधिक लोकप्रिय आहे. गोदातटाकींचा प्रदेश जगांत किंवा अखिल भारतांत सुंदर असें पुराणांत सांगितलें आहे; साऱ्या महाराष्ट्रांत हा मुलूख मनोहर आहे, हें खास. खुद्द गाथासप्तशतींत या परिसराबद्दल काय उद्गार काढलेले आहेत ते पहा : "गोदावर्याः कूलानि शीलोन्मूलानि"! आधुनिक धार्मिक पंडित मात्र गोदातीरच्या तीर्थांचीच प्रशंसा करीत असतात ! गाथासप्तशतींतील नदीकांठचीं संकेतस्थानें मुख्यत्वेंकरून नर्मदा, तापी व गोदावरी यांच्या कांठावर विखुरलेलीं आहेत. क्रमांक ८७९ या गाथेंत गोदावरीचा उल्लेख गिरिनदी असा केलेला आहे, हें ध्यानांत घेण्याजोगें आहे. महाराष्ट्राच्या मावळ भागांत भातशेती फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे; आणि वेळूचीं वनेंहि मुख्यत्वेंकरून याच भागांत अजूनहि आढळून येतात. महाराष्ट्राच्या कोंकण भागांत जेथें जेथें प्राचीन वस्ती आहे असे पुरावे मिळतात, तेथें तेथें तळीं, अजूनहि आढळून येतात. गाथासप्तशतींतील तळ्यांचे बहुतेक उल्लेख भातशेतीच्या भागांतले आहेत हें त्यांच्या साहचर्यावरून दिसून येतें. संकेतस्थानांच्या उल्लेखांच्या संख्येवरून तत्कालीन सामाजिक परिस्थितीबद्दलच नव्हे तर गाथासप्तशतीच्या निर्मितीबद्दलहि अनुमानें काढतां येतात, हें या विवेचनावरून दिसून येईल.

गाथासप्तशतींतील संकेतांच्या प्रत्यक्ष व प्रच्छन्न उल्लेखांवरून दिसतें कीं, त्या काळांतील ग्रामीण व्यभिचार बहुशीं दिवसांउजेडीं आणि उघड्या ठिकाणीं चालत असे. संकेतासाठीं अरण्यांत, कुंजांत विशिष्ट वृक्षाच्या आडोशाच्या जागीं किंवा शेतांत घरकामें सांभाळणाऱ्या ग्रामीण नायिकेला दिवसांउजेडींच जाणें शक्य असतें. पहा.—क्रमांक ८६९० या गाथेची नायिका सासुरवाशीण असून ती संकेतकर्त्या शेजारणीला सांगते कीं, कामाच्या रगाड्याखालीं उभ्या दिवसांत मला क्षणाचीहि उसंत मिळत नाहीं, संध्याकाळीं मात्र थोडीबहुत फुरसत असते, आणि सुचविते कीं याच सुमारास संकेत ठरला तर जमणें शक्य आहे, नाहीं तर नाहीं. नायिका वांकडें पाऊल टाकायला सज्ज झालेली असली तरी संकेतस्थानीं जातांयेतांचा मार्ग तिच्या चर्मचक्षूंना स्पष्ट दिसावयास हवा, नाहीं तर आडमार्गाला लागलेल्या संकेतिकेचा पाय आडजागीं मुरगळावयाचा व त्यामुळें संकेतभंग तर व्हावयाचाच आणि घरींदारीं बोभाटा व्हावयाचा तो वेगळाच !

नदीवर पाण्याला जाणें, दाराचा धक्का लागून घडा फुटला म्हणून पुन्हा पाणवठ्यावर जाणें, जंगलांतून लांकूडफाटा आणणें, अशीं दिवसांउजेडीं घराबाहेर पडण्यासाठीं सोइस्कर असलेलीं किती तरी निमित्तें ग्रामीण संकेतिकांच्या सेवेस हजर असत. गाथासप्तशतींतील संकेतस्थानांची निवड मुख्यत्वेंकरून त्यांच्या आजूबाजूच्या प्रदेशाच्या निर्जनतेमुळें करण्यांत आलेली असली तरी तेथें फारसा आडोसा नसावा हें उघड दिसतें. हल्लींच्या मानानें त्या काळीं लोकसंख्या कमी व लोकवस्ती विरळ, म्हणूनच वस्तीपासून फार लांबवर नाहींत अशीं थोडीबहुत तरी सुरक्षित व सोइस्कर संकेतस्थानें खेड्यापाड्यांच्या परिसरांत उपलब्ध होतीं. असें होतें तरीहि संकेतस्थानीं जोडीदाराची वाट पहात अगर साथीदारासमवेत बसलेल्या व्यक्तींचीं हृदयें व्यत्ययाच्या धास्तीनें धडधडत असत. पहा: वेळूच्या वनांत नायिका संकेतकाची वाट पहात बसली होती; तों पोपटांनीं कांहीं कारणामुळें चीत्कार केला; तो ऐकून व्यत्ययाच्या धास्तीनें नायिकेचें हृदय थरारलें (क्रमांक ८६८). करञ्जकुञ्ज (क्र. ५५३), गोदावरीच्या तीरावरील कुञ्ज (क्र. १७५) आणि अनामिक नदीकांठावरील कुञ्ज (क्र. १६७) या संकेतस्थानांभोंवतीं लुडबुडून संकेतांत व्यत्यय आणणाऱ्या, अतृप्त व लोलूप धार्मिकबुवाबद्दल त्या त्या गाथांच्या नायिकांनीं काढलेले तिरस्कारोद्गार पाहिले म्हणजे हीं संकेतस्थानें सकृद्दर्शनीं दिसतात तेवढीं निर्जन नसावींत असें प्रत्ययास येतें. व्यभिचारी मिथुनांचे संकेतस्थानीं, उघड्यावर व दिवसांउजेडीं चाललेले असेच कांहीं विलास पाहून प्राचीन पाश्चात्य प्रवाशांनीं आमच्या रीतरिवाजांचीं अतिरंजित वर्णनें तिकडे प्रसृत केलीं असावींत, आणि मला वाटतें, अशाच वृत्तांतावर विसंबून हेरोडोटसनें आपलें कुप्रसिद्ध विधान (Herodotus. III. 101) केलें असलें पाहिजे कीं, हिंदुस्थानांतले लोक जनावरांप्रमाणें उघड्यावर संभोगक्रिया करतात. नीतीच्या, धर्माच्या व समाजधारणेच्या दृष्टीनें व्यभिचार हा जितका हीन तितकीच शिष्टाचाराच्या दृष्टीनें उघड्यावरील संभोगक्रिया हीं गर्ह्य; मग ती मिथुनांना कितीहि प्रिय वाटो. म्हणूनच कल्याणमल्लानें रतिरहस्यांत सांगितलें आहे:

> वन्हिब्राह्मणपूज्यवर्गनिकटेनद्यांच देवालये
> दुर्गादौचचतुष्पथे परगृहेरण्ये श्मशाने दिवा ।
> संक्रान्तो शशिसंक्षयेथ शरदि ग्रीष्मे ज्वरार्तौ व्रते
> संध्यायांच परिश्रमेषु सुरतं कुर्यान्न विद्वान्कचित् ॥ ८-२५ ॥

"अग्नि, ब्राह्मण व गुरुजन, यांचे समीप; नदीकांठ, देवालय, किल्ला, चवाठा, परगृह, अरण्य व स्मशान या ठिकाणीं आणि दिवसां; संक्रान्तपर्वणींत, अमावास्येस व ग्रहणकाळांत, शरद् व ग्रीष्म ऋतूंत; ज्वर आलेला असेल ते वेळीं; व्रतकाळीं; संध्यासमयीं, श्रमांमुळें थकवा आलेला असेल अशा वेळीं, शहाण्यानें स्त्रीस भोग करूं नये." कल्याणमल्लाचें हें वचन पंधराव्या, किंवा फार तर चौदाव्या शतकांतील आहे. गाथासप्तशतीच्या काळांतहि शिष्टचाराचें असेच नियम अस्तित्वांत असणें असंभवनीय नाहीं. पण असे आचार पाळणारा आणि त्यांची शिकवण देणारा वर्ग अद्याप उत्क्रांत झालेला नव्हता, किंवा समाजनियंत्रण करण्याइतका समर्थ झालेला नव्हता, आणि ही शिकवण अद्याप खेड्यापाड्यांपर्यंत पोंचलेली नव्हती; अशा काळांत आणि राजकीय, धार्मिक व सामाजिक अस्थिरतेच्या काळांत गाथासप्तशतीची निर्मिती झालेली आहे हें आपण ध्यानीं धरलें पाहिजे.








ये बात है!

ही दीपावली
आणि नूतन वर्ष
आमच्या असंख्य ग्राहकांस
व हितचिंतकांस
सुखसमृद्धिकारक आणि
भरभराटीची जावोत !

'बेम्को' चक्कीतील अधिक गुणालंकार -

• कमी अश्वशक्तीत जास्त उत्पादन • एक वर्षाची लेखी गॅरंटी • एमरीचे दगड आणि पुली यांतील समतोलपणा • जाड पत्र्याचा दणकट हॉपर • स्पेअर पार्टस् मिळण्याची हमखास सवलत • साठ टक्क्यांवर अल्युमिनायुक्त असे संपूर्ण भारतीय एमरी स्टोनस् वापरल्यामुळे अन्य चक्क्यांपेक्षा अफाट उत्पादन • "स्कॉटोल्ड" "डायमंड" वगैरे उभ्या व आडव्या चक्क्यांचे एमरी दगड आपल्या आवश्यकतेनुसार मिळतील.





अस्सल भारतीय मालमत्ता —
— पोर्टेबल जॅक्स हेच 'बेम्को' वैशिष्ट्य!
सर्व प्रकारच्या मोटार गाड्या, ट्रॅक्टर्स, तसेच औद्योगिक गरजा भागविणारे व रेल्वे टाइप जॅक्सची मोठ्या प्रमाणावर निर्मिती.
इंडियन गव्हर्मेंट रेल्वेजचे अधिकृत ठेकेदार.
(ऑन अॅप्रूव्हड लिस्ट)
आपल्याही गरजा भागवू —

— समक्ष भेटा अगर लिहा. —

बेम्को

बेळगांव मोटर्स
कॅम्प, बेळगांव (M.S.M.Ry.)

TOM & BAY LTD.

होय, या चक्रव्यूहांतून मार्ग काढायचं मी ठरविलं आहे!

# चक्रव्यूह




जें करावं असं जन्मजन्मान्तरीं वाटलं
नाहीं तें मी आतां करणार आहे.
मला जगायचं आहे म्हणून
करणार आहे !

माझ्यावर माझ्यावर लटकणारी तरवार मी आज ना उद्यां निश्चित तोडून टाकणार ! तिच्या विचारानें माझीं सारीं जीवनतत्त्वें शोषून घेतलेलीं आहेत, माझं व्यक्तित्व ग्रासलेलें आहे, माझ्या साऱ्या शक्ती संपुष्टांत आल्या आहेत, माझ्या वृत्ती कोमेजून टाकल्या आहेत—सुखासमाधानानं जगणं मला अशक्य झालं आहे. तसं करतांना मला भयंकर दुःख होईल. पातळशा चिवट धाग्याला बांधलेली ती तरवार तुटून पडतांना मला जखम करील. मी जगेन, पण तें क्षत आजन्म मला जाचत राहील. तरी देखील आजची स्थिति पालटेल. निरंतरची धास्ती नष्ट होईल. मृत्यूची धास्ती पत्करली. पण ही धास्ती भयानक आहे. क्षणाक्षणाला आपल्या व्यक्तित्वाचा चोळामोळा करणारी, आपला अभिमान उखडून काढणारी, झुरणीला लावणारी ही धास्ती संसारांतील कोणत्याही दुर्धर यातनेला मागें सारणारी आहे ! विमानाचें घरघर आकाशांत सुरू होतें, गोळ्यांचा वर्षाव होतो, मानवतेचा विध्वंस होतो, आणि हें एक दिवस नव्हे, दोन दिवस नव्हे, सतत पांच वर्षें ! तशीच माझी गत झाली आहे, वातचक्र गरगर फिरूं लागतं, समुद्र उपसला जातो, सृष्टीच्या ठिकऱ्या उडतात, मग वादळ शांत होतं—पण किंचित्कालचं ! पुन्हा वारे भिरभिरतात, समुद्र खवळतो आणि विध्वंसनाला सुरुवात होते. तसेंच माझं झालेलं आहे. लहरी संशयाच्या फेऱ्यांत माझं नशीब भिरभिरत आहे ! कोणं करावं तें समजत नाहीं. कारण शशीवर माझं प्रेम आहे, त्याचं माझ्यावर आहे आणि तरीहि आम्ही परस्परांचा तिरस्कार करतों. द्वेष करतों ! हा विरोध महाभयंकर आहे ! नुसता तिरस्कार केला असता तर परस्परांच्या त्यागांत आम्हांला शांति अन् समाधान लाभलीं असतीं किंवा आमच्यापैकीं कोणी तरी आत्महत्या केली असती, खून केला असता. मी आत्म-हत्या केली असती, त्यानं माझा खून केला असता, पण दोघांपैकीं

कांहींही घडत नाहीं. कारण प्रेम नि तिरस्कार यांची रस्सीखेंच चालली आहे. शशी, मला कृतान्तासारखा वाटत आहे. तरीहि मी त्याला प्रिय आहें आणि अशा या विरोधानं ठासून भरलेल्या वातावरणांत आम्ही दिवस कंठीत आहोंत. माझा तिरस्कार दुबळा आहे, त्याचा समर्थ आहे! मी तिरस्कार करतें अन् त्यानं कांहींच वांकडं करूं शकत नाहीं! त्याच्या तिरस्कारानं मात्र मी आकसून येतें. हीन ठरतें. शून्यवत् ठरतें. मी स्त्री आहें, तो पुरुष आहे. आम्हां दोघांच्या तिरस्कारांत एवढं अंतर आहे. त्याचं माझ्यावर प्रेम आहे हें मलाहि जाणवतं. पण कसलं अमानुष प्रेम तें? मांसाहारी माणसाचं बकऱ्यावर कमो का प्रेम असतं? त्याशिवाय का तो त्याला आपल्या पोटांत स्थान देत असतो? प्रेम आहे तें इंद्रियाचं! मी तरुण, सुंदर आहें म्हणून त्याचे विकारच त्याला माझ्यावर प्रेम करायला लावतात! पण प्रेयसीचा भोग तेवढा घेणारं हें प्रेम! तिचा विकास, तिचं कल्याण घडवून आणणारं नव्हे! प्रेम का कधीं अधोगती घडवून आणतं? माझी तर सारखी अधोगती होत चालली आहे! हें प्रेम इतकं सर्वशोषक, सर्वग्रासी नसतं तर मी किती सुखी झालें असतें! 'तूं माझी आहेस! सर्वस्वी माझी आहेस! देहानं, मनानं, कल्पनेनं माझींच असली पाहिजेस!' या अतिरिक्त स्वार्थी विचाराच्या, इच्छेच्या, महत्त्वाकांक्षेच्या पोटीं या प्रेमाचा जन्म झाला आहे! अन् म्हणूनच अग्निकुंडाच्या शेजारी पारिजातकाचं झाड असावं तशी मी त्याच्या सहवासांत आहें. पण—चैतन्यहीन, रसहीन निर्जीव खोडासारखी!

होय. ही लटकती तरवार संशयाची आहे. आज पांच वर्षं दिवस–रात्र, तिन्ही–त्रिकाळ ती सारखी लटकत आहे! ही तरवार मारीत नाहीं, मरूं देत नाहीं. तेथें 'क्षय' बसून मृत्यु तळपत नाहीं. क्षयासारखा, हळूहळू झिजविणारा, कष्टविणारा, झुरायला लावणारा जंतु तिला चिकटला आहे! अन् तोच माझ्यावर प्रभाव गाजवीत आहे! मी चंचल आहें, व्यभिचार करीत आहें म्हणून तो माझा तिरस्कार व छळ करीत आहे आणि मी सच्छील अन् एकनिष्ठ आहें, म्हणून मी त्याचा तिरस्कार करीत आहें!

तो तरुण आहे, सुंदर आहे, कर्तबगार व प्रेमळ आहे, तेजस्वी बुद्धिमत्तेचा आहे, खरमरीत पुरुष आहे. मला तो हवा आहे. पण ज्या वेळीं तो माझ्यांत कुलटा पहातो आणि माझं प्रत्येक कृत्य त्याला चंचल, उच्छृंखल वाटतं आणि माझ्या कटाक्षांत त्याला जारिणीच्या सूचना दिसतात, माझ्या लाघवांत गर्भित अनीति दिसते त्या वेळीं त्याच्यांत मला राक्षस दिसूं लागतो. माझं हृदय फुटूं पहातं. साऱ्या कुटिल युक्तिवादांचा उपयोग करून छळ केला म्हणजे मग तो दमून जातो. मी सच्छील तर नसेन ना? ही विवेकाची तिरीप त्याच्या मनांत उगवते आणि मग तो सद्गदित होतो, रडतो, स्फुंदतो, मला कुरवाळतो. मी त्याला लथाडतें तरीहि मिनतवारीनें जवळ येतो, गळीं पडतो. अबोला धरला तरीहि बोलायचा प्रयत्न करतो, निलाजरेपणा करतो आणि अशा क्षणिक पस्ताव्यानंतर आलिंगनांत परस्परांचा तिरस्कार, तेढ विरून जातात! पण हें क्षणभरच! कांहीं दिवसांपुरतंच! पुन्हां त्याच्या मनाचं भ्रमण सुरू होतं. त्याच्या कल्पना सैरावैरा धांवूं लागतात. साऱ्या शंका, कुशंका वास्तवतेचं मानभावी रूप घेऊन समोर उभ्या रहातात. आणि मग तो त्याच मदिरेनें पुन्हा झिंगूं लागतो. पुन्हा त्याला आपली बायको जारिणी दिसूं लागते. आसपासचे सारे सुंदर, सुदृढ, तरुण तिचे जार दिसूं लागतात. आणि मी जगांत जगत असलें तर तें केवळ स्वैराचारासाठीं, अनीतिमान् संभोगासाठीं असं त्याला वाटतं! होय. माझ्यावर त्याचं प्रेम आहे. पण कसलं भयंकर प्रेम! जगांत परमेश्वरानं हा एकटा एकच नमुना उत्पन्न केला असेल काय? प्रेयसीची चिरफाड करणारं अन् त्यांत सुख मानणारं प्रेम! तिच्या वेदनांवर जगणारं प्रेम! त्याला साध्वीचं प्रेम हवं, पतिव्रतेचं प्रेम हवं. त्याच्या अपेक्षा फार मोठ्या आहेत. ते त्याचं प्रेम फार तीव्र नि अनावर आहे. पण हें प्रेम निरामय, नैसर्गिक आहे काय? कीं, ती प्रेमाची विकृति आहे? कांहींहि असो, पण हें प्रेम मला जाळून टाकणारं आहे. या तीव्र, क्षोभक, दाहक प्रेमाऐवजीं संथ, शांत असं प्रेम त्यानं माझ्यावर केलं असतं तर मी सुखी झालें असतें. त्याच्या प्रेमाच्या आवेगांत संशयाची एवढी दाहकता आहे कीं, मी

सारखी करपून, कोळपून जात आहें. पांच वर्षांच्या अवधींत माझा अस्थिपंजर झाला आहे. मला कांहीं उणं नाहीं. नवरा तरुण अन् देखणा आहे. आपल्या बायकोचा अष्टौप्रहर ध्यास वगैरा आहे, सुखवस्तु आहे, घरदार चांगलं आहे, जमीनजुमला आहे. कपडालत्ता, नोकरचाकर सारं कांहीं आहे. पण मी त्याच्या विश्वासाला पात्र नाहीं, असं त्याला वाटतं. मी सीतासावित्री व्हावं असं त्याला वाटतं. देहानं तशीच मनानंहि ह्याच्या गणिती योजनेप्रमाणें मीं वागावं असा त्याचा आग्रह आहे, हट्ट आहे! मीं इतर पुरुषांना पाहिलं कीं तो कष्टी होतो. मी हंसलें म्हणजे त्याचा जळफळाट होतो, मी बाहेर फिरायला गेलें म्हणजे त्याचा जीव वरखालीं होतो. मी कुणाला पाहीन, कोणी मला पाहील, मी मान वळवून कुणावर सहेतुक कटाक्ष सोडीन, माझं सौंदर्य कुणाला भुरळ घालील, अन् मी दुसऱ्याच्या ध्यासाचा विषय बनेन असं त्याला दिवसरात्र वाटत असतं. माझं मन निर्मल आहे, निष्कलंक आहे. मी पुरुषांना मोकळेपणानं, सरळपणानं पाहूं शकतें. व्यभिचाराचा संपर्कही माझ्या मनाला शिवत नाहीं आणि तरीहि त्याच्या दृष्टीनं मी पापी आहें. लोकांना पाहिल्याशिवाय, बोलल्याशिवाय, हंसल्याशिवाय मी जगूं शकेन काय? माणूस जगू शकेल काय? असल्या साध्यासुध्या प्रसंगांतदेखील त्याला जारकर्म दिसूं लागतं अन् मग तो मला नाना परींनीं छळूं लागतो.

मी तिकडे गेलेंच कशाला? उभी राहिलेंच कशाला? बोललेंच कशाला? अमुक तरुण खोलींतून माझ्याकडे निरखून पहात होता; त्याचं मन घायाळ करण्यासाठींच मीं तिकडे गेलें, उभी राहिलें, हंसलें अन् पुटपुटलें. तो मला आवडला! त्याची तुझी पूर्वओळख होती काय? नाहीं तर मग तूं संकेत ठरल्याप्रमाणें कां जागलीस? अन् त्या दिवशीं दुसऱ्याच्या सुमतीबाईबरोबर सिनेमाला गेलीस त्या वेळीं हा चांडाळदेखील गेला असेल तुझ्या मागोमाग! अन् तो तुझ्या शेजारच्या खुर्चीवर बसल्याशिवाय कसा राहील? त्यानं काय काय केलं तें मला सरळपणानं सांगून टाक पाहूं! सगळं सांगशील तर मी तुला क्षमा करीन! तुझं रक्त चंचल आहे हें मला कळतं. वासनेवर तुझा ताबा नाहीं त्यामुळें तुझ्या हातून असले प्रमाद घडतात. मी हें समजूं शकतों! पण मग तूं सरळपणानं सांगून टाक ना सारं! अशा वांकडीतिकडीं वळणं घेत त्याचं संशयपिशाच्च थांबूं लागलं म्हणजे तें कुठें थांबेल तें सांगतां येत नाहीं. त्या आक्षिप्त तरुणाला मीं पाहिलेलं नाहीं. अशी कुठें स्थिति असतांना माझा त्याच्याशीं समागम घडेल तरी कसा! अशा रीतीनं एका पायरीवरून दुसरीवर तेथून तिसरीवर तो भराभर उड्या घेऊं लागला म्हणजे मी थिजून जातें. माझी जीभ लुली पडते! अन् त्याला वाटतं मी अपराधी आहें म्हणून सारं सहन करतें! निर्दोष असतें तर आत्महत्या केली असती, गृहत्याग केला असता! हा जाच असह्य होऊन मी भडकलें म्हणजे त्याला वाटतें, मी कांगावा करतें. खरी कुलीन असतें तर [illegible] असतं! अन् पातिव्रत्याच्या बळावर नवऱ्याचं मन जिंकलं असतं! अशा रीतीनं दर वेळीं वांकड्यातिकड्या शेंकडों प्रश्नाखालीं मी गुदमरून जातें. चर्चा, चिकित्सा होते अन् दरवेळीं तो या निर्णयाला पोंचतो कीं मी पापी आहें, माझ्या पहाण्यांत पाप आहे, हंसण्यांत पाप आहे, बोलण्यांत पाप आहे! अन् मी मग म्हणतें कीं, जगण्यांत पाप नाहीं काय? माझं व्यक्तित्व मग प्रतिकार करतं. मला सीतासावित्री व्हायचं नाहीं, मला देवता व्हायचं नाहीं. मला माणूस म्हणून, स्त्री म्हणून जगायचं आहे! जगांतील कुरूपता मला पहायची

आहे, तसंच सौंदर्य पहायचं आहे. माझ्या मित्रांशीं, नातेवाइकांशीं मला बोलायचं आहे. माझ्याबद्दल जिव्हाळा दाखवितात, त्यांच्याबद्दल मला जिव्हाळा, सहानुभूति दाखवायला पाहिजे. मी भांडतें, तंडतें, त्रागा करतें, रडतें, उपास करतें. पण दोन मुलं आहेत त्यांचं केलं पाहिजे, स्वैंपाक केला पाहिजे ! उसनी शक्ति अंगांत आणून घरकामाला लागलं पाहिजे. आणि मग पुन्हा मी हंसतमुख होऊन, शृंगारून त्याच्या लहरीप्रमाणें त्याच्या-बरोबर निघालें पाहिजे, त्याच्या खोलींत गेलं पाहिजे. मी बायको म्हणून त्याला हवी आहे. पण कनकड्याच्या बाहुलीप्रमाणं ! त्यानं उभी केली म्हणजे डोळे उघडणारी, एरवीं बंद ! पोटावर नाहीं तर मस्तकावर बोट ठेवलं म्हणजे बोल-णारी, हंसणारी ! असली बाहुली त्याला पाहिजे आहे ! हिलाच तो पतिव्रता मानणार ! स्वतंत्र अस्तित्व असलेली, स्वतंत्रपणानं बोलणारी चालणारी, स्वतंत्रपणानं समजून उमजून त्याला निष्ठा देणारी, परपुरुषाशीं बोलून-चालूनहि त्याला प्रामाणिक रहाणारी व्यक्तित्वपूर्ण स्त्री त्याला नको आहे ! तिला जगांत एकच पुरुष दिसला पाहिजे आणि तो म्हणजे तिचा पति ! एकच भावना तिला जाणवली पाहिजे आणि ती म्हणजे पातिव्रत्याचि !

पति, पातिव्रत्य ! पति, पातिव्रत्य ! या कल्पनांनीं त्याच्या मस्तकांत नि माझ्या संसारांत कहर उडवून दिला आहे ! त्यामुळें माझ्या मनावर काल्प-निक घाणीचीं पुटें चढलेलीं आहेत, सारखीं चढत आहेत ! नेहमीं तेच ते कुबट, रोगट, घाणेरडे विचार ! माझीं गात्रें व्यभिचारापासून दूर आहेत, पण मन त्याच वातावरणांत घिरट्या घालीत आहे. अन् आतां तर मला

पवित्र असूनहि असं वाटायला लागलं आहे कीं, मी अपवित्र नाहीं ना? व्यभि- चारिणी नाहीं ना? सीतासावित्रीचा आदर्श डोळ्यांसमोर, मनासमोर रोज सारखा चाळविला जात आहे. त्यामुळं वाटूं लागतं कीं, शशीचा आरोप खरा नसेल ना? कारण सीतेनें रामाच्याशिवाय दुसऱ्या पुरुषाचं तोंड देखील पाहिलं नव्हतं. कर्णासंबंधीं कांहीं गैर कल्पना मनांत चमकून गेली शत्र तेवढा द्रौपदीच्या हातून घडलेला व्यभिचार! मग मी किती दुबळी! कारण सौंदर्यावर माझी दृष्टि स्थिर होते. तिन्हीसांज्या वेळीं खिडकीपाशीं लोकांशी ग्हदारी अहेतुक- पणानं पहाणं मला आवडतं. पक्ष्याचं नील आकाशांत क्षणिक भ्रमण व्हावं त्याप्रमाणें माझ्या मनाकाशांतून प्रमाथी, विलासी, अनैतिक विचार भुर्रकन् उडून जातो, आणि याच्या पाठोपाठ शशीच्या आरोपांचा वर्षाव सुरू होतो तेव्हां वाटायला लागतं कीं, मी पापी आहें, दुबळी आहें. अन् मग मी एकटीच रडूं लागतें, पापी नसतांना रडूं लागतें. जिवाचा नाश करावा असं वाटूं लागतं. ती व्यभिचाराची कल्पना शिवली म्हणजे अंग शहारतं, देहाचा कणन् कण आक्रोशूं लागतो; सर्वं गात्रं आंवरलीं जातात. नको ती भीषण कल्पना असं होतं! अंगाला दरदरून घाम सुटतो! छाती धडधडूं लागते. पण असलं हें कर्म मी प्रत्यहीं करीत आहें, केलं आहे अशी ओरड माझ्या कानीं- कपाळीं सारखी पडत आहे! एकदां आपल्या पुरुषाला निष्ठा दिली, प्रेम दिलं, देह दिला म्हणजे तो इतरांना द्यायचा ही कल्पनाच मला अस्वाभा- विक, अनैसर्गिक, भयाण वाटते! एकदां दिलं. संपलं. त्यावर आपला अधिकार नाहीं. माझी वृत्तीच तशी आहे. शशीची पत्नी झाल्यापासून मी एकनिष्ठ आहें, पतिव्रता आहें. त्याला मी फसवूं शकत नाहीं. कारण तसं करणं म्हणजे स्वतःलाच फसवणं होय. माझ्या इंद्रियांनाहि तें नको आहे! माझ्या वृत्तींनाच त्याची घृणा आहे! मला तें मोठें अपवित्र, अमंगळ वाटतं; पण तरीहि माझं मन त्या भागांत गुरफटलेलं असतं. ते पुरुष नातेवाईक, मित्र किंवा लोकांनी त्यानं माझे प्रियकर ठरवून टाकलेले आहेत, त्यांच्या- संबंधीं विचार चालू होतो. ते वेळींअवेळीं मनोमन दिसूं लागतात. अन् मग नरकांत लोळणारी मी एक किडा आहे असं मला वाटूं लागतं. पांच वर्षांपूर्वीं मी किती निरागस, पवित्र अनुराधा होतें! किती कोमल, किती भाबडी! किती निर्विकार दृष्टीनं मी पुरुषांकडे पाहूं शकत असें! वागूं शकत असें! पापविचारांना, पापविकारांना मनांत स्थानच मुळीं कुठं होतं? विवाहित स्त्री कुलटा असते ही गोष्ट आधीं असंभाव्य वाटत होती! गाईचं मांस खायची बुद्धि आपल्याला कधीं होते काय? खाण्याची कल्पना आपल्या मनांत कधीं तरी डोकावली आहे? इतकेंच काय गाईचं मांस रुचकर नाहीं? अन् मद्य स्वादिष्ट नाहीं? आपली प्रकृति त्यांची शिसारी करते; तिरस्कार करते तसंच अनैतिक संभोगाचं नाहीं काय? पण जी गोष्ट माझ्या हातांच्याच नव्हे तर कल्पनेच्या आवांक्याच्या- बाहेरची होती तीच गोष्ट शशीच्या नेहमींच्या सांगण्यामुळें इतकी संवयीची, स्वाभाविक वाटायला लागली आहे! घरन् घर व्यभिचारानं भरलेलं दिसूं लागलं आहे, साऱ्या विवाहित स्त्रिया जारिणी आहेत, मायावी आहेत, त्या मुला- बाळांच्या, पतिप्रेमाच्या सौख्यावर जगत नाहींत, स्वैराचाराच्या भोगावर जगतात. माझी दृष्टि हळूहळू अशी विकृत, रोगट व्हायला लागली आहे. ज्या गोष्टी मला कळायला नको होत्या त्या त्या संशय घेण्यानं मला शिक- विल्या आहेत. जी दुर्गंधि जगांत आहे असं कधींच वाटलं नव्हतं तिचीं तपशीलवार चटकदार वर्णनं शशीच्या तोंडून ऐकलीं आहेत. अन् विसरून

जाण्याचा प्रयत्न केलेला आहे! आणि यानंच मी खंगत आहें, झुरत आहें! जग सुंदर नितरुंग आहे त्याला मी जबाबदार आहें काय? पण आपल्याकडे एखादा देखणा पाहुणा उतरला, एखादा देखणा मित्र शशीला भेटायला आला म्हणजे मग आरोपाची प्रश्नपत्रिका तयार होते अन् तिचीं उत्तरें देतां देतां श्वास लागतो, जीव हैराण होतो, गोंधळ उडतो. मग मी कांहीं तरी सांगतें अन् या असंबद्धतेंत शशीला व्यभिचाराचे पुरावे सांपडतात. मग त्याचं तांडव सुरू होतं. मी पण खवळून जातें अन् मग दोन चार दिवस भयंकर मनःतापानं निघून जातात. कांहीं रुचत नाहीं, कांहींच सुचत नाहीं. घर शून्यवत् वाटतं. शशी येतो, कांहीं तरी खातो अन् आपल्याच तंद्रींत निघून जातो. त्याची तंद्री संशयाची! प्रत्येकाला एकेक नाद असतो! कुणाला गायनाचा, कुणाला खेळाचा, कुणाला वाचनाचा! शशीला 'संशया'चा नाद आहे! तो कोणत्या तरी विचारांत गर्क असला म्हणजे मला धसका बसतो. कारण मला माहीत असतं कीं, आतां वादळ होणार! मग माझ्या आयुष्यांतील लहानमोठ्या प्रसंगांची कटोर, जीवघेणी उजळणी होणार आणि शेवटीं मी व्यभिचारिणी आहें हें हजाराव्या वेळीं ओरडून, आक्रंदून मला ऐकावं लागणार! संशयाची 'खाज' चाळवून उठली म्हणजे माझ्या व्यभिचारानं त्याची तृप्ति व्हायची! मी व्यभिचारी, मी कुलटा, पापिणी आहें, असं एकदां ठरलं ना? मग नेहमीं नेहमीं तोच आरोप माझ्यावर कां? काय म्हणून मला रोज खातां, फाडतां? मी दुराचारी आहें असं समजून मला जी कांहीं शिक्षा लावायची असेल ती एकदां करून टाका. मारायचं असलं तर मारून टाका, सोडायचं असलं तर सोडा. पत्नी म्हणून ठेवायचं असेल तर मात्र हा विषाचा अभिषेक करीत जाऊं नका! असं मी त्याला निक्षून एकदां नव्हे तर कांहींदां जिवाचा आटापिटा करून सांगितलं तरीहि त्याचं व्यसन सुटत नाहीं. आठदहा दिवसांत विष सांचत जातं अन् मग पुन्हा तेच आरोप, तेच प्रश्न, त्याच धमक्या, तोच नरक! मला दिसून आलं आहे कीं, या संशयांतच त्याला सुख-दुःख दोन्ही लाभतात व तो त्यांत रमतो! माझं पावित्र्य त्याला हवं आहे. ती त्याची आकांक्षा आहे! पण माझा कलंक त्याला अधिक प्रिय आहे! माझ्या कृत्रिम, अकल्पित, दुष्कर्मांच्या विचारानं त्याला धुंदी चढते. त्याच्या वृत्तींना अनावर मादकता, धुंदी,

बेहोषी चढते. या सतावणाऱ्या दुःखानें त्याला एका तीव्र सुखसंवेदनेचा आस्वाद मिळतो. या धुंदींत तो जगतो, पण मी खुरटत जातें, सर्व बाबतींत खुरटत जातें. माझ्या साऱ्या आवडी आज विरून गेल्या आहेत. तरुण असूनहि मन विकल झालें आहे. माझी सारी उमेद, सारा उत्साह मावळला आहे.

मला प्रसाधनांची, वेषभूषेची कोणतीच कदर राहिली नाहीं! मनाचं वाळवंट झालं आहे. त्यांत पाणी नाहीं, वनस्पति नाहीं, घरं नाहींत, बागबगीचे नाहींत. त्यांत रणरणणारं ऊन नि तापलेली वाळू तेवढी आहे! अन् तरीहि मी जगूं पहातें, कारण माझी जीवनशक्ति भारी चिवट व जीवट आहे! माझ्या दोन्ही मुलांचा मीच काय तो आधार आहें. त्यांच्यावर माझा जीव टांगलेला आहे. त्यांच्याचमुळें मी आत्महत्येपासून परावृत्त होतें. माझ्या उरल्या सुरल्या जीवनप्रवाहाचा तोच तेवढा झरा आहे. सर्व प्रकारचीं दुःखं गिळूनहि मी सुखी नि शांत राहूं शकलें असतें—दारिद्र्य, रोग, कुरूपता, मृत्यु या साऱ्यांना मीं धैर्यानं कवटाळलं असतं अन् वरचढ ठरलें असतें.

निष्ठा, विश्वास हींच संसाराचीं आधारभूत तत्त्वं आहेत. तीं खरोखर ढासळलीं, किंवा ढासळलीं आहेत असं पतीपत्नीला वाटत असलं तर संसारसुख कसं टिकेल? आज सारीं सुखसाधनं माझ्या संसारांत गजबजलेलीं असूनहि मी हैराण, वैराण झालें आहें. मला कुठंच करमत नाहीं. रात्रीची झोंप लागत नाहीं. दिवसरात्र तळमळ चालली आहे! निष्ठा देऊनहि व्यभिचाराचं फळ पदरीं यावं? सुशील असूनहि दुराचाराच्या संशयी [illegible] तडफडण्याचें माझ्याच पाळीं यावें? भाग्यवान् होण्याचे गुण अंगीं असूनहि दारुण दुर्भाग्य नशिबीं यावं? कां व्हावं असं? कां व्हावं?...

दररोज ज्या वेळीं आतुरतेनं नवऱ्याची वाट पहावी त्या वेळीं माझी भीतीनं गाळण उडते अन् आजचा दिवस, आजची वेळ कशी टळेल ह्या वेध लागून रहातो. इतर बायका आपल्या नवऱ्यासमवेत फिरायला जातात, नाटक, सिनेमा पहातात, हास्यविनोदांत गप्पागोष्टींत रममाण होतात. मी मात्र त्याची बावऱ्या नजरेनं, कांपऱ्या मनानं वाट पहातें आणि त्याची संत्रस्त मुद्रा पाहिली म्हणजे उरांत खंजीर खुपसल्यासारखं होतं. आवंढा गिळतां येत नाहीं आणि मग थोड्या वेळानं संतापानं भूत [illegible] उग्र रूप धारण करतं आणि शेवटीं मी निपचित पडून रहातें.

साऱ्या वाटा मला रोखलेल्या आहेत. मी कुठंच जाऊं शकत नाहीं! कांहींच करूं शकत नाहीं! एकच भयाणता चौफेर व्यापून राहिलेली आहे. मनाला विरंगुळा पाडण्यासाठीं कांहीं दिवस दूर राहिलें तर तेवढ्या अवकाशांत साचून राहिलेला संशय एकदिवस माझ्या दर्शनाबरोबर उफाळून येईल आणि त्या वावटळींत माझा चेंदामेंदा होऊन जाईल. अन् नशिबा दुर्दैवाचा कडेलोट हाच कीं, माझी यातना मी कुणालाच सांगूं शकत नाहीं. माझी ही व्याधी जितकी दारुण तितकीच गुप्त आहे, लज्जास्पद आहे. कुठें मी माझं हृदय उघडं करूं कीं, माझ्या पतीनं मला कुलटा ठरविलेलं आहे? त्याच्या दृष्टीनं मी व्यभिचारिणी आहें! ज्या वेळीं हें दुःख असह्यावर येईल त्या वेळीं तें शतपटीनें वाढेल आणि आत्महत्येशिवाय मला दुसरा मार्ग नसणार





















# मज लोभस हा इहलोक हवा

स्वर्ग नको, सुरलोक नको, मज लोभस हा इहलोक हवा
तृप्ति नको, मज मुक्ति नको, पण येथिल हर्ष नि शोक हवा
शोक हवा परि वाल्मिकिच्यापरि सद्रव अन् सश्लोक हवा
हर्ष हवा परि स्पर्शमण्यापरि त्यांत नवा आलोक हवा
शंतनुचा मज मोह हवा अन् ययातिचा मज देह हवा
पार्थाचा परि स्नेहविकंपित सार्थ सदा संदेह हवा
इंद्राचा मज भोग हवा अन् चंद्राचा हृद्रोग हवा
योग असो रतिभोग असो श्रुति जागृत त्यांत प्रयोग हवा
आयु हवें, आरोग्य हवें, यशभाग्य तसा प्रासाद हवा
श्लाघ्य हवें वैराग्य, तयास्तव त्यांत विरोध विषाद हवा
तपासह अनुताप हवा, मज पापासह अभिशाप हवा
शिळांत पिचतां जळांतुनी मज निळा निळा उःशाप हवा
पार्थिव्यांतच वास हवा परि मानव्याचा ध्यास हवा
मार्क्साचा मज अर्थ हवा अन् फ्रॉयडाचा मज काम हवा
या असुरां परि राववर्ण्या घरिं गांधींचा मज राम हवा
लोभ हवा मज गाधिजमुनिचा अखंड आंतर क्षोभ हवा
पराभवांतहि अदम्य उज्ज्वल प्रतिभेचा प्रक्षोभ हवा
विश्व हवें, सर्वस्व हवें अन् मृत्यु समोर सचित्र हवा
शरांत परि ही विव्हळतां तनु उरांत अमृतमंत्र हवा
हविर्भुक् धुम्रमुख मी वैश्वानर नित्य नवा मज ग्रास हवा
हें सुख दुर्लभ वाढविण्या मज पौर्णिमेशीत प्रवास हवा

—बा. भ. बोरकर

नाहीं. माझा नवरा संशयी आहे, असं कोणीच म्हणणार नाहीं. मी दुराचारी आहें, असं प्रत्येक बायको अट्टाहासानं सांगेल!

पण या चक्रव्यूहांतून मार्ग काढायचं मीं ठरविलं आहे. तो मार्ग फार विकट आहे. त्याची कल्पना केली तरी घेरी येते. पण त्याशिवाय तरणोपाय नाहीं. क्षणाक्षणाचं मरण मला असह्य झालं आहे. मनावर एवढं दडपण सांचत गेलं आहे कीं, सहनशीलतेनं सीमा गाठली आहे. या दडपणावर थोडंसं देखील आणखी वजन पडलं तरी माझं मन तडकून जाईल. भावना भडकतील. मी वेडी होईन, होय, मी वेडी होईन. आजच मी माझ्या घरांत वेड्यासारखी वागत आहें.

हा क्षणाक्षणाचा जाच सहन होत नाहीं. वाघाच्यासमोर गाय दाव्याला बांधावी, वाघाला ती खातां येऊं नये आणि गाईला दावं तोडून पळतां येऊं नये; तशा स्थितींत मी सांपडलें आहें. सर्व वेदनांना पुरून उरेल अशी ही वेदना आहे. ती जितकी भेदक, तितकीच व्यापक आहे.

माझ्यावरील कल्पित कलंक व माझं वास्तव पावित्र्य यांच्यामध्यें माझं मन हेलकावे खात आहे. त्याच्यांतील त्रस्त संबंध तेव्हांच शांत होईल, ज्या क्षणीं त्याला माझं पातिव्रत्य पटेल किंवा कलंक सिद्ध होईल. माझ्या पातिव्रत्याचा कोणता पुरावा मी त्याला देऊं? मी कसं सिद्ध करूं कीं, माझ्या रक्तांत व्यभिचाराचं बीज नाहीं, अनैतिक संभोगाचा मला तिटकारा आहे? पातिव्रत्याचं मापन करणारं यंत्र निघालं असतं तर त्याला कळून आलं असतं कीं, माझं मन किती पवित्र आहे, माझं शरीर कसं अकलंकित आहे! पण हें सिद्ध करण्यांत मी अपेशी झालें आहें, सर्वस्वीं अपेशी ठरलें आहें! माझा सारा अट्टाहास माझ्याविरुद्ध उलटला आहे! खरंच का मी पतिव्रता नाहीं?...

मी कलंकित आहें, भ्रष्ट आहें हें ज्या घटकेला त्याला निःसंदेह कळून येईल त्याच घटकेला त्याच्या डोळ्यासमोर दाटलेलं संशयाचं सारं धुकं नष्ट होईल, आणि त्याची नजर स्वच्छ होईल. आपली पत्नी व्यभिचारिणी आहे यापेक्षां भयानक रहस्य कळण्याचं त्याला बाकी रहाणार नाहीं.

होय. मीं व्यभिचारिणी स्त्री होण्याचा निर्धार केला आहे. जें जें मनाला नको, शरीराला ज्याची किळस, बुद्धि, भावना ज्यांच्याविरुद्ध चवताळून उठतात, जें करावं असं जन्मजन्मांतरीं वाटलं नाहीं तें मी करणार आहें. शांतपणानं करणार आहें. मला जगायचं आहे म्हणून करणार आहें. माझा चेतनाशून्य देह परपुरुषाशीं समागम करील, अन् त्याच दिवशीं नेहमींप्रमाणें जेव्हां माझा नवरा माझ्यावर प्रश्नांचा भडिमार करूं लागेल, अन माझा पिच्छा पुरवील तेव्हां शांतपणानं, धीरानं माझ्या निष्ठेवर व पावित्र्यावर विसंबून मी त्याला निर्धारानं सांगेन, "होय! मीं व्यभिचार केला. आज केला, या तुझ्या घरांत केला. तुला सुखी करण्याकरितां केला, तुझा संशय फिटण्याकरितां केला. तूं—तूंच मला व्यभिचारिणी केलंस! पण तरीहि मी मनानं तुझीच आहें, अन् पवित्र आहें!

आणि ज्या वेळीं खरोखर त्यानं प्रक्षुब्ध व्हायला पाहिजे, वेडं व्हायला पाहिजे, त्याचा स्फोट व्हायला पाहिजे त्या वेळीं तो स्थिर होईल, शांत होईल आणि मला मात्र नको असलेल्या व्यभिचाराचं क्षत नेहमींच डांचत राहील! नेहमींच! मृत्यूपर्यंत!......

यौवनाची पूजा, देहाची अंतिम तृप्ति, मनाची मंगल [illegible] !

# जंगलांतील यौवनोत्सव

**यौवनाचा क्षण नि क्षण अमोल आहे म्हणून तो साजरा करणें हें आदिवासी संस्कृतीचें वैशिष्ट्य आहे.**



दुर्गा भागवत

श्रावणीचें पाणी पिऊन जंगल जसें कांहीं तरारून गेलेलें आहे. सातपुड्याचा कानाकोंपरा वाऱ्यापावसानें कसा स्वच्छ झाडून धुवून निघालेली आहे. भाद्रपद अर्ध्यावर उलटून गेल्यामुळें घरांचीं गवती छपरें कधीं सोनेरी, रुपेरी दिसताहेत. झाडांच्या पानापानांतून उन्हाचे आणि चांदण्याचे ठिपके स्वच्छंदपणें जमिनीवर लोळताहेत. मध्येंच एखादी पावसाची झड येते आहे; अभ्रें कधीं काळीं, कधीं जांभळीं, कधीं लाल पिवळीं, तर कधीं पांढुरकीं, छोट्या छोट्या जमावांनीं आकाशावर हिंडताहेत. कधींमधीं तुमच्यासमोरच्च टेकडीच्या खालच्या बाजूनें पहा, दुहेरी तिहेरी छोटीं इंद्रधनुष्यें जमिनीपासून पलिकडच्या डोंगरापर्यंत उमटलेलीं दिसताहेत. पक्षी कधीं गोड तर कधीं कर्कश आवाज काढताहेत. त्यांचे आवाज वसंतांतला तो धुंद प्रणयी राग आळवतांना दिसत नाहींत. लेकुरवाळ्यांची कधीं हुकमी तर कधीं मायेची साद वातावरणांत घुमते आहे. ओढ्यांचें पाणी अंतरा-अंतरावर खळखळतें आहे. मासोळ्यांची हालचाल ठिकठिकाणीं दृग्गोचर होते आहे. डबक्यांत जाळीं पसरलीं जाताहेत. गळ धरून पोरगे आणि मुली थट्टाविनोदांत मग्न आहेत. मध्येंच एखादी गाण्याची लकेर. त्यानंतर कुणी तरी कुणाला तरी हांसडलेली इरसाल पण प्रेमानें पुरित अशी शिवी, तर कुणी कुणाला मारलेली खुसखुशीत चपराक, त्यानंतर कुणी तरी कुणाचा मुका घेतल्याचा आवाज आणि पाठोपाठ खदखदून हंसणारे दोन आवाज एकत्र झालेले, तुम्ही कुठेंहि गेलांत तरी तुमच्या कानीं यायचेच. आतां शेतांत काम नाहीं; मग दुसरें काय करायचें?

दशवीस झोंपड्यांचें दुग जिल्ह्यांतलें गोंडी खेडेगांव. आजूबाजूला चिमुकलीं शेतें पसरलेलीं. भाताचें पीक कसें सोनसळी, हिरवें—पोटांत भूक आणि मनांत तृप्ति निर्माण करतें आहे.

वारीहि शीताघरून गडबडां लोळतच जातो आहे आणि पिकांमध्यें लाटा उसळवतो आहे.

मासे, बेडूक, छोटेमोठे उंदीर, खेंकडे भाजीपाला, उन्हाळ्यापेक्षां किती तरी जास्त मिळाल्यानें एक वेळ तरी भूक भागते आहे. एकदां भूक भागल्यावर आणि घुटकाभर मद्य मिळाल्यावर मग या वनच्या राजांना आणखी काय हवें ? भरल्या पोटाचा आनंद व्यक्त करण्याची एकहि संधि ते सोडीत नाहींत आणि आनंदाला प्रणयासारखा दुसरा कुठला साथी आहे ? [illegible]ीची हरतऱ्हेनें आळवणी करणें, [जी]वनाचा क्षण नि क्षण अमोल म्हणून उत्सवानें साजरा करणें हें आदिवासी संस्कृतीचें वैशिष्ट्य आहे. वसंताचे गोडवे नागरी कवींनींच गावेत. सालभरांत [illegible] महिनेच जेमतेम ज्यांचें पोट भरूं शकतें त्या गोंडांना उन्हाळी उत्सव कसे रुचावे ? भाद्रपदापासून तों पौष पौर्णिमेपर्यंत ते आपले यौवनोत्सव वेगवेगळ्या तऱ्हांनीं, नाचून गाऊन, देवतांना आळवून साजरे करतात. यौवनाची पूजा, देहाची अंतिम तृप्ति, मनाची रंगेल वेहोशी हीच देवांना प्रसन्न राखण्याची त्यांची रीत. माणूस आनंदानें गाऊं दे, कीं देवहि दरून खालीं येतात.

अगदीं नेमकी हीच भावना या यौवनोत्सवांच्या मुळाशीं आहे. कुमार-कुमारींचें अनिर्बंध प्रेमसाधन आणि कांहीं काळ कुटुंबवत्सल तरुण-तरुणींचेंहि खेळीमेळीचें मोकळें वागणें, शरदृतूचें प्रसन्न वातावरण होईल तितकें वाढवीत आहे. दिवस, रात्री सारखींच रमणीय आहेत. तो पहा हुल्कीचा समारंभ चालला आहे. दिवाळीचाच अगदीं हा हंगाम आहे. त्या पहा कुमारिका दोन्ही बाजूंना दोन हातांनीं बाजूच्या युवतींच्या कमरेला विळखा घालून नाचताहेत. तरुणांच्या गळ्यांत ढोल आहेत. या तरुणी गांवांतल्या असून मुलगे दुसऱ्या गांवचे आहेत. कधीं मुली पण या गांवच्या त्या गांवला जातात. प्रेमाचा रंग एकाच गांवांत नीट खुलत नाहीं. लग्नाच्या सोयरिकीला अशाच रीती त्यांना हव्यात. त्यांत लग्न जर प्रेमानंतरच व्हायचें, तर दुसरी कोणती रीत स्वीकारायची ? पहिलें गाणें लिंगो देवाचें :

मेटा [illegible]शे कोसमा गुडा राऊर दादी
बाता [illegible] हरा ओडचा मरा हरा दादी
हराता पोरो डे दादी बाती मरा पाटी
मेटा जाडुल पाटी पाटीदा पोरो डे दादी
बारा गोरिल आता किकेल करें बासा
बाराता पोरो डे दादी बराड् गोरिल आता
ओडचे जेटे हर्रा दादी हरीड्ता पोरो डे दादी
बारा डोरी बंधना बंधना ता पोरो डे दादी
बाती तोला वेसोडे मल्लुजंडी वेसाड दादी
टेहरा टोकरा मोंगरा रोय दादी
देसा मुरकु हर्रि दादी इदोम इसे राउर दादी
बागे मोहोड कपाट दादी मिनुकाटा सिंगूर दादी
राउर [illegible] पाडे लेता कमर दुलास
दुलास्ता पोरो डे दादी पांडरी कोको लिंगो
लिंगो गोरिल आता जोहार जोहार लिंगो
मिंडा ते कुडुर कम् दादी नेडे ते जिलाम् [illegible]
लिंगो कालदु पैंजेना टोडी तेंटेंड्जा

अर्थ : "आजोबा, त्या डोंगरावर कुणाचें हो मंदिर आहे ? कुठल्या झाडाचे खांब केलेले आहेत ?"

"ओडण्याचे खांब केलेले आहेत."

"आणि आजोबा, तुळया कशाच्या केल्या आहेत ?"

"सागाच्या."

"आजोबा, त्या छपरावर काय आहे ?"

"छपरावर छानदार फळ्या आहेत."

"त्यांच्यावर, आजोबा, काय पसरायचें ?"

"त्यांच्यावर पानें पसरायचीं."

"आजोबा दोऱ्या कसल्या करायच्या ?"

"हिरव्या गवताच्या दोऱ्या वळायच्या आणि वर मोरपिशी गवत आंथरायचें."

"आणि छपराचा कलता भाग कसला हो आजोबा ?"

"तो भाग पक्ष्यांच्या शेंपटीचा करायचा."

"असें तें मंदिर आहे. त्याचे दरवाजे, आजोबा चारी बाजूंना आहेत. त्यांना माश्यांच्या खवल्यानीं मढवलें आहे. मंदिराच्या आंतल्या बाजूला कांबळें अंथरलें आहे. त्याच्यावर पंडरीकोको आणि त्याचा धाकटा भाऊ लिंगो आतांच येऊन बसले आहेत. जोहार, लिंगो, जोहार ! लिंगोची सारंगी (मिंडा) कुडुर कम कुडुरकम आवाज करते आहे. त्याच्या कमरेंत घुंगुर आहेत. पायांत वाळे आहेत. तोंडानें तो बासरी वाजवतो आहे. त्याच्या कानांतूनहि संगीताचे फवारे बाहेर पडताहेत. चारी बाजूंनीं संगीताचे सूर उसळून येताहेत."

मग तरुण त्या वेटोळ्यांतून बाहेर येतात. त्यांचें वर्तुळ वेगळें होतें. मुलींचें वेगळें. मग मृदंग मोटमोठ्यानें वाजवून उंच उंच आवाज काढून ते गाऊं लागतात. या नाचाला आणि गाण्यांना मांदरी म्हणतात. मद्यांच्या दुरंगी आवाजाची धुंदी कुठें मावळते आहे नाहीं तोंच तरुणांची पहाडी ललकारी सुरू झाली. 'रेला रेला' असें पालुपद पुरुषांच्या गाण्यांचें असतें. [illegible]च्या आवाजापेक्षां 'कडकड कडक धप्प' असा पांच पन्नास मृदंगांचा एकत्र झालेला आवाज आजुबाजूच्या सर्व वातावरणाला तालबद्ध करतो. ऐकणाऱ्याचें, डोकें, कान, आणि नाडीचे ठोके सगळे एकाच गतींत येतात. लयबद्ध होऊन समोरच्या दृश्यावर खिळून रहातात.

टिरा दिराले कंकी जावा जावारो हिरा हिरारे
सांडे जावा एआ टिरा हिरा ली
पहेली कोरो कुस्सोरे टिरा हिरा ली
सांडे जावा एआ टिरा हिरा ली
तिसे बरसा बिसोर दादा सोनाले
जत्या लाहकी केवी दादा सोनाले
निंडे जावा इंतोनी दादा सोनाले
तेने नाकुन बेहासतो दादा सोनाले
वेंगुर वेंगुर इंतोरे होलो सोनाले
नन्न वेंगुर दाका रोय होलो सोनाले
बराड् बरती किया की दादा सोनाले
अलची वंजडि वगेडी हेलो सोनाले
बचोर पायला लागीला दाबा सोनाले
उसा ओता कोसा हेलो सोनाले
कोसार पायली लागर हेलो सोनाले
वंगडी भरता किमका हेलो सोनाले

निमा वेंजूर दाकी रो दादा सोनाले
नाना वंगा मंदाका दादा सोनाले
नाटे पेपी मंतोर हेलो सोनाले
पेपी निंगा मंदाकी हेलो सोनाले
पेपी हुडते पेरी पेरी हुडोया हेलो सोनाले
नाटे काकाल मंतोर हेलो सोनाले
काका निंगा मंवागी हेलो सोनाले
काकाल हुडते काकी हुडी वायार दादा सोनाले
नाना गल्ला वायीका दादा सोनाले
हेलो सोनाले कंजा नावा पोलो
हेलो सोनाले पुतोर अचो इनोर हेलो सोनाले
अचेर वेरा हिलवा लेजा वाया हेलो सोनाले
निमा अच्चो वायमा हेलो सोनाले
कंजा नावा पोलो हेलो सोनाले
नन्नाचो नन्ना वायवा अचोल तालोर हेलो सोनाले
नाना वी वायका दादा सोनाले

दोन आईबापांविना असलेल्या भावंडांचा हा एक मजेदार संवाद आहे. भाऊबहिणींचें प्रेम खूप आहे. एकमेकांना तीं माझ्या सोन्या, माझे सोने, म्हणून संबोधतात. पण आतां तारुण्याची हाक आली. भावंडांचे रस्ते दुभागले जायचे आहेत. किती गमतीनें तें या गाण्यांत सांगितलें आहे पहा.

**भाऊ** : माझ्या छोट्या बहिणी, थोडी डाळ घे. लवकर पेजपाणी तयार कर. माझ्या सोने, लवकर आटप.

**वहीण** : दादा, आज तीस वर्षे झाली. तूं कधीं लवकर स्वैंपाक कर असें म्हटलेलें आठवत नाहीं. तूं कुठें जातो आहेस? सांग बघूं, दादा.

**भाऊ** : सोने, मी बाजारांत जातों आहें. मला मोटा सौदा करायचा आहे.

(हा सौदा अर्थातच प्रेमाचा आहे हें सांगायला नकोच. गोंडी भाऊहि बहिणींना थापा मारतात अशा.)

**वहीण** : दादा, सोन्या, तूं काय विकणार आहेस रे?

**भाऊ** : मी न सडलेलें अलचीचें सुंदर भात विकणार आहें. (त्यांतहि खोंच आहे. श्लेष आहे. बहिणीला अलचीच्या सोनसळी सुवासिक भाताची उपमा भाऊ देतो आहे. हें भात असडिक आहे. बहिणीचें कौमार्य निष्कलंक आहे.)

**वहीण** : मग दादा, तूं किती भाव घेऊन जाणार रे?

**भाऊ** : भात होय, रेशमाच्या कोशाचें एक मापटभर भात पुरे. (रेशमाचे कोश जंगलांत ठिकठिकाणीं दिसतात. कोंबडीच्या अंड्याएवढे व तशाच आकाराचे ते असतात. आंत किडा गुरफटलेला असतो. बाकीचें सारें पोकळ असतें. कधीं किड्याचें पांखरूं होऊन उडून गेलें असलें तर बोटभर पोकळी आंत असते. भाऊ नांवालाच सौदा करणार. आपल्या लग्नांत बहिणीचेंहि थोडें पुढें शमटणार. बहीण त्या मापट्यांत मावेल एवढी तर आहे.)

**वहीण** : पण दादा, तूं गेलास तर मी एकटी कुठें राहूं?

**भाऊ** : तूं मामाकडे रहा.

**वहीण** : मामी मला शिव्या देते.

**भाऊ** : मग तूं काकाकडे रहा.

**वहीण** : काका माझे लाड करतो, पण काकी मला छळते. दादा मी तुझ्याबरोबर येतें.

**भाऊ** : ऐक सोने, परगांवीं कुणाला आपलें खरें नातें कळणार नाहीं. कुणी मानणार नाहीं. लोक तुलाच माझी बायको म्हणतील. मला अगदीं लाजल्यासारखें होईल. म्हणून तूं येऊं नको. मी काय सांगतों तें नीट ऐक. मी लवकर परत येईन. नक्की परत येईन.

**वहीण** : तें कांहीं नाहीं. मी येणारच. दादा मी येणारच.

या गाण्यांतला तीस वर्षांचा उल्लेख चेष्टेचा आहे. गोंडी गाण्यांत विनोदाची पखरण ठिकठिकाणीं केलेली आढळते. या सर्व गाण्यांत भावंडांच्या घरोघरीं होणाऱ्या संवादाचेंच पण जंगली आणि रमणीय स्वरूप प्रतीत होत आहे.

आतां फिरून मुलगे व मुली एकत्र येऊन फेर धरून गाणीं गातात. मुली त्यांतीं वाकून टाळ्या वाजवतात. मुलगे त्यांच्या समोर आवडीचे रंग करून नाचतात. गाणीं सुरू होतात. 'रीला रीला' असें पालुपद असल्यामुळें त्यांना रीला गीतें म्हणतात. रीला गाणीं प्रेमगीतें असतात. असंख्य रीला गाणीं वातावरणांत घुमत असतात. त्यांपैकींच एक येणें अशीं :

साटुने सदांन् दिप्पा मरंडाल मरियुन्
आवेर दीपाम् बोताम् मरियुन् नरंडाल
हावते रंडु दीपाम् मरियुन्
नावा रे मरिं अंदु वचि
आवे रे दीपा ते वराड् मरियुन्
पोसो रे गोती कोहला मरियुन्
कोहूल रे कोहला वायना मरियुन्

मरियुन् याचा अर्थ आतेभाऊ व मामेभाऊ असा होतो. गोंडांत मुलीचें लग्न या दोघांशीं होऊं शकतें. अर्थात् या गीतांत मुलगी आपल्या आतेभावाला, प्रियकराला उद्देशून बोलते आहे.

**मुलगी** : मरियुन्, बाजाराची वाट शेतांतून जाते आहे. कुणाचें बरें हें शेत आहे? एका शेताचे दोन भाग झालेले दिसताहेत.

**मुलाचा बाप** : हा माझा मुलगा मिंगा आहे ना, त्याचें आहे हें शेत, बरें मुली?

**मुलगी** : या शेतांत काय पेरलें आहे रे मरियुन्? मी येतें तुझ्या शेतांत. कुटकी आणि हरळी कापायला येतें.










मरंडाल म्हणजे भामेबहीण किंवा मारस-बहीण. गाण्यांत हा शब्द त्या दोघांचें प्रेम सूचित करण्यासाठीं आखड कडव्यासारखा घातला आहे.

दुसऱ्या गाण्यांतहि तेंच आहे :

सातो मेटा सांदी वेलोसा मरंडाल
सिरेल वेरेल मरा वेलोसा मरंडाल
हक्स कोपा सिरेल वेलोसा-मरंडाल
हिवार कांदा वेरेल वेलोसा मरंडाल
जोवी ओगे वायती वेलोसा मरंडाल
वायने न आयो वायेन सुवेदार मरियुन्
लोने दाई धंता सुवेदार मरियुन्
निया दाई कतेके वेलोसा मरंडाल
सुरी नेडी झापि वेलोसा मरंडाल
झापिते रुंद्रा हितोना वेलोसा मरंडाल
लोवे वूवान मन्तोर सुवेदार मरियुन्
नाके ववान रंगानूर सुवेदार मरियुन्
निया वूवान कतेके वेलोसा मरंडाल
पायिन् नोडिन् हितोना वेलोसा मरंडाल
लोने दादाल जंतोर सुवेदार मरियुन्
निया दादाल कतेके वेळोसा मरंडाल
सखूर खंडा हितोना वेलोसा मरंडाल
इचोल सामा हितोना वेलोसा मरंडाल
वेसक वन्ने हितोनी सुवेदार मरियुन्
कोने केदूर् जोली वेलोसा मरंडाल
जुलदे निमा मत्तोनी वेलोसा मरंडाल
अग्नी नवा हितोता वेलोसा मरंडाल
निके आइवा तासुन वेलोसा मरंडाल




हें गाणें संवादावरचं आहे. तरुण प्रियकर प्रेयसीला कांहीं तरी मुलांचें नांव ठेवून हांक मारतो. मुलगीही राजा, परधान, सुभेदार असें कांहीं तरी प्रियकराचें नांव ठेवते. या गीतांत वेलोसा हें जाईचें नांव मामेबहिणीला प्रियकरानें दिलेलें आहे. पुष्कळदां प्रियकराचे बोल पुरुष गातात. प्रेयसीचे स्त्रिया.

अर्थ :

**मुलगा** : वेलोसा, दूर दूर सात डोंगरांच्या मध्यें, अगदीं पलीकडच्या कडेला एक पिंपळाचें झाड आहे. आणि डोंगराच्या अलीकडच्या बाजूला एक वडाचें झाड आहे. चल, आपण त्याच्यावर बसून झोंके घेऊं. पारंब्यांवर उंच झोंके घेऊं.

**मुलगी** : सुभेदार, मी नाहीं येत. माझी आई त्रागा करील, शिव्या देईल.

**मुलगा** : मी सांगेन तुझ्या आईला. मीं सुंदर मोठी टोपली आणून ती कपड्यांनीं भरगच्च भरून तुझ्या आईला दिलेली आहे, बरें वेलोसा.

**मुलगी** : माझे बाबा रागावतात ना, सुभेदार?

**मुलगा** : मी सांगेन तुझ्या बाबांना. मीं ( आपल्या लग्नाचें ) देज तुझ्या बाबांना दिलेलें आहे. वेलोसा, तुझ्या सगळ्या नातलगांना मीं किती देणग्या दिलेल्या आहेत.

**मुलगी** : केव्हां दिलें हें तुम्ही, सुभेदार ?

**मुलगा** : ऐक वेलोसा, केव्हां दिलें तें सांगूं ? तूं जेव्हां छोट्याश्या पाळण्यांत झोंके घेत होतीस ना, त्या वेळीं मीं हें सगळें दिलें आहे. मी कांहीं तुला अशी सोडणार नाहीं. चल, वेलोसा, पारंब्यावर बसून उंच झोंके घेऊं.

अशा प्रकारें तरुणतरुणींचे थवे कधीं एकटे तर कधीं स्त्रीपुरुषांचे एकत्र असे जमून हा हुल्कीचा उत्सव साजरा करतात. या उत्सवाची अखेर आश्विन वद्य त्रयोदशीला होते. आपल्या दिवाळीचाहि प्रारंभ इथूनच होतो. या दिवशीं एका गांवांतल्या कुमारिका आणि कुमार मेळाव्यानें दुसऱ्या गांवीं जातात. तिथल्या मुली व मुलगे त्यांचें स्वागत करतात. पाहुण्यांना रात्रीं सुंदर जेवण देतात. मग परगांवचे मुलगे गांवांतल्या मुलींबरोबर नाचतात. आणि गांवांतल्या मुली परगांवच्या कुमारांबरोबर. मुलींच्या नाचाला रेलो नाच म्हणतात पण हें करतांना जणूं कांहीं टोळधाड आहे अशी बतावणी करून गांवचे मुलगे आपल्या इथल्या मुलींना पाठीमागें ठेऊन उभे रहातात. हातांत दांडे असतात. मग परगांवचे पाहुणे त्यांच्यावर हल्ला चढवतात. दांडक्यांचे आवाज, आरोळ्या, बीभत्स ( पण आनंदाचें व उत्साहाचें वातावरण निर्माण करणाऱ्या ) शिव्या रात्रींच्या शांत वेळीं जंगल गजबजून टाकतात. मशाली हातांत पेटलेल्या असतात. प्रेमाच्या समरांगणांतले हे योद्धे एक-मेकांवर जोराचा हल्ला करतात. लाठीचें कौशल्य या वेळीं पहाण्यासारखें असतें. गांवकरी बाजूला उभे राहून आरडून ओरडून त्यांना साद देत असतात. तितक्यांतच विनोदी वृत्तीची एखादी वृद्धा पुढें येते. तोंडानें अत्यंत अश्लील गाणें गात आणि शृंगारिक आविर्भाव करीत पर गांवच्या पाहुण्यांना कधीं कुरवाळीत तर कधीं चापट्या मारीत अशी ती नाचत नाचत फिरते. सगळेजण तिला "प्रिये, लाडके !" म्हणून हांका मारतात. एकच हंशाचा कल्लोळ माजतो. काठ्या वाजायच्या बंद होतात. मृदंगावर थाप पडते. लोक स्तब्ध होतात, आणि मग दोन गांवचे तरुण मिळून मृदंगाचा नाच करतात. स्नेहभाव व्यक्त करतात. यानंतर तरुण तरुणी एकत्र नाचतात. रात्रभर गात असतात. पहांटे कोंबडा आरवला कीं ही 'हुल्की'ची रात्र संपते. नाचगाणें बंद होतें. मग चालते ती केवळ थट्टामस्करी. तरुण-तरुणींचें प्रिया-राधन. यांतूनच जन्माचे जोडीदार निवडले जातात. वास्तविक हुल्कीचा हा उत्सव म्हणजे पृथ्वीचें सूर्याशीं लग्न लागलें तो प्रसंग, नाचून गाऊन साजरा करणें. या विश्वमंगलांतच तरुण-तरुणींनीं आपलेंहि शुभमंगल साधून घ्यावें हा संकेत गोंडांच्या निसर्ग काव्यमयतेची साक्ष पटवतो. निसर्गाच्या सांनिध्यांत रहाणाऱ्या लोकांनाच निसर्गदृश्यांशीं असें एकजीव होतां येतें. उन्हापावसाच्या हंगामांना जीवनाचे सोबती बनवतां येतें. सूर्योदयानंतर परगांवचे पाहुणे घरोघरीं हिंडून धान्यधुन्य गोळा करतात. ते सर्व नदीच्या कांठीं जाऊन तें शिजवतात. जेवून तृप्त होतात. उरलेंसुरलें बांधून बरोबर घेतात आणि गांवीं आल्यावर सूर्यदेवाचा प्रसाद म्हणून सर्वांना वांटतात. दुसऱ्या वर्षी ज्या गांवीं ते गेले होते त्या गांवची मंडळी अशीच हुल्कीसाठीं येते. पण जर का पाहुणचारांत आगळीक झाली, तर पाहुण्यांच्या गांवचा पाटील, यजमानांच्या गांवीं लुगडें आणि बांगड्या भेट पाठवतो. 'आमच्या गांवीं पुढच्या हुल्कीला या, मग उट्टें फेडूं' असा त्याचा अर्थ. याप्रमाणें गांवांत सख्य आणि वितुष्ट या प्रसंगांनीं भरपूर वाढत असतें आणि कधीं कधीं तर ठरलेलीं लग्नेंदेखील भांडणांत मोडून जातात. तर कधीं अचानक सलोखा झाल्यामुळें प्रीतीचे नवे बहराहि येत असतात.








आपल्या माणसांच्या प्रेमांत वाटेकरी आलेला कोणत्याहि स्त्रीला रुचत नाहीं.

# मावशी उरो

**मी सहज स्नेहलला म्हणालों, फार वर्षं झालीं आई गेली. पण माझी मावशी गेली हें कांहीं मला खरं वाटत नाहीं !**



चि. वि. बोकील

वयाच्या दुसऱ्या वर्षीच माझी आई गेली.

—पण माझी मावशी उरली होती. तिनंच कांहीं दिवस आईची सावली मला पुरवली. स्वतःचा संसार घटकाभर बाजूस सारून पाठच्या बहिणीच्या लेकराला छातीशीं धरायला मावशी धावून आली.

वर्षभरानं मावशीला जावं लागलं. मोठ्या कष्टानं तिनं मला दूर केलं. आणखी एकादं वर्ष तिनं आमच्या घरीं काढावं म्हणून माझ्या वडिलांनीं खूप रदबदली केली. खुद्द मावशीनं एक दिवस घरांत अबोला धरला—पण तिच्या सासूनं तिला ठेवण्याचं साफ नाकारलं. नंतर वर्ष दोन वर्षांनीं एकादा महिना ती आमच्या घरीं येऊन जाऊन होती.

लहानपणीं मला परब्रह्म याचा अर्थ सांगतां आला नसता— अजूनहि तें परब्रह्म माझ्या मेंदूला प्रश्नचिन्हच आहे. पण मावशी येणार असं कळल्यावर मला आनंद वाटे तो किंवा तसाच कसला तरी आनंद परब्रह्माच्या भेटीनं [illegible] असावा.

मावशी येणार म्हणजे—माझा चिमुकला मेंदू विचार करूं लागे—म्हणजे अण्णांना भ्यायचं कारण नाहीं. सकाळीं लवकर उठणं बंद. स्वयंपाकीणकाकूंच्या हातून अंघोळ नाहीं. वाटेल तेव्हां लाडू मागावा. वाटेल तेव्हां जेवावं, वाटेल तसा धिंगाणा घालावा. मावशी घरांत असेपर्यंत मला कुणाचीच भीति वाटत नसे.

मावशी जायला निघाली म्हणजे मला वाटे कीं, खूप पाऊस पडावा. गाडीचे पूल वाहून जावेत. गाड्या बंद पडाव्या. म्हणजे मावशीला नवऱ्याकडे जायला मिळणार नाहीं.

माझे हे विचार मावशीनं ऐकले म्हणजे ती डोळ्यांत पाणी आणून म्हणे, "असं बोलूं नये, बापू..."



अनुक्रमणिका

—पंचवीस वर्षांचा अबोध लोटला.

या सुदीर्घ कालावधींत आमच्या घरांत खूपच बदल झाला. मी पांच वर्षांचा असतांना माझ्या वडिलांनीं भीतभीत दुसरी आई घरांत आणली. अर्थातच एकट्या मावशीचा विरोध इतरांनीं मोडून काढला. नंतर मावशीचें येणं जाणं उत्तरोत्तर कमी कमीच होत गेलं.

पण मावशीची भीति निराधार ठरली. माझ्या नव्या आईनं मला डांगलं नाहीं, पोळलं नाहीं, फाडून काढलं नाहीं कीं बांधून ठेवलं नाहीं. इतरांचं ऐकून वागणारी ती नाटिष्ट बाई नव्हती. तिनं स्वतःला सुख लावून घेतलं आणि दुसऱ्यांनाहि सुख लागूं दिलं. मावशीइतका मला तिचा जिव्हाळा वाटली नाहीं,—पण स्वतंत्रपणाचा उबगहि आला नाहीं.

असं असेल तर कबूल करावं लागेल कीं, नव्या आईचा पायगुण चांगला होता. घराला कळा आली आणि अण्णांनीं त्यावर कळस चढवला. सढळ हातानं घरखर्च चालवला प्रत्ययास येऊं नये अशा वेतानं त्यांचा पगार वाढत गेला.

पंधरा वर्षांनीं आई गेली. स्वतःचं मूल एकहि न जगल्यामुळं ती नेहमीं कष्टी असे पण अखेरीस माझ्याच मांडीवर तिनं शेवटचे डोळे मिटले.

नंतर अण्णा एकाएकी विरक्त झाले. नोकरीची मुदत संपल्यावर माझं लग्न होईपर्यंत त्यांनीं कसाबसा धीर धरला. लग्नानंतर एकच महिन्यानें सुनेच्या गळ्यांत संसार अडकावला आणि तीर्थक्षेत्रासाठीं स्वतःची सुटका करून घेतली.

आजमितीस त्यांचा निश्चित पत्ता मला सांगतां येणार नाहीं. त्यानंतर घराकडे त्यांनीं तोंड केलं नाहीं. आमच्या घरांत बाळू आला, नंतर बेबी आली तरी अण्णांना त्यांचा पत्ताहि नव्हता. हळुहळू स्नेहलच्या सहवासात मी भोंवतालचं जग विसरून गेलों.

—मावशीच्या संसाराचा वेल समरून असा मांडवावर कधींच चढला नाहीं.

सासरा गेला, नवरा गेला आणि एक मुलगा दहा वर्षांचा होऊन गेला. मावशी एकटी राहिली. नाहीं म्हणायला सासू अजून जिवंत होती. जख्ख म्हातारी होती. पण अजून मनाचा पीळ कायम होता. आमच्या घरीं मावशी मधून मधून येते याचा तिला भयंकर राग येत असे. नाहीं नाहीं ते कुतर्क लढवून मावशीला बदचाल ठरविण्याचा तिला एकच छंद लागून राहिला होता. मावशीला छळायला ती माऊली बरींच वर्षं जीव धरून होती.

माझ्या लग्नाला मावशी आली नाहीं. मीं तीन चार पत्रं धाडलीं. पण सासूच्या दुखण्यानं उचल खाल्ल्यामुळं ती येऊं शकली नाहीं. निदान असं भासवण्याचा तिनं प्रयत्न केला. पन्नास वर्षांच्या बाईनं सासूला इतकं भ्यावं हें विलक्षण आहे—पण त्याला इलाज नाहीं. माझी मावशी आहे ही अशी आहे.

—आणि मावशी येणार म्हणून एके दिवशीं पत्र आलं. अगदीं अचानक. लग्नानंतर सहा वर्षांनीं येणाऱ्या मावससासूला पाहण्यासाठीं माझी पत्नी उतावळी झाली. ऐकीव माहिती पडताळून पाहण्यासाठीं ती अधीर झाली.

मावशी कशा दिसतात, कशा बोलतात, सोवळंओवळं कडक आहे किंवा कसं, रागीट आहेत का शांत आहेत इत्यादि अनेक प्रश्न विचारून स्नेहलनं मला पुरेपुरेसं केलं. मी चेष्टेनं म्हणालों, "रागीट? तू पहाशील आतां प्रत्यक्षच! तूं ऑमलेट खातेस म्हणून तिला मी सांगणारच आहें म्हणा! संभाळ हं. तुझ्या डोक्याचं ऑमलेट करायला धावेल ती—"

"इश्श! जुन्या माणसांना असं कुणी सांगतं वाटतं!"

नंतर थोड्या वेळांत कसली तरी आठवण झाल्यासारखं करून ती म्हणाली, "अन् हे बरं का, मी म्हणतें, आतां त्यांची म्हातारी सासू उलथली आहे तर त्यांना इथंच ठेवून घेऊं या."

कौतुकानं मान डोलावून मी म्हणालों, "हो! म्हणजे पोरांना संभाळायला, स्वयंपाकाला मोलाची बाई नको."

"इश्श ऽ!"

उच्चाराचा टसका आणि मानेचा गिरका यांचं बेमालूम सहकार्य (Synchronising) स्नेहल कुणाजवळ शिकली असेल राम जाणे! पण

परिणाम काय होता ? या तिच्या एकाचें चाळ्यावर मी जीव कुर्बान करायला राजी आहें ! तिच्या तोंडावर रोखलेली आसुसलेली नजर दुसरीकडे वळवून मी हंसून म्हणालों, "बाकी, घरांत हातारं मनुष्य पाहिजेच."

"हो, आधार असतो तेवढाच !" पोक्तपणानं ती म्हणाली.

"तर ग ! पोरं घरीं ठेवून सिनेमाला जातां येतं. सहली आहेत, प्रदर्शनं आहेत, क्रिकेट मॅचिस् आहेत, सतरा उद्योग आहेत. हंसतेस काय ? नवऱ्याबरोबर हिंडायची हौस नाहीं ?"

बारीक मंगळसूत्राचा मणी ओटांत धरुन ती हंसत सुटली. माझ्या प्रश्नाचं उत्तर प्रत्यक्ष शब्दानं देण्याची काय जरुरी होती ?

—मावशी आली.

—आणि माझ्या स्वतःच्या घरांत मीच परका ठरलों.

बाळू प्रथम दोनचार दिवस पितृभक्त राहिला, पण पुढें त्यानंहि बाजू बदलली. स्नेहल, बेबी आणि बाळू यांना उठतांबसतां मावशी लागूं लागली. स्वप्नांतहि त्यांना मावशीच दिसत असावी !

तशी पाहिल्याबरोबर मन वेधून घेईल असली रूपसंपदा मावशीच्या वांट्याला कधींच आली नाहीं. काळासावळा रंग, ठेंगणीठुसकी मूर्ति. सडपातळ बांधा आणि चार लोकांत खपून जाईल असा चेहरा—असंच मावशीचं कुणीहि वर्णन करील. छे ! तशी दिसायला मावशी अगदीं साधी होती.

कपड्याची थानछुकी तिनं कधीं केली नाहीं. सासऱ्याच्या दारिद्र्यानं तिला उंची वस्त्रं प्रावरणं अंगाखांद्यावर मिरवूं दिलीं नाहीं.

—पण एक गोष्ट तिच्याजवळ होती. तिच्या जोरावर म्हातारड्या सासू खेरीज तिनं सगळ्यांना जिंकून घेतलं होतं.

मावशीचा स्वभाव—

पण तेंच सांगणार आहें !

मावशी येऊन चार दिवस झाले. घरांत नवीन वारं वाहूं लागलं.

गर्दीच्या वेळीं कधींहि न सांपडणाऱ्या वस्तू आतां जागच्या जागीं सापडूं लागल्या ! सुपारी फोडायला आडकित्ता आरडाओरड करून मागण्याची गरज पडेना. अंथरुणं वेळेवर गुंडाळलीं जावीं, कपड्यांच्या घड्या व्यवस्थित दिसाव्यात, स्वयंपाकघरानं पूर्वीची कारखान्याची कळा टाकून द्यावी, मुलांच्या कपड्यांच्या नाड्या आणि गुंड्या जागच्या जागीं असाव्या—छे ! माझं मलाच माझं घर ओळखूं येईनासं झालं.

मी म्हणालों देखील, "मावशी, तूं कांहीं म्हण. पण तुझी ही शिस्त आपल्याला कांहीं पटत नाहीं—"

"तूं लागलास माझी म्हातारीची चेष्टा करायला ?" मावशी हसली.

"अग, पण हा डुईदुखेपणा आहे आमच्यावर ! मावशी, काय हा अनर्थ तूं मांडला आहेस ? कल्पना कर. बाळूचा शर्ट पाहिजे आहे. मी हुडकतों आहें. ही धावते आहे. हें हुडक, तें हुडक. हें सांड, तें फोड—एकच गोंधळ. तासभर घरांत हा गोंधळ ! स्नेहलबाई संतापानं लालबुंद झाल्या आहेत. लपावला एखादं उंदराचं बीळ मी हुडकतों आहें. बाळू रडत फोडून रडतो आहे. बेबी ओरडते आहे. वाः वाः ! अन् अशा या धावपळींत शेजारच्या यमूताईनीं वाळत घातलेल्या ठिकाणावरुन अंगणांत वाऱ्यानं उडालेला बाळूचा शर्ट आणून दिला म्हणजे काय आनंद वाटत असे म्हणून सांगूं !"

"हो !" स्नेहल ठसक्यांत मान उडवून म्हणाली, "आपण नुसतंच गाल फुगवून बसायचं अन् दुसऱ्याच्या जिवाची कसाला पर्वा असेल ?"

मावशी हंसून म्हणाली, "त्याला बोलूं दे ना ! तूं कां चिडतेस ?"

"नाहीं हो ! हे किनई नेहमीं असंच करतात. स्वतः कांहीं करायचं नाहीं, अन् नांव ठेवायला मात्र तेवढं. अंघोळीला बसले तर टॉवेलसुद्धां दुसऱ्यानं द्यावं—"

"अग, जो गुणवाळा तो जन्मकाळा ! मी याला आज का ओळखतें ? लहान होता तेव्हां कुणी खारीक दिली तर ती मीं चावून द्यावी म्हणून हट्ट धरायचा. कडेवर घेतलं तर खांद्यावर बसण्याचा याचा हट्ट. कांहीं म्हणून पसंतीस आलंय् बाळाच्या, नांव नको ! पण एक सांगतें तुला, पुरुषांच्या जरा कलानं घेतलं तर वेळप्रसंगीं काळीजसुद्धां बोटकोच्या पानावर ठेवतील ते !"

मावशीचं प्रशस्तीपत्र स्नेहलच्या मनावर ठसावं म्हणून मी जोरानं खाकरून म्हणालों,—

"ऐकलंस का ?"

"ऐकलं. लाडोबा करून ठेवलंय् सगळ्यांनीं तुम्हाला अन् दुसरं काय!"

—मावशी आल्यानंतर स्नेहलला माझ्याबरोबर हिंडायला वेळ मिळूं लागला. मावशीनं तिचा संकोच एकाच वाक्यांत मोडून काढला.

"तरुणपणीं कोणत्या गोष्टी माणसाला आवडतात तें अजून मी विसरलें नाहीं!" या मावशीच्या तत्त्वज्ञानाचा नंतर स्नेहलनं भरपूर फायदा घेतला.

चार आठ दिवसांत पुन्हा मला पहिली वहिली तरळ डोळ्यांची स्नेहल दिसूं लागली. मूळचेच स्वप्नाळू भासणारे तिचे नेत्र जास्तच उन्मादक भासूं लागले. पदराचं जानवं सारखं करतांना ती चोरट्या नजरेनं माझ्याकडे पाहूं लागली. मलाहि पण तिच्या खांद्यावर हलकेच हात ठेवतांना 'कसंसंच' होऊं लागलं. स्त्रीचा स्पर्श विजेच्या प्रवाहासारखा भयंकर असतो याची जाणीव पोरं झाल्यावर बुजून जाते. ती जाणीव मला पुन्हा प्रत्ययाला येऊं लागली. मानेवरच्या चोरट्या श्वासाची धुंदकता किती विलक्षण असते याची उत्तम साक्ष म्हणजे अशा प्रसंगीं मिटून घेतलेले स्नेहलचे दोन डोळे !

पुन्हा सहा वर्षांपूर्वीची नवतीची वेल तरतरून आली. तिच्या मानेचा गिरका लयबद्ध होऊं लागला. पावलांत अधीरेपणा, उतावीळपणा यांचा रंग भरूं लागला. नुसत्या सूचनेवरून तिच्या गालांवर रक्तिमा चढूं लागला ! जी स्नेहल मला पाहिजे होती ती मला मिळाली. मावशीनं माझी स्नेहल मला पुन्हां मिळवून दिली.



स्नेहलच्या आग्रहावरून मी एके दिवशीं हळूच मावशीजवळ गोष्ट काढली,

"मावशी ग ! आतां तुला आम्ही सोडणार नाहीं!"

"म्हणजे बांधून ठेवणार आहांत कीं काय मला ?"

"माझं म्हणणं असं कीं तूं आतां जाऊं नकोस. म्हणजे काय कीं— मला सावली होशील. स्नेहलला आणि मुलांनाहि पण तूं तसाच जीव लाव. अण्णा तर आमच्याकडे ढुंकूनहि पहात नाहींत म्हणून म्हटलं."

माझ्या विनंतीला हातभार लावण्याच्या हेतूनं स्नेहलहि म्हणाली, "अन् आम्हाला तरी दुसरं कोण आहे तुमच्याशिवाय?"

हातांतला वातीचा कापूस कागदावर ठेवून मावशीनं आधीं पोटभर हंसून घेतलं. नंतर स्नेहलला ती म्हणाली, "तूंहि याचा गुण उचललास? तूंहि गोडाजी झालीस?"

आमच्या कष्टी चेहेऱ्यांकडे पाहून ती खालीं मान घालून म्हणाली, "तुम्हाला कंटाळा येईल तोपर्यंत राहीन. पण ज्या दिवशीं तुम्हांला मी जड होईन तेव्हां अगदीं स्पष्ट सांगा !"

माझ्या खांद्याला धरून स्नेहल हंसत म्हणाली, "आपली चेष्टा करताहेत त्या! म्हणे, कंटाळा येईल!"

मावशीनं सपशेल नकार दिला नाहीं, हें ऐकून मला अतिशय आनंद झाला!

आईची उणीव भरून काढायला पुनः मावशी धांवून आली. मोठा भाग्यवान् आहें मी!

•

—पण ज्या क्षणीं मला माझ्या भाग्याचं कौतुक वाटूं लागलं त्याच क्षणीं त्याला दृष्ट लागण्यास आरंभ झाला!

एक महिना झाला होता. पहिल्या तारखेला माझ्या पगाराचे पैसे मीं मावशीजवळ दिले. अजून मला या कृतीचा उलगडा होत नाहीं. गेलीं सहा वर्षं मी कधींहि न चुकतां पगाराचे सगळे पैसे स्नेहलजवळ देत आलों होतों, आणि या खेपेस कसा चुकलों? मला वाटतं, मी संध्याकाळीं घरीं आलों तेव्हां स्नेहल कुठं तरी मैत्रिणीकडे गेली होती. ती दिवे लागल्यावर परत आली.

जेवणंखाणं उरकल्यावर स्नेहल सुपारीचा बकाणा भरायला म्हणून माझ्या टेबलाजवळ उभी राहिली. सहज कॅलेंडरकडे तिची नजर गेली. माझ्याकडे पाहून ती म्हणाली,—

"हें काय? आज पहिली तारीख! पगार झाला नाहीं?"

मी उत्तर देण्याच्या आंतच मावशीच बाहेर आली अन् पैशाचं पाकीट स्नेहलच्या हातांत देऊन म्हणाली, "हें संभाळ, बाई! भाच्यांनी मोठ्या प्रेमानं मान दिला पण मला दहाचा कागद अन् पांचाचा कागद यांच अजून गोंधळ पडतो बघ!"

स्नेहलनं पाकीट हातांत घेतलं. क्षणभरच तिनं गंभीरपणानं माझ्याकडे पाहिलं. नकळत वातावरण किंचित् तंग झाल्याचा मला भास झाला! थट्टेवारी नेण्याच्या इराद्यानं मीं उगीच हंसून म्हणालों, "तुला शोधायला मला गांवभर धांवावं लागलं असतं म्हणून म्हटलं—"

"पण—पण—" स्नेहलनं वाक्य पुरं केलं नाहीं. वरच्या दातांनीं ओठ चावून ती स्तब्ध राहिली.

तो प्रश्न तेवढ्यावरच थांबला. निदान मी तरी स्वतःची समजूत करून घेतली.







—दुसऱ्या दिवशीं अचानकपणानं तो प्रसंग घडून आला.

मी रोजच्याप्रमाणं संध्याकाळीं घरीं आलों. आमच्या दारांत बायकांचा घोळका जमलेला पाहून मी चकित झालों. मला पहातांच चिमण्यांचा घोळका हां हां म्हणतां पांगला. एका मुलीनं मला सामोरं येऊन म्हटलं, "किनई, तुमची वेबी जिन्यावरून पडलीय! खूप खूप लागलंय् तिला—"

मी धांवतच जिना चढून वर गेलों. मला पाहतांच भेदरलेल्या बाळानं टाहो फोडला.

कॉटवर वेबी निपचित पडली होती. मावशीनं तिचं डोकं आपल्या मांडीवर घेतलं होतं. चारदोन वयस्क बायका भोंवतालीं कुटमेळत होत्या.

मला पहातांच मावशी शांतपणानं म्हणाली, "घाबरूं नकोस—सगळं कांहीं ठीक होईल. खेळतां खेळतां जिन्यावरून तोल गेला तिचा."

स्वतःच्या जुनेऱ्याच्या चिंधोट्या फाडून मावशीनं तिच्या डोक्याला गुंडाळल्या होत्या. जखमांतून हळद भरलेली दिसली. रक्त वाहण्याचं थांबलं होतं. पण भीतीनं अजून वेबीची छाती धडधडत होती. मी एकदम घाबरून म्हणालों, "डॉक्टरांना घेऊन येतों—"

"कशाला? माझ्याजवळची मात्रा उगाळून दिलीय् मीं आतांच. तितका कांहीं जबर मार बसलेला दिसत नाहीं. घाबरलंय् लेकरूं. उद्यां सकाळीं पुन्हा खेळायला जाईल—" मावशीच्या बोलण्यांतल्या संथपणानं एकदम मला बरं वाटलं. माझा चटकन् विश्वास बसला. एक सुटकेचा श्वास सोडून मीं बेबीच्या अंगाला हात लावून पाहिलं—

वेबीनं आपले चिमुकले डोळे उघडले अन् मला कोण आनंद झाला म्हणून सांगूं! थोड्या वेळानं मला एकाएकीं आठवण झाली. आंतल्या बाजूला डोकावून पहात मी म्हणालों, "अन् ही कुठं दिसत नाहीं घरांत?"

माझ्या मागच्या बाजूला उभ्या असलेल्या सौ. अन्नपूर्णाबाईंनीं मधेंच तोंड घालून म्हटलं,—

"शिणीमाला गेल्या आहेत—"

लगेच मावशीनं खुलासा केला, "मैत्रिणी आल्या होत्या. त्यांनीं फार आग्रह धरला. ती जात नव्हती, पण मींच म्हटलं जा म्हणून!"

"पण—पण—" मी गोंधळून म्हणालों.

"बापू, उगीच कांहीं बोलूं नकोस तिला. स्वप्न का पडलं होतं तिला हें असं होईल म्हणून! चांगली पोरगी खेळत होती. बाळू, ती झालंच तर समोरची चंपी सगळीं जणं लपंडाव खेळत होतीं. मीं आंत जाऊन तुझ्या चहाकरतां स्टो पेटवला अन् इकडे हा गोंधळ झाला. अरे, असं पडल्याझडल्याशिवाय का लहानाचं मोठं होतं!"

मला मावशीचं हें सगळं तत्वज्ञान पटलं, पण स्नेहलनं असा बेफिकीरपणा करावा ही गोष्ट माझ्या मनांतून जाईना. आजचा हा नवीन प्रसंग नव्हता. चौथी वेळ होती!

—रात्रीं आठ वाजून गेल्यावर ती घरीं आली. घरांतला हा देखावा पाहून तिचा चेहेरा पांढरा फटक पडला. नंतर तिनं वेबीला छातीशीं कवटाळून धरलं. तिला वाटीभर दूध चमच्यानं पाजलं—सगळं केलं. पण तिच्याहि मनाला खंत वाटूं लागल्याचं मला स्पष्ट दिसत होतं.

झोंपायच्या वेळीं मला राहवलं नाहीं: मी हलकेच म्हणालों, "मावशी होती घरांत म्हणून पोरगी हातीं लागली!"

स्नेहलनं दचकून वर मान केली. माझ्या तोंडाकडे चमत्कारिक नजरेनं तिनं पाहिलं अन् लगेच खालीं मान घातली.

—खरंच, माझी मावशी सबंध वाड्याची मावशी झाली. दोन महिन्यांत तिनं आपल्या गोड स्वभावानं सगळ्यांना आपलंसं करून घेतलं.

कुणाचंहि दुखलं खुपलं कीं—मावशीला बोलावणं ठेवलेलं. एखादी सासुरवाशीण शिवायचं विणण्याचं घेऊन येई अन् मावशी तिला आस्थेनं सांगत असे. रेशनिंगला आणि सरकारला शिव्या मोजण्याचं लळभरू वक्तव्य करायला एखादी टेमालफार्क आली तरी मावशी हंसत हंसत तिला सरकारच्या अडचणी समजावून सांगूं लागे. मी कधीं कधीं थट्टेत म्हणावं, "मावशी, हें ज्ञान तुला कुणी शिकवलं? खरं सांगायचं तर हा सगळा रेशनिंगचा कारभार सरकारनं तुझ्या गळ्यांत बांधायला पाहिजे. एक तक्रार येणार नाहीं!"

मावशी संथपणानं म्हणे, "अरे, दोष काढणं फार सोपं असतं रे! पण माणसानं विचार करायला नको? एक घर चालवायचं म्हटलं तर अक्कल नाहीं अन् उठल्यासुटल्या सरकारला शिव्या द्यायच्या ही काय रीत झाली? बायकांना समजावून दिलं म्हणजे त्यांना पटतं. आपल्याला अडचणी असतात. लोकांच्या अडचणी आपण लक्षांत घ्यायला नकोत? त्यांतून हें सरकार दुसऱ्याचं का राहिलं आहे आतां?"

मावशीचं एकएक भाषण म्हणजे मुरलेलं तत्त्वज्ञान मला वाटे. व्यवहाराच्या शाळेंत तिनं मन लावून अभ्यास केलेला असावा. आणि त्यामुळंच स्वतः-पेक्षां दुसऱ्याला आधीं जपण्याची तिला संवय जडून गेली होती.

जशी वाड्यांत तशीच मावशी घरांतहि परार्थच झिजत होती. मुलांना तर मावशीखेरीज घांस गिळवत नसे. बेबी अष्टौप्रहर मावशीच्या पदराला धरून असे. जेवायला मावशी, खेळायला मावशी, फिरायला मावशी, रात्रीं झोंपायलादेखील मावशीच जवळ पाहिजे.

मावशीला आळस कसा तो ठाऊक नव्हता. दोन्ही वेळचा स्वयंपाक ती स्वतः करीत असे, स्नेहलची भीति व्यर्थ होती. मुलांच्या घरांत फाजील सोवळेपणा चालत नसतो म्हणून मावशीनं आपल्याच तोंडानं जाहीर करून टेवलं होतं. तिच्या संबळींतल्या देवांना गदींगदींनं पाण्यांत बुचकळून काढण्याचं काम मी स्वतः हौसेनं अंगावर घेतलं होतं. माझा विश्वास त्या धातूंच्या देवांवर नव्हता, पण हाडामांसाच्या जिवंत मावशीवर माझी दृढ श्रद्धा होती. तिला सुखी ठेवण्यासाठीं मी वाटेल तें किंव्य केलं असतं.

स्नेहलला तिनं अगदीं फुलांत ठेवलं होतं. घरांत इकडची काडी तिकडे करण्याची तिला आतां जरूरी उरली नव्हती.

मला कांहीं लागलं तर मावशीला मीं हांक मारावी. मावशीनं मला चहा करून द्यावा. मावशीनं मागिणीला अंतस वाढावी. मावशीनं बाळूला भरवावं. मावशीनं वाण्याकडे रेशनकार्ड नेऊन द्यावीं. वाड्यांतल्या एखाद्या पहिलटकरणीला डोहाळेजेवण द्यायचं तर मावशीनं सल्ला द्यावा.

मला कधीं कधीं नवल वाटे कीं, आजवर मावशीविना आमचं हें घर चाललं तरी कसं? मात्र एकच गोष्ट मला मावशी आल्यापासून खटकत होती—

ती म्हणजे—पण छे! वेडा विचार आहे तो! भासच असेल बहुतेक! पण—स्नेहल माझ्याशीं पूर्वीप्रमाणं लाडीगोडीनं वागत नाहीं असं मला वाटलं. मांजरी जशी अंगाशीं अंग घांसते, घुरघुर आवाज करीत शेपटी वर करून पायांत घोटाळते तशी तऱ्हा स्नेहलची पूर्वी. म्हणजे मावशी प्रथम आली तेव्हां होती! अलीकडे माझ्याशीं बोलतांना मध्येंच ती चमत्कारिक नजरेनं माझ्याकडे पाही, पण छे! भासच तो.

—दिवाळी आठ दिवसांवर आली होती.

यंदा दिवाळी थाटांत करायची असा माझा बेत होता!

मावशीला चकित करून सोडावं! मुलांना खूप करावं अन् स्नेहलला मोत्याच्या बांगड्या पाडव्याला द्याव्या—! मॅट्रिक झाली असली तरी बाई दागिन्याची लोभीच एकंदरींत!

रात्रीं जेवणं खाणं झालीं. मुलं झोपीं गेलीं. स्नेहल आरामखुर्चीवर पडून ब्लाऊझला गुंड्या लावीत होती. मी कादंबरी डोळ्यांसमोर धरून पडलों होतों. पण खरं सांगायचं तर स्नेहलच्या सौंदर्याचा चोरटा आस्वाद घेत होतो! बायको बेसावध असतांना नवऱ्यानं तिच्या तोंडाकडे टक लावून पहावं म्हणजे ती खरोखरीच फार सुंदर दिसते. बाईला दोन मुलं झालीं म्हणजे हे कादंबरीकार म्हणतात म्हणे—बाई कामांतून गेली!

कबूल.-कलिकेचें सौंदर्य मान्य आहे! पण पूर्णपणें उमलेल्या फुलाचाहि डौल अन् गंध कांहीं अगदींच उपेक्षणीय नाहींत. निदान मी तरी दोन मुलांची आई असलेल्या त्या पोरीवर बेहद्द फिदा आहें!

स्वयंपाकघरांतला दिवा मालवून मावशी बाहेर आली. स्वतःसाठीं आंतल्या बाजूला टाकण्यासाठीं गादी न्यायला ती आली असावी. तिला आलेली पहातांच मीं हातांतलं तें भिकार पुस्तक फेंकून दिलं अन् आवर्जून म्हणालों, "मावशी, झोंपायला खूप अवकाश आहे. इथं माझ्या डोक्याशीं बैस पाहूं जरा."

मावशी हंसली अन् म्हणाली, "लहानपण आठवलं वाटतं? हात भरून यायचा बाबा, तुला थोपटून थोपटून—पण तुझे डोळे टकाटकां पाहात.

सताड उघडे—मावशीला पुरतं छळून घेतलेस. आतां छळणूक पुरे नाहीं का झाली ?"

पण मावशी आली. माझ्या डोक्याला आपल्या जीर्ण मांडीचा आधार तिनं दिला. मला वाटलं, 'सुख सुख' म्हणून निराशेनं कपाळ बडवीत गेलेल्या पूर्वींच्या साधुसंतांना माझ्या मावशीची मांडी डोकं टेकायला नव्हती म्हणूनच त्यांची फसगत झाली असावी.

माझ्या केंसांतून आलीं खरबरीत बोटं मायेनं फिरवीत मावशी म्हणाली,—

"किती चरबरीत केंस झाले आहेत रे, बापू, तुझे ?"

मी हंसून म्हणालों, "तुझ्याशिवाय त्यांना स्नेहाचं बोटं कोण लावील, मावशी ?"

"चल ! चावट मेला ! सत्तेची बायको आहे कीं !" कृतककोपानं मावशी म्हणाली.

हातांतला ब्लाऊझ टेबलावर फेंकून स्नेहल किंचित् तुटकपणानं म्हणाली, "पण बायकोचीं बोटं केसांना लागलीं तर त्यांना इंगळ्या डसतात !"

"अन् लहानपणीं तरी काय हाच धिंगाणा ! डोक्याला तेल लावूं देईल तर शपथ. आण—आंतनं ती तेलाची बाटली घेऊन ये. असं चपचपीत लावून सोडतें—"

पण मावशीला पुरं बोलूं न देतां स्नेहल रुक्षपणानं म्हणाली, "पुरे त्यांचं कौतिक ! मला झोंप आली आहे !"

मी चमकून तिच्या तोंडाकडे पाहिलं ! स्नेहलच्या तोंडचे हे शब्द ? मला खरं वाटेना !

मावशी आंत गेल्यावर झटकन् दिवा बंद करून स्नेहल कॉटवर लवंडली. मी अक्षर बोललों नाहीं. मात्र स्नेहलचा अर्धस्फुट हुंदका मीं अंधारांत ऐकला. चटकन् तिच्या दंडाला धरून मी म्हणालों, "स्नेहल, काय झालं ग ?"

स्नेहलनं माझा हात झिडकारून आवेशानं म्हटलं, "काय झालं म्हणायला कांहीं वाटतंय् का ? काय शोभा केली आहेत तुम्हीं माझी माझ्या घरांत ? मावशी—मावशी—मावशी ! जिथं तिथं मावशी. मी म्हणजे कुणीच नाहीं तुमची ! इतका पुळका होता मावशीचा मग लग्न तरी कशाला केलंत ? बाब्याची मावशी, बराची मावशी, बागची मावशी, बाळूची मावशी, बेबीची मावशी, तुमची मावशी. मग मी काय तिच्याची बाहुली आहे होय ?"—

"अग, पण—जरा ऐक—" मी तिच्या तोंडावर हात ठेवून म्हणालों. माझा हात पुन्हा झिडकारून ती म्हणाली, "कशाला ऐकू ? मी आड-पडद्यानं बोलणार नाहीं. हें घर माझं आहे. माझंच राहील. कितीहि बाष्कळ असलें तरी मी या घराची मालकीण आहें. मला गुंडाळून ठेवून तुम्ही कांहीं कराल तर मला खपणार नाहीं, सांगून ठेवते."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उशीर करून उठलों. स्नेहल उठून गेली असावी. आंतल्या बाजूला मी गेलों—आंतला देखावा पाहून मी थक्क झालों. सामान बांधून मावशी एका ट्रंकेवर बसली होती. स्नेहल डोळ्यांत पाणी आणून तिच्या पायांजवळ बसली होती. बाळू आणि बेबी आईच्या पाठीशीं उभीं होतीं. हें काय चाललं आहे तें त्यांना समजत नसल्यामुळें त्यांच्या मुद्रा गोंधळून गेलेल्या दिसल्या. मीही पण त्यांच्याबरोबरच गोंधळून गेलों.

मावशीच्या मुद्रेवर कसलाच भाव उमटलेला दिसला नाहीं.

आईच्या प्रेमानं ती स्नेहलच्या पाठीवर हात फिरवीत होती.

माझ्या पावलांचा आवाज ऐकतांच स्नेहलनं माझ्याकडे पाहून दीनवाणीनं म्हटलं,—

"तुम्ही तरी सांगा हो! मला क्षमा करायला सांगा. मी चुकलें. गाढवासारखं कांहीं तरी बरळलें. पुन्हा असं बोलेन तर माझ्या जिभेचे वाटलं तर तुकडे तुकडे करा! पहा या ऐकत नाहींत. माझ्या रागावर या निघून चालल्या आहेत."

मावशीकडे वळून मी म्हणालों, "मावशी, खरंचं तूं निघालीस?"

मावशीनं माझ्या हाताला धरून मला जवळ ओढलं. स्नेहलला अन् मला दोघांनाहि जवळ घेऊन ती म्हणाली, "बाळांनों, माझं ऐका. मी चाललें आहे हें खरं आहे. पण तुझ्यावर किंवा हिच्यावर रागावून नाहीं. दोघं जणं तुम्ही मला पोटच्या गोळ्यासारखीं आहांत. पोटच्या गोळ्याचा का कुणी राग धरीत असतं?"

"मग जातेस कशाला?" मी तिच्या हाताला धरून म्हणालों.

थोडा वेळ थांबून मावशी शांतपणानं म्हणाली, "स्नेहलचं कालचं भाषण मीं ऐकलं. थांबा. कुणी बोलूं नका मधें! त्या भाषणाचा मला राग आला नाहीं. उलट, मला नवीन दृष्टि मिळाली त्यामुळं. बापू, माझ्या सासूचा मला फार राग येत असे. मरेपर्यंत तिनं मला रडून घेतलं, पण तिच्या त्या चमत्कारिक स्वभावांतली खरी गोम मला समजली तेव्हांपासून मी तिचा राग करण्याचं सोडून दिलं.

"जहांबाज बाई होती ती---" मी म्हणालों.

"हा गैरसमज सर्वांनीं करून घेतला होता. नीट विचार कर. मी त्यांच्या घरांत जाण्यापूर्वी माझी सासू त्या घराची स्वामिनी होती. अगदीं आदर्श गृहिणी म्हणून सगळीं जणं तिची स्तुती करीत असत. पण मी घरांत पाऊल ठेवल्यावर तिच्या घरांत सत्तेनं वागूं लागले!"

"केव्हांहि, सून असलीस तरी तें घर यापुढं तुझंच होतं—"

"खरं ना? पण अतिप्रेमळ माणसांना तें पटत नाहीं. स्नेहलचा तूं नवरा. हीं गोजिरवाणीं पोरं तिच्या पोटचीं. त्यांच्याकरतां ती मृत्यूशीं झगडून आलेली. तिला वाटलं, आणि तें वाटणं अगदीं बरोबर आहे, कीं माझीं माणसं दुसऱ्यांनीं कां लुबाडावीं?"

स्नेहल डोळ्यांत पाणी आणून म्हणाली, "पण मी चुकलें—"

तिच्या केसांवरून हलकेच हात फिरवीत मावशी म्हणाली, "मुळींच नाहीं. तुझा हक्कच आहे तो. तूं त्यांच्यावर जीव लावावा अन् त्यांनीं तुझ्याशिवाय इतर कुणावरहि जीव लावूं नये हेंच खरं आहे. ही आंच असेल तरच घराचं घरपण शिल्लक राहील. माझ्या सासूची चूक नव्हती. पण मला तें समजण्यापूर्वी मी विनाकारणच तिच्यावर चिडत होतें."

"पण मी शिकलेली असून असा आपलपोटेपणा करीत होते—" स्नेहल मध्येंच म्हणाली.

पण तिला पुढें बोलूं न देतां मावशी म्हणाली, "शिकलेली बाई किंवा माझ्यासारखी अडाणी बाई—दोघीहि सारख्याच. आपल्या माणसांच्या प्रेमांत वांटेकरी आलेला कोणत्याहि स्त्रीला खपत नाहीं. आणि तेंच बरोबर आहे. बाळांनों, चिमण्यांनों, माझं वेडीचं ऐका. दोघं सुखानं राज्य करा. बापू, रडूं नकोस मी अधून मधून येत जाईन. चार दिवस रहात जाईन. आईची किंवा मावशीची माया ठराविक वयापर्यंत सत्ता चालवूं शकते. कलम केलेल्या रोपट्याप्रमाणं पुढं अन्य ठिकाणांहून माया ओढून घ्यावी लागतें. बापू, भाग्यवान् आहेस तूं. स्नेहलसारखी प्रेमळ बायको तुला मिळाली यांत मला आनंद आहे. ती तुझी बायको तर आहेच आहे, पण पोराला डिवचलं तर आई ज्या रागानं खवळून उभी रहाते त्या आवेशानं आईची सत्ता गाजवायला अन् माया लावायला ती तुझ्या पाठीशीं उभी राहील. आतां मी निवांत झालें. ताई गेल्यानंतर मला तुझी काळजी वाटली. तुला आई नाहीं म्हणून मीं तुझ्यावर पदर घातला. पण आतां या पोरीनं तुला सांवली केली आहे. हीच तुझी बायको अन् हीच तुझी आई! असंच गोडीनं रहा बरं."

आमच्या दोघांच्या आग्रहाला मान देऊन मावशी दिवाळी होईपर्यंत राहिली. भाऊबीजेच्या दुसऱ्या दिवशीं ती निघून गेली. आणि गेली ती कायमचीच!

पुन्हा ती आम्हांला दिसली नाहीं. चार महिन्यांनीं किरकोळ तापाचं निमित्त होऊन मावशी गेली. तिच्या अखेरच्या वेळीं मला जातां आलं नाहीं!

कारण त्याच वेळीं स्नेहल बाळंतपणाच्या दवाखान्यांत बेबीच्या धाकट्या बहिणीला घेऊन कॉटवर पडली होती! मी सहज स्नेहला म्हणालों, "फार वर्षं झालीं, आई गेली. पण मावशी गेली हें खरं वाटत नाहीं. आपली ही छोटी बेबी तर—"

स्नेहल दिलखुलास हंसून म्हणाली, "त्यांचंच नांव हिला ठेवूं म्हणजे झालं."
















आपल्या देव्हाऱ्यांतील पूर्वीच्या मूर्ती फेंकून देऊन तेथें झपाट्यानें तो नव्या मूर्तींची स्थापना करीत असतो.
पण तें कां ?

'सामान्य वाचक' हा एक आपल्या अखंड कुतूहलाचा विषय होण्यासारखा प्राणी आहे. ह्याच्या नांवानें पुष्कळसे ग्रंथकार व लेखक हांकाटी करीत असतात आणि टीकाकार खडे फोडीत असतात. हा मात्र असल्या गोष्टींकडे लक्ष न देतां आपला मार्ग आपल्या प्रकृतीनुसार आक्रमित असतो. आतांपर्यंत जगानें ज्या लेखकांना शिरसावंद्य मानलें आहे त्या लेखकांच्या कृती ह्या 'सामान्य वाचका'नें प्रथम मान्य केलेल्या आहेत ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. शेक्सपियर, कालिदास, ज्ञानेश्वर, तुकाराम ह्यांजवर आपल्या मान्यतेचा शिक्कामोर्तब त्या सामान्य वाचकानें काळाच्या मार्फत केला आहे. तो नेहमींच आपले निर्णय काळाच्या मार्फत देत असतो. शेक्सपीयर, ज्ञानेश्वर, तुकारामाच्या या बाबतींत तर असेंच झालेलें आहे कीं, सामान्य वाचकानें कालमुखानें त्यांच्या श्रेष्ठत्वासंबंधीं दिलेला निर्णय हा फार महत्त्वाचा ठरला आहे. ह्या निर्णयावर मल्लिनाथी करण्याचें काम टीकाकारांनीं केलेलें आहे व तेंच काम अजूनहि टीकाकार करीत आहेत.

काळाच्या मार्फत ह्या सामान्य वाचकानें वाङ्मयासंबंधीं दिलेले निर्णय हे अचूक असतात असेंच आतांपर्यंत आढळून आलें आहे. हे निर्णय घेण्यासाठीं तो पुष्कळदां फार वेळ घेतो. टीकाकारांना म्हणजे वाङ्मयाच्या धंदेवाईक मूल्यमापकांना हे निर्णय घेण्याची घाई झालेली असते तरी सामान्य वाचकाला ही घाई कधींच होत नाहीं. तो याबाबतींत उदासीन असतो किंवा संथ असतो. पुष्कळदां तर तो इतका संथ असतो कीं, टीकाकार व लेखक हे त्याजवर रागावतात. परंतु त्याला ह्या लोकांच्या रागलोभाची पर्वा नसते. जीवनव्यवहार हे त्याचे प्रमुख व्यवहार असतात. हे जीवनव्यवहार करीत असतांनाच तो अधूनमधून ह्या वाङ्मय-व्यवहाराकडे लक्ष देत असतो. वाङ्मयासंबंधीं गंभीरपणें विचार करावयाला त्याला वेळहि नसतो आणि इच्छाहि नसते. त्यानें वाङ्मय-व्यवहाराकडे अधिक गंभीरपणें पहावें अशी टीकाकारांची व लेखकांची ओढ असते; परंतु तें त्याला शक्य नसतें व जरूरीचेंहि नसतें.

हा जो सामान्य वाचकांचा प्रचंड समुदाय असतो त्याच्या अभिरुचीसंबंधीं सरसकट सर्वलागू विधानें करणें मोठें धाडसाचें आहे. परंतु असें असलें तरी त्या अभिरुचीचीं कांहीं वैशिष्ट्यें आपल्या लक्षांत येणें शक्य आहे व वाङ्मय-व्यवहाराशीं त्यांचा येणारा संबंधहि त्यावरून निष्कर्षितां येण्यासारखा आहे. एक गोष्ट अशी कीं, हा सर्वसामान्य वाचक म्हणजे एक सर्वसामान्य माणूस असतो. सामान्य मनुष्य ज्याप्रमाणें श्रेयस्‌पेक्षां प्रेयस्‌कडेच अधिक आकृष्ट होत असतो त्याप्रमाणें हा वाचकहि श्रेयस्‌पेक्षां प्रेयस्‌कडेच अधिक कललेला असतो. जीवनाप्रमाणेंच वाङ्मयांतील वरवरची झिलई त्याला अधिक आकर्षित करित असते. जोजारी मूल्यांना जीवनाप्रमाणेंच वाङ्मयांतहि जो एकसारखा भाव येतो तो ह्यामुळेंच. स्वप्नरंजन करणें, इच्छापूर्ति करणें, पुनःप्रत्यय देणें हींच वाङ्मयाचीं ध्येयें असावींत कीं काय असा जो वारंवार प्रश्न अनेकांच्या मनांत निर्माण होतो व त्यांतील कांहीं तर वारंवाईनें त्याला धोरणात्मक उपपत्तीचें स्वरूप देतांना जे दिसतात तें ह्यामुळेंच. जीवनांतील श्रेयस् काय हें सांगण्याची तसेंच

वा. ल. कुलकर्णी



अनुक्रमणिका

विचारवंत धडपड करीत असतात. ह्या त्यांच्या प्रयत्नांत त्यांना कितपत यश येतें हा पुढचा प्रश्न आहे. परंतु त्यांचा प्रयत्न एवढ्यासाठींच चालू असतो हें नक्की. सर्वसामान्य वाचकाला शांतपणें या गोष्टी विचारांत घ्यावयाला सवड नसते व गरजहि नसते. त्याचा वाङ्मयव्यवहार त्याच्या सोयीनें चालू असतो.

परंतु आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, बहुधा प्रेयसकडे झुकलेला हा सामान्य वाचक कालमुखानें जेव्हां अमल्य निर्णय देतो तेव्हां मात्र त्या निर्णयांतून श्रेयस् काय हेंच तो सुचवितांना दिसतो. वर्तमानांत ज्यावर त्याच्या मान्यतेचा शिक्का पडेल तेंच भविष्यांत शाश्वत टरेल असें नाहीं. तो एकाकडे प्रेम, ममता करतांना दिसतो व दुसऱ्यालाच चिरंजीव करतांना आढळतो. मला असें वाटतें कीं, जीवनाप्रमाणेंच वाङ्मयाच्या सृष्टींत हा जो श्रेयस् आणि प्रेयस् ह्यांमधील झगडा चालू असतो त्यांत प्रेयसकडे झुकलेल्या प्रत्येक मनुष्यास श्रेयस् म्हणजे काय हें अगदीं अंधुकपणें कां होईना, मनांतून जाणवत असतें. अमुक एक गोष्ट किंवा अमुक एक पदार्थ किंवा अमुक प्रकारची वर्तणूक मला आवडते म्हणून चांगली, असें जरी तो म्हणत असला तरी त्याच्या अंतर्मनांत तें प्रेयस् आहे, श्रेयस् नाहीं किंवा नसावें असा विचार मधूनमधून कां होईना, डोकावत असतो. श्रेयस् काय हें त्याचें अंतर्मन त्याला अधूनमधून सांगतच असतें. 'The spirit is willing but the flesh is weak' अशीच त्याची स्थिति होत असते; परंतु श्रेयसूची त्याला अंधुकशीहि कल्पना नसते असें मला तरी वाटत नाहीं. त्यामुळें त्याच्या आवडीचा, त्याच्या मान्यतेचा शिक्का ज्यावर असतो, त्यावर त्याच्या आदराचा शिक्का बसेलच असें होत नाहीं. श्रेयस् हेंच त्याच्या श्रद्धेचा विषय बनतें. त्याची तात्कालिक भूक भागविण्याचें काम प्रेयस् करीत असतें, परंतु या भुकेखेरीज दुसरी एक महत्त्वाची भूक आहे व ती ह्यामुळें भागणें शक्य नाहीं, ह्याची त्याला खात्री असते; अंतर्मनांत खात्री असते. ही दुसरी भूक त्याला संपूर्णपणें जाणवते असें नाहीं, परंतु तिचें अस्तित्व अगदीं अंधुकपणें कां होईना, परंतु मधूनचे अस्तित्वानें त्याला जाणवत असतें. ह्या भुकेला 'ओ' देणें कठीण असतें, त्याला सामर्थ्य लागतें, तें फार थोड्यांच्या ठिकाणीं असतें. इतरांना ती दडपून टाकण्यांतच

एक प्रकारचा आनंद वाटत असतो; तिच्याकडे कानाडोळा करण्यांतच धन्यता वाटत असते. कारण तिकडे वळणें म्हणजे तात्कालिक सुखाला मुकणें असतें. तसें करावयाला फारच थोडीं माणसें तयार असतात. म्हणून होतें काय कीं हे सामान्य वाचक पुष्कळदां एकाच वेळीं दोन तोंडांनीं बोलतांना दिसतात. ते आपल्या मान्यतेचा शिक्का नाथमाधव व हडप यांच्या कादंबऱ्यांवर मारीत आहेत असें दिसतें व अगदीं त्याच वेळीं वा. म. जोशी ह्यांना श्रेष्ठ कादंबरीकार समजत आहेत असेंहि दिसतें. ह्यांत थोडा सांकेतिकतेचाहि भाग असेल, ही थोडी Snobbery हि असूं शकेल, परंतु त्याबरोबरच त्यांत थोडी फार अन्तर्मनाची टोंचणीहि असते असें समजणें चुकीचें ठरेल काय?

ह्या सामान्य वाचकांच्या बाबतींत आणखी एक गोष्ट दिसून येते. त्यानें एकाद्या लेखकाच्या कपाळीं मारलेला मान्यतेचा शिक्का हा पुष्कळदां विलक्षण फसवा ठरतो. हा सामान्य वाचक जेव्हां एकाद्या लेखकाचा उदो उदो करूं लागतो व त्याला कीर्तिशिखरावर नेतो तेव्हां त्या लेखकालाहि आपण फार मोठे लेखक झालों असें वाटूं लागतें. परंतु लोकप्रियतेचा हाच क्षण अत्यंत फसवा असतो. कारण एकाद्या लेखकाला कीर्तिशिखरावर चढविण्यास ज्याप्रमाणें ह्या सामान्य वाचकास वेळ लागत नाहीं, त्याचप्रमाणें त्याला त्या कीर्तिशिखरावरून खालीं ढकलून देण्यासहि फारसा वेळ लागत नाहीं. ज्या लेखकाचें नांव एके काळीं सर्वत्र दुमदुमत असे तो लेखक हां हां म्हणतां नामशेष होतांना आपणांस दिसतो. इंग्लंडमध्यें कांहीं वर्षांपूर्वी हॉल केन व मेरी कॉरेली हीं नांवें कादंबरीच्या क्षेत्रांत गाजत होतीं. आज तीं ऐकूंहि येईनाशीं झालीं आहेत. आपल्याकडेहि नाथमाधव व हडप हीं नांवें अशा स्वरूपाचीं म्हणून दाखवितां येतील. हें असें कां व कसें होतें ह्या प्रश्नांचा विचार करूं लागलों कीं एक उत्तर तरी झटकन् मिळूं शकतें व तें पुष्कळच समाधानकारक वाटतें. आपण वरच पाहिलें कीं, हा सामान्य वाचक प्रेयसूचा भोक्ता असतो. ह्या प्रेयसच्या स्वरूपाचा जर आपण विचार केला तर असें दिसून येतें कीं प्रेयस् हें एकसारखें बदलत असतें. एकसारखें बदलणें हाच खरोखर त्याचा धर्म असतो. कालची टूम आज नाहीं; आज नवी टूम, हाच 'प्रेयस्'चा धर्म आहे. प्रेयसूवर सदैव जगणारी रुचि ही विलक्षण चंचल बनलेली असते. तिला नित्य नवा

रुचकर विषय सेवनासाठीं हवा असतो. प्रेयसूच्या नित्य सेवनानें नित्य नव्या प्रेयसची आवश्यकता भासूं लागते. Fashion हा शब्दच असा आहे कीं तिचें क्षणभंगुरत्व त्या शब्दांतूनच सूचित झालेलें आहे. प्रेयस् हें एकाद्या उत्तेजकासारखेंच असतें. आणि उत्तेजक या दृष्टीनें त्याचें कार्य व्यवस्थित व्हावयाचें म्हणजे त्याचें प्रमाण एकसारखें वाढतेंच ठेवावें लागतें.

प्रेयसमधील चमत्कृति ही क्षयजीवि असल्यामुळें नित्य नव्या चमत्कृतींनीं युक्त असें प्रेयस् जगांत निर्माण होणें अगत्याचें होऊन बसतें व मागणी तसा पुरवठा ह्या न्यायानें तें तसें निर्माण होतेहि असतें. त्यामुळें प्रेयसूच्या क्षेत्रांत सदैव विलक्षण स्पर्धा असते. प्रथमदर्शनींच आकर्षक दिसणारा नवा नवा माल निर्माण करण्याची जणूं तेथें अहमहमिका लागलेली असते. त्यामुळें प्रेयसूच्या ह्या बाजारांत एकाद्या मालाला विलक्षण उठाव आलेला दिसला तरी त्यावरून त्याला शाश्वतची मान्यता मिळणार आहे असा निष्कर्ष काढणें विलक्षण धोक्याचें ठरतें. कारण हा उठाव कोठपर्यंत होणार? जोंपर्यंत तसल्याच जातीचा परंतु त्यापेक्षां अधिक आकर्षक माल बाजारांत येत नाहीं तोंपर्यंत. कालचें सर्वतोमुखीं झालेलें सिनेमांतील गाणें आज ऐकूंहि येत नाहीं ह्याचें कारण हेंच आहे. एका प्रेयसूनें कीर्तिशिखर गांठलें व तेथून तें झटकन् खालीं कोसळलें ह्या व्यवहाराचें तें सुंदर उदाहरण आहे. आज 'चित्रपट' हें एक विलक्षण आकर्षक प्रेयस् ठरलें आहे. परंतु त्याचा संसार हा उणापुरा तीन घटकांचा सुद्धां नाहीं, ह्याची आपणांस चांगलीच कल्पना आहे. ह्या चित्रपटावर पोसलेले जीव त्या चित्रपटापेक्षांहि अधिक crazy अधिक रोमांचकारक चित्रपटांसाठीं सदैव हपापलेले आहेत; व त्यांच्यासाठीं तसे चित्रपट प्रतिक्षणीं तयार होत आहेत. प्रेयसूच्या सर्वच क्षेत्रांत हाच चमत्कार कमीअधिक प्रमाणांत दिसून येत आहे व दिसून येत असतो.

तेव्हां वाङ्मयाच्या प्रांतांतहि त्याला अपवाद कसा असूं शकेल? तेथेंहि ह्या प्रेयसूच्या जोरावर वाचकांना आकृष्ट करून घेण्यांत जे लेखक यशस्वी होत असतात त्यांचें हें यश क्षणभंगुर ठरतें. कारण त्यांनीं जें साधून हें यश संपादिलेलें असतें त्यांचेपेक्षां अधिक आकर्षकपणें साधण्याचा इतर प्रयत्न करीत असतात व हे त्यांचें

प्रयत्न यशस्वी होतांच हा सर्व सामान्य वाचक आपल्या देव्हाऱ्यांतील पूर्वीच्या मूर्ती फेंकून देऊन तेथें झपाट्यानें ह्या नव्या मूर्तीची स्थापना करीत असतो व त्यांना गंधफुलें वाहूं लागतो. त्याच्या अभिरुचीच्या देव्हाऱ्यांतील ह्या पूजामूर्ति किती झपाट्यानें बदलतात हें लक्षांत घेतलें कीं वाङ्मयाच्या बाजारांतील ह्या प्रेयस्‌च्या व्यापार कसा चालतो तें कळूं शकतें. सामान्य वाचकाला प्रेयस्‌चा पुरवठा करूं लागणाऱ्यांमध्यें चुरस लागावी ह्यांत कांहींच नवल नाहीं. वाङ्मयक्षेत्रांत ह्या लेखकांची नेहमीं भाऊ गर्दीच असते व ह्या भाऊ गर्दीतून स्वतःला सर्वांपुढें काढण्याचा प्रत्येक जण आपापल्या परीनें प्रयत्न करीतच असतो. श्रेयस्‌च्या मागें लागणाऱ्यांपेक्षां प्रेयस्‌च्या मागें लागणाऱ्या ह्या लेखकांचें कार्य सुकर असतें. कारण प्रेयस् म्हणजे कारागिरी-कला नव्हे; तेथें आपोआपच तंत्राला विलक्षण महत्त्व आलेलें असतें. लोकप्रिय भावगीतांचें तंत्र, लोकप्रिय कादंबरीचें तंत्र, लोकप्रिय चित्रपटाचें तंत्र, समजून घेतलें जातें व त्या तंत्राबरहुकूम अधिकाधिक आकर्षक माल कसा बनवतां येईल त्याचा विचार होऊं लागतो. लोकप्रिय कादंबरींत किंवा बोलपटांत किती प्रमाणांत sex हवें तें ठरविलें जातें व तें प्रमाण कमीअधिक करणें आपल्या हातीं आहे हें ह्या तंत्रकुशल लेखकांच्या लक्षांत येतें. ह्याला जीवनाच्या व्यापक अनुभूतीची किंवा त्याच्या अंतरंगासंबंधींच्या सखोल चिंतनाची आवश्यकता नसते. जीवनाचा आभास निर्माण करणारीं नकली नाणीं येथें हवीं असतात व येथें तीं अहमहमिकेनें पुरविलीं जात असतात. अस्थिरता, चांचल्य, हीन मूल्यांचा आकर्षक विलास, सफाई, वरवरची झिलई, थिल्लरपणा, रंगसफेती इत्यादींचा येथें सुकाळ आढळतो. हें प्रेयस् व त्यानें लाभलेली लोकप्रियता ह्यांत शाश्वतता कोठून व कितीशी आढळणार?

पूर्वीचा सामान्य वाचक व आजचा सामान्य वाचक ह्यांच्या अभिरुचीच्या पूर्वतयारी (equipment) मध्यें तफावत आहे. आजच्या सामान्य वाचकाला आपली अभिरुचि संपन्न करावयाला जेवढा वाव आहे तेवढा पूर्वीच्या वाचकाला

नव्हती. परंतु त्याबरोबर हेंहि खरें कीं आजच्या यंत्रयुगांत 'प्रेयस्'चें प्रमाण जेवढें वाढलेलें आहे तेवढें पूर्वी नसल्यामुळें ह्या अभिरुचि-संपादनाच्या कामांतील अडथळेहि आजच्या मानानें पूर्वी कमी होते. आज चित्ताची एकाग्रता साधण्याच्याऐवजीं त्याची व्यग्रता वाढविण्यालाच अधिक अनुकूल असें वातावरण दिवसेंदिवस निर्माण होत आहे. परंतु असें असले तरी शिक्षणाचीं व ज्ञानसंपादनाचीं साधनें आज विस्तारलीं आहेत व त्यामुळेंच मनोविकास साधणें ही गोष्ट आज अधिक सुलभ झाली आहे. [आतां हा विकास—हा मनोविकास—आज साधला जात आहे कीं नाहीं हा वेगळा प्रश्न आहे. त्याचें उत्तर नकारार्थींच येण्याची संभव आहे. हें असें कां होतें ह्याला कारणेंहि बरींच असूं शकतील. त्याच्याशीं आपल्याला येथें कर्तव्य नाहीं.]

हा मनोविकास साधणें म्हणजे आपल्या मनांतून जी अंधुक कां होईना, परंतु श्रेयस्बद्दल टोंचणी होत असते, ती अधिक तीव्र होईल असें करणें. त्या मनाची 'श्रेयस्' ओळखण्याची पात्रता वाढविणें व त्यानें सुचविल्याप्रमाणें वागण्याचें मनोधैर्य दाखविणें.

परंतु हा सर्वसामान्य वाचकांचा मेळावा एखाद्या चौपाटीवर जमा झालेल्या झुण्डीसारखा असतो. झुंडीचें मानसशास्त्र (Group or mob psychology) म्हणून जें मानसशास्त्र आहे त्या शास्त्राच्या नियमानुसार तो वागत असतो. तेथें जें मन कार्य करीत असतें तें व्यक्तिमन नसून समष्टिमन असतें. ह्या समष्टिमनाच्या ठिकाणीं व्यक्तिमनाची टोंचणी दाबून टाकण्याची शक्ति असते. एकाद्या थिएटरमध्यें बसलेला मनुष्य किंवा चौपाटीवरील विराट् सभेंत बसलेला मनुष्य जेव्हां टाळ्या वाजवितो किंवा 'शेम,' 'शेम' म्हणून ओरडतो किंवा हंसतो किंवा रडतो तेव्हां तो व्यक्ति म्हणून जिवंत नसतो. तेथें समष्टिमनाच्या आदेशानुसार तो वर्तन करीत असतो. हें समष्टिमन हंसलें तर तो हंसेल, हें रडले कीं तो रडेल, त्यानें टाळ्या वाजविल्या तर हाहि टाळ्या वाजवील. समष्टि-मनांत स्वतःचें व्यक्तिमन बुडवून टाकणें हाच त्याचा तेथें धर्म असतो. या समष्टींतून तो जेव्हां बाहेर येतो व आपल्याच मनाशीं आपल्या वर्तनाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतो तेव्हां पुष्कळदां त्याला हा अर्थ नीटसा लागत नाहीं. एवढेंच नव्हे तर आपलें त्या क्षणीं झालेलें वर्तन बरेंचसें लज्जा-स्पद होतें असेंहि त्याला पुष्कळदां आढळून येतें. वाङ्मयाच्या क्षेत्रांतहि हा सामान्य वाचकांचा मेळावा ह्याच तत्त्वानुसार वागतांना दिसून येतो. सामान्य वाचक हा आपल्या व्यक्तिमनाचा कौल घेण्याऐवजीं समष्टिमनाच्या अभिरुचीवरच अधिक अवलंबून असलेला दिसतो. ह्या समष्टिमनाचा कल पाहूनच तो टाळ्या वाजवतो किंवा निषेध करतो. कोणतें पुस्तक अधिक खपतें हें तो पहात असतो व तेंच वाचण्याची खटपट करतो. कोणता वाद विशेष गाजतो तें त्याच्या कानावर येतें व मग तो त्याच वादासंबंधीं बोलूं लागतो. प्रवाह-पतितत्त्व ह्या सामान्य वाचकाच्या हाडींमासीं खिळलेलें असतें. [ह्याचें कारण म्हणजे तें प्रत्येक सामान्य मनुष्याच्याहि हाडींमासीं खिळलेलें आहे.] ज्या बाजूनें प्रवाह वाहतो त्याच बाजूनें तो वाहत जातो—अगदीं आनंदानें वाहत जातो. आतां ह्या प्रवाहांतहि जे स्वतःचें व्यक्तित्व सांभाळून उभे राहूं शकतात तेच प्रवाहाची खोली जाणूं शक-तात. समष्टिमनाचें दडपण सभोंवतालून पडत असतांहि जे त्या दडपणाखालीं स्वतःचें व्यक्तिमन चिरडलें जाऊं देत नाहींत, तर उलट तें जागृत ठेवतात व त्यानें दिलेला कौल प्रथम विचारांत घेतात, त्यांचाच मनोविकास साधला जाण्याची शक्यता असते. वाङ्मयाबाबत अशाच प्रकारें मनोविकास साधण्याची आवश्यकता असते. प्रत्येक वाङ्मयभक्तानें आपलें व्यक्तिमन तयार करावयाचें असतें. तें अभिरुचिसंपन्न बनवावयाचें असतें. श्रेयस् ओळखण्याची, न्याहाळण्याची व चाखण्याची त्याची शक्ति वाढवावयाची असते. ही शक्ति त्यानें वाढविली —व ती आज आपण अधिक सुलभपणें वाढवूं शकतों असें मीं वर म्हटलें; निदान आज ती वाढविण्याचीं बरींच साधनें उपलब्ध आहेत असें वाटतें—तेव्हां त्यानें ही शक्ति जर वाढविली तर मग समष्टिमनाचें त्याचेपुढें कांहीं चालत नाहीं. मग समष्टीच्या अभिरुचीची लाट डोक्यावरून गेली तरी व्यक्तिमनाच्या अभिरुचीची मान ताठच राहूं शकते. हें जमलें पाहिजे.

पण हें जमणार कसें? आणि हें कितीहि जमलें तरी एक प्रश्न हळूच मनांत डोकावतोच. लोकांनीं अभिरुचिसंपन्न व्हावें या हेतूनें जर आपण त्यांचेसाठीं बालपणापासून जो सुरू करतां येईल असा ह्या बाबतींतील एक अभ्यासक्रम तयार केला—आणि अशा प्रकारचाच अभ्यासक्रम रचण्याकडे शाळा कॉलेजांची एकंदर प्रवृत्ति दिसत नाहीं काय?—तरी समान अभिरुचीचीं माणसें आपणांस निर्माण करतां येतील काय? आणि तीं अशीं जरी उद्यां निर्माण झालीं तरी त्यामुळें आपलें समाधान होईल काय? अशा प्रकाचीं समान अभिरुचीचीं माणसें निर्माण करण्यानें कला-वाङ्मयाचें झालें तर नुकसानच होईल. कलावाङ्मयाच्या क्षेत्रांत एकसारखेपणापेक्षां (uuiformity) वैचित्र्यालाच अधिक महत्त्वाचें स्थान आहे. तेव्हां विस्तृत प्रमाणावर अभिरुचि-संपन्न म्हणजे खरें बोलावयाचें म्हणजे विशिष्ट अभिरुचिसंपन्न माणसें तयार करण्याचा विचार आपण सोडून दिलेलाच बरा. रशिया हाच विचार मनांत ठेवून प्रयत्न करीत आहे ना? त्यामुळें रशियांत कलावाङ्मयाचा काय विकास झाला आहे? जेव्हां आपण अभिरुचीबद्दल बोलतों तेव्हां आपण अभिरुचि हा शब्द 'विशिष्ट अभिरुचि' ह्या अर्थानें वापरीत नाहीं ना, ह्याची खबरदारी घेतली पाहिजे. खरीखुरी अभिरुचि ही विशाल असली पाहिजे, ती सहिष्णु असली पाहिजे. ती विकसनक्षम असली पाहिजे. तिचें स्वरूप एकदांच टाकून टाकलेलें असतां कामा नये. अशी अभिरुचि ही जिवंत असते. ती मृत, ठोकळेबाज असत नाहीं; व विशिष्ट शिक्षणक्रम आंखून खंडोगणतीनें निर्माण करतांहि येत नाहीं. एवढें खरें कीं, आपण फार तर ही अभि-रुचि रुजून वाढीला लागेल अशा प्रकारचें अनुकूल वातावरण तेवढें निर्माण करूं शकतों. ह्यापेक्षां आपण अधिक करावयाच्या भरीसहि पडूं नये व करतां येत नाहीं म्हणून खेदहि करूं नये.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

जीवनमरणाच्या सीमारेषा इथें पुसट झालेल्या तुम्हांला दिसतील !



# सर्कस

उत्कृष्ट नाट्य पाहून मनुष्य आनंदित होईल, पण सर्कशींतील उत्कृष्ट कामें पाहून तो स्तिमित होतो तें कां ?

रात्रीं नऊच्या सुमारास मी शहराबाहेर फिरून परत येत असतां एका मैदानावरती मला तें दृश्य दिसलें आणि मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें मी किती तरी वेळ त्या देखाव्याकडे पहात उभा राहिलों.

त्या मैदानावर एका सर्कशीनें आपला अजस्त्र संसार मांडावयास सुरुवात केली होती. या सध्याच्या उपेक्षित परंतु पूर्वी लोकप्रिय असलेल्या संस्थेविषयीं आपल्याला किती गाढ जिव्हाळा वाटतो याची त्या क्षणीं मला जाणीव झाली.

सर्कस येणार असल्याची वार्ता मी ऐकली होती, नाहीं असें नाहीं. परंतु त्या वार्तेला मीं फारसें महत्त्व दिलें नव्हतें. पूर्वी दाट परिचयाचा परंतु दीर्घकालीन दुराव्यामुळें आतां अपरिचित झालेला एखादा बालमित्र गांवांत आल्याचें आपण ऐकावें आणि थोडा आनंद, थोडें कुतूहल व्यक्त करून आपण त्यासंबंधींचा विचार सोडून द्यावा तसें माझें झालें. सर्कस येत आहे हें मी विसरून गेलों. तिच्यासंबंधीं आपल्याला कांहीं अधिक कर्तव्य आहे हें मला जाणवलें नाहीं.

परंतु परवां रात्रीं तो देखावा बघितल्यावर अंतःकरणांत निद्रित असलेलीं पूर्वीचीं सारीं भावबंधनें जागीं झालीं. पावलें जागच्या जागीं स्थिर झालीं आणि नजर अधीरपणानें त्या दृश्यांतून संचार करूं लागली. आकाशातील अंधारांत डोकें खुपसून बसलेला तो विशाल, पांढऱ्या रंगाचा तंबू, त्याच्या पिलांप्रमाणें सभोंवार उभ्या असलेल्या लहानलहान राहुट्या, सोंड हलविणें ही एकच गोष्ट इहलोकांत अर्थपूर्ण आहे असें समजून तें कार्य एका झाडाच्या बुंध्याशीं निरलसपणें करीत राहणारे तीनचार हत्ती, एरव्हीं निर्जन असणाऱ्या त्या मैदानावरील दिव्यांचा प्रकाश व माणसांची रहदारी, वाघसिंहादि हिंस्र श्वापदांच्या पिंजऱ्यांतून येणारे भीतिदायक आवाज...हें सारें पाहिल्यावर आणि ऐकल्यावर हें सुंदर प्रकरण आपल्याला किती प्रिय

वि. वा. शिरवाडकर



अनुक्रमणिका

आहे याची मला जाणीव झाली. किती तरी वेळ मी तेथें उभा राहिलों.

तेवढ्यांत सायकलवरून घराकडे जाणारे एक परिचित गृहस्थ मला पाहून खाली उतरले व आश्चर्यचकित मुद्रेनें माझ्याकडे बघू लागले. चारपांच उनाड मुलांच्या मेळाव्यांत मी तंबूकडे पहात उभा आहें याचें तर त्याला नवल वाटलेंच, परंतु त्या मुलांप्रमाणें तंबूच्या पडद्याखालून आंत जाण्याचा चोरमार्ग मीहि शोधीत आहें कीं काय याचीहि त्याला शंका आली असावी. तो प्रश्नार्थक चेहऱ्यानें उद्गारला,—

"कां हो?"

"काय?"

"इथें उभे?"

"सर्कस पहातों आहे!"

"इथून काय दिसतं? सुरू झाली म्हणजे आंत जाऊन पहा कीं!"

"तें पहाणं वेगळं! हें वातावरण पहाण्यांतच विशेष गंमत आहे!"

माझ्या परिचित मित्रानें एकदां निर्विकार नजरेनें त्या तंबूकडे पाहिलें आणि कोणतीहि गंमत त्यांत न आढळल्यामुळें तो सायकलीवर पाय टाकून निघून गेला. एका माणसाची मिठाई दुसऱ्या माणसाला मिठाई वाटेलच असें नाहीं या सुभाषिताचा मला प्रत्यय आला.

सर्कस या संस्थेवरील माझी ही भक्ति फार जुनी आहे. सर्कसमध्यें जाऊन आपण कांहीं अमानुष कामें करावींत आणि स्तिमित झालेल्या लोकांच्या टाळ्यांवर चरितार्थ करावा अशी आकांक्षा, वेड्यावांकड्या आकांक्षा करायच्या वयांतहि माझ्या मनांत कधीं आली नव्हती. मला वाटणारा हा स्नेहभाव पूर्णतः निःस्वार्थीपणाचा आहे. केवळ प्रेक्षकाच्या भूमिकेवरून वाटणारी भावना आहे ती. नाटकासंबंधींहि मला खूप प्रेम आहे. पण तें वेगळ्या प्रकारचें आहे. कांहींसें अधिक मर्यादित आहे. नाटककंपनीचें थिएटर पहाण्यासाठीं मी असा कधीं उभा राहिलों आहें किंवा राहीन असें वाटत नाहीं. आणि याचें कारण म्हणजे सर्कस आपल्याभोंवतीं एक अद्भुततेचें वातावरणच वेढून येते. रंगभूमीवर आभाळाला हात किंवा आवाज लावणारा सुरादाचा नायक रंग उतरून बाहेर आला म्हणजे त्याच्या पूर्वस्वरूपाच्या मानानें फार क्षुद्र वाटतो. नाट्यांत प्रतिभा असते, यांत शंकाच नाहीं. परंतु तें नाट्य आहे, म्हणजे जें खरोखर नाहीं त्याचा आविर्भाव आहे हें आपण विसरूं शकत नाहीं. तेथील शौर्य खोटें, धैर्य खोटें, शृंगार खोटा आणि त्यागहि खोटाच. मानापमानांतील धैर्यधर मोठें शौर्य गाजवितो असें आपण पाहतों आणि मानतोंहि. परंतु त्या शूरत्वाच्या अंगरख्याखालीं लपलेला नट हा प्रत्यक्षांत लक्ष्मीधराचा वडील भाऊ असण्याची शक्यता कांहीं कमी नसते. एकच प्याला नाटक आटोपल्यावर रामलाल दारू पीत आहे आणि सुधाकर किंवा तळीराम त्याला तो नाद सोडण्याचा आग्रह करीत आहेत असा प्रसंग असंभवनीय नाहीं. सर्कशीच्या वातावरणांत अशा आविर्भावास अवसर नाहीं. तेथील वाघसिंह जितके खरे असतात तितकेच तेथील खेळाडूहि खरेच असतात. जीवनमृत्यूच्या सरहद्दीवर जाऊन त्यांनीं केलेली कसरत खरी असते. उत्कृष्ट नाट्य पाहून मनुष्य आनंदित होईल, पण सर्कशीतील उत्कृष्ट कामें पाहून तो स्तिमित होतो. नाट्य आपल्या आटोक्याबाहेरचें आहे असें त्याला कधीं वाटत नाहीं. सर्कशींत मात्र आपल्या जीवनाच्या वर्तुळाबाहेरचें असें कांहीं तरी दिसत असतें.

अद्भुततेचें आकर्षण लहानपणीं विशेष वाटतें. गो. गो. दातारांच्या कालिकामूर्ति, शालिवाहन वगैरे कादंबऱ्या जगांतील सर्वश्रेष्ठ कलाकृती आहेत असें मानण्याचा काळ असतो तो. कल्पनाशक्ति तरल असते व तिची धार व्यवहाराच्या आघातांनीं बोथट झालेली नसते. या प्रवृत्तीमुळेंच सर्कस या संस्थेविषयींचें प्रेम सहसा लहानपणींच मनांत घर करून बसतें. आमच्या छोट्या गांवीं सर्कस आली म्हणजे मुलांच्या जगांत केवढी विलक्षण खळबळ माजायची! सर्कशीच्या त्या अद्भुतरम्य विषयामुळें शाळा, घर, पुस्तकें, परीक्षा वगैरे साऱ्या रूढ व रटाळ गोष्टी चटकन् शून्यामध्यें विलीन होऊन जात. हत्तीच्या हलत्या सोंडेकडे व अवाढव्य आकाराकडे तासन् तास पहात राहूनहि समाधान व्हावयाचें नाहीं, पिंजऱ्यामध्यें अविरत फेऱ्या मारणारे वनराज पाहून गिरिदऱ्यांनीं भरलेलें त्यांचें सगळें हिरवें साम्राज्य डोळ्यांपुढें उभें राही! तंबूच्या पांढऱ्या शुभ्र विस्ताराकडे पहातांना, किती

# Beauty calls

*Universal*
WATCHES IN
STAINLESS
STEEL & GOLD
from
Rs. 250/-
to
Rs. 4,000/-

**CHIMANLAL MANCHAND**
& CO. JEWELLERS

NEW QUEEN'S RD, BOMBAY. PHONE 30321

वेगवेगळ्या शहरांत, गांवांत, प्रांतांत तो असें वास्तव्य करून आला असेल याचा विचार मनामध्यें घोळूं लागे. आणि रात्रीच्या वेळीं प्रत्यक्ष तंबूमध्यें बसून असल्यावरती तर एका वेगळ्या जगाची चित्र विचित्र कवाडेंच समोर खुलीं होत आहेत असें वाटे.

सर्कस या शब्दाच्या उच्चाराबरोबर मला विदूषकाचें स्मरण होतें. त्या विचित्र संसारांतील ही सर्वांत विचित्र चीज. आपण विदूषक आहोंत हें तो आपल्या पहिल्या प्रवेशापासूनच सर्वांना जाणवून देतो. कोणी तरी मागून ढकलल्याप्रमाणें धडपडत, आपल्या तऱ्हेदार टोपीशीं हुत्ती घेत, एखाद्या सराईत खेळाडूच्या पाठोपाठ त्याची नक्कल करीत—अशीच कांहीं इतर चेष्टाकुचेष्टा करीत तो प्रवेश करतो. लोकांना हंसविण्याचा हेतु त्यांत सर्व-प्रकारीं इतका लख्ख असतो. तेथें कांहीं लपवालपवी नाहीं, कोणतेंही आच्छादन नाहीं. विदूषकगिरीची लाज नाहीं, सभ्यतेचा संकोच नाहीं किंवा शिष्टपणाची मर्यादा नाहीं! लोकांनीं हंसविणें, अगदीं खदखदां हंसविणें हेंच दैनंदिन जीवितांतील सर्वश्रेष्ठ, पवित्रांतील पवित्र कार्य होय ही त्याची भूमिका. संस्कृतीची प्राथमिक अवस्था दर्शविणारा विनोद असतो तो. पण मला वाटतें, हा त्यांतला उणेपणा नसतो तर विशेष गुण असतो. त्या तंबूच्या बाहेर संस्कृतीचें ओझें सर्वांच्या शिरावर असतेंच. शिष्टाचारानें संकुचित केलेल्या नाजुक स्मितांची आरास तेथें सर्वांच्या चेहऱ्यावरती सदोदितच चालू असते. तेथला विनोदहि शिष्टाचाराच्या कल्पनापाशांनीं आवळलेला, तेथलें हास्यहि सभ्यतेच्या कात्रीनें कातरलेलें! सर्कशीच्या तंबूंत या संदमाच्या शृंखला गळून पडतात व हें घडवून आणण्याचें श्रेय विदूषकाकडेच असतें. सर्कशीला योग्य असें वातावरण तो निर्माण करतो. घोड्याच्या पाठीमागाला लोंबकळत तो किंचाळ्या मारीत रंगणांत फिरूं लागला कीं प्रेक्षक एका जगांतून दुसऱ्या जगांत तावडतोब प्रवेश करतात. हें दुसरें जगहि विदूषकाच्या विनोदाप्रमाणेंच संस्कृतीच्या कक्षेबाहेरचें असतें!

विदूषकाचें आणखी एक वैशिष्ट्य असतें. आपण केवळ विदूषक आहोंत असें तो भासवतो, पण तो केवळ विदूषक नसतो. त्याच्या सगळ्या अवतारांत हा एक खोटेपणा असतो, पण तो फार हृदयंगम असतो. विदूषक हा स्वतःहि अत्यंत पराईत व सराईत असा कसरतकार असावा लागतो. कसरतीचें विडंबन करण्यासाठीं त्याला इतर कसरतकारांपेक्षांहि कित्येकदां अधिक कौशल्य दाखवावें लागतें, अधिक धोका पत्करावा लागतो. आणि इतकें असून, इतर खेळाडूंप्रमाणें तो लोकांकडून कौतुकाची किंवा आदराची अपेक्षा करीत नाहीं! तुम्हीं मोकळेपणानें हंसावें एवढीच त्याची आकांक्षा. घरीं गेल्यावर तुम्ही म्हणतां, तो विदूषक काय गाढव होता, गमत्या होता! तो सराईत खेळाडू होता ही वाहवा त्याच्या वाट्यास येणें प्रायः अशक्य!

विदूषकाच्या भूमिकेंतील सर्वांत मोठी हृदयंगमता यांतच आहे असें मला वाटतें. तुमच्या पोटांत संकोचानें दडून राहणारें निरामय, निर्भेळ हास्य बाहेर ओढून काढतांना, हकाच्या कौतुकावरती तो तिलांजली सोडतो.

सर्कशीचें हें सारेंच जग वरती म्हटल्याप्रमाणें संस्कृतीच्या टप्प्याबाहेरचें असतें. तें मूलतः असंस्कृत, रानटी, माणसाच्या पूर्वस्थितीचें निदर्शक असें असतें. वाघसिंहांसारख्या हिंस्र पशूंशीं येणारा माणसाचा संबंध पुरातनच. हत्ती-माकडांसारख्या जनावरांशीं क्रीडा करण्याचे उद्योग एरव्हींच्या जीवनांत कोणीहि माणूस करणार नाहीं. ज्या गोष्टी पहाण्यासाठीं आज आपल्याला पैसे देऊन तिकीट खरेदी करावें लागतें त्या गोष्टी मानवी इतिहासाच्या पहिल्या पर्वामध्यें सर्वांना मोफत व अपरिहार्यपणें पहाव्या लागत असतील! मनुष्य आपल्या पायावर त्या काळीं पुरेसा उभा नव्हता. चतुष्पादांपासून तो फारसा दूरवर गेला नव्हता. अनेक कार्लेकर आणि देवल त्या काळांत या पशूंवर आपल्या बुद्धीचे व शक्तीचे साहसी प्रयोग करीत असतील!

दुसरीहि एक गोष्ट आहे. सर्कशींतले सारे प्रयोग म्हणजे यमराजाला दिलेलीं आव्हानें होत. घोड्याच्या पाठीवर एका पायावर उभें राहण्यापासून मोटारसायकलवर बसून गोल पिंजऱ्यांत फेऱ्या मारण्यापर्यंत सारे खेळ म्हणजे कसरतकारांनीं आपल्या प्राणांशीं केलेले खेळच असतात. पाठीशीं विस्तीर्ण लांकडी फळक घेऊन आपल्या अवघ्या शरीराभोंवतीं तीक्ष्ण सुऱ्यांची वेलबुट्टी काढून घेणारी स्त्री रोज मरणाच्या देशांतूनच माघारीं येत असते. जीवनमरणाच्या सीमारेषा सर्कशीच्या तंबूंत अगदीं पुसट झालेल्या असतात. आपल्या सुरक्षितपणाच्या भूमिकेवरून आपण दुसऱ्याच्या असुरक्षितपणाचा आनंद उपभोगीत असतों. मृत्यूशीं लगट करण्याची ही वृत्ति आजच्या सुधारलेल्या काळांत अगदीं विरळा आढळते. मनुष्य जसजसा प्रगत होत गेला, तसतसें त्याचें जीवन अधिक निर्भय, सुखसोयींनीं अधिक समृद्ध, असें होत गेलें. प्राचीन काळांत तो सर्कशींतील कसरतकारांप्रमाणेंच मरणाच्या सरहद्दीवर जगत होता. म्हणून सर्कशीच्या तंबूंत पाऊल टाकणें म्हणजे भूतकाळांत प्रवेश करणें होय, असें मला वाटतें. सर्कस पाहण्याचा आनंद या गोष्टींतच असेल काय?









दोन हाताचे चार हात होतात. पण ते 'खरे' सहा हात असतात

# २ × २ = ६



पण मनोहरच्या मतें लग्न म्हणजे एक
पवित्र भागाकार आहे.
एक दुसऱ्याला सारखा भाग देत असतो —
आणि शेवटीं ?

**शैला** : खाणावळींतून डबा आला आहे. उठतांय् ना जेवायला ?

**श्रीधर** : हं.

**शैला** : हं काय ? ताट वाढलंय् तुमचं. उठा पाहूं.

**श्रीधर** : मला जेवायचं नाहीं. मी जेवणार नाहीं.

**शैला** : कां, अजून डोकं दुखतंय् ?

**श्रीधर** : हं.

**शैला** : मला भूक लागली आहे.

**श्रीधर** : मग जेव तूं.

**शैला** : अगदीं एक घांसहि जेणार नाहींत माझ्याबरोबर !

**श्रीधर** : (ओरडतो) नाहीं ! नाहीं ! नाहीं !

**शैला** : इतकं ओरडायला काय झालं ? अन् कुणावर ओरडतां ? काय अशी चूक झाली माझ्याकडनं म्हणून जळतांय् असे ? काय शिजून वाढीत नाहीं दोन वेळेला ? काय म्हणाल तेव्हां, म्हणाल तितक्या तुमच्या मित्रांसाठीं चहा उकळून देत नाहीं ? का रात्रीं यायला उशीर झाला म्हणून कधीं जेवून तुमचं ताट झांकून ठेवलं आहे चुलीवर ? कां, कशासाठीं एवढा संताप ? तुम्हाला जेवायचं नसेल तर मला पण जेवायचं नाहीं. एक दिवस अन्न नाहीं गेलं पोटांत तर तडफडून मरणार नाहीं मी ! (धाडकन दार लोटून आंतल्या खोलींत जाते.)

(बाहेर दारावर टॅपिंग)

**श्रीधर** : (रागानं) कोण आहे ?

**मनोहर** : (दार हलूच लोटून) शाबास. उघडंच आहे दार अन् मी मूर्खासारखा टॅप करतों आहें !

[ कोर्णी तासाचा ठोला ]

अरे बाप रे ! साडे बारा ? म्हणजे, माझं घड्याळ लूपच पुढं आहे कीं ! हे पाहा अकरा वाजलेत माझ्या मनगटावर !

**श्रीधर** : आय अ‍ॅम सॉरी.

**मनोहर** : कां रे, कां?

**श्रीधर** : अजून मी इथं घरींच आहें. ऑफिसलों जायला 'आज उशीर झाला! तुला वाटलें असेल, बहुतेक मी घरीं नसेन, शैला एकटीच असेल घरीं, होय ना?

**मनोहर** : you are right! खोटं कशाला बोलूं? तूं ऑफिसला गेला असशील आणि तुझी बायको एकटीच असेल घरीं अशा हिशेबानं मी आलों.

**श्रीधर** : आणि तुझा अंदाज चुकला. हरकत नाहीं. मी जातोंच आहे. आहे ती घरांत.

**मनोहर** : शैला आहे? मी आलों आहें—माझा आवाज ऐकते आहे ती—आणि अजून बाहेर येत नाहीं? काय, झालं काय तिला? का भांडलास तिच्याशीं?

**श्रीधर** : छे! भांडायला आम्ही थोडेच आतां नवराबायको राहिलों आहों?

**मनोहर** : म्हणजे, तिनं आमचा गुप्त प्लॅन आधींच सांगितला वाटतं तुला?

**श्रीधर** : गुप्त प्लॅन?

**मनोहर** : येस. इथून पळून जातांना तुझ्या टेबलावर एक पत्र लिहून ठेवणार होती ती—तुला उद्देशून—तुझ्या माहितीसाठीं—तूं विनाकारण काळजींत राहशील म्हणून!

**शैला** : मनोहरभाउजी!—

**मनोहर** : शैला!—

**श्रीधर** : शैला? शैलाताई नाहीं?

**मनोहर** : आतां काय म्हणून तिला ताई म्हणूं? तूं माझा बालपणचा मित्र म्हणून सुरुवातीला तिला शैलावैनी म्हटलं. परिचय वाढला, सहवासानं आमच्यांतलं अंतर तुटलं तेव्हां शैलाताई म्हणायचं ठरवलं, पुढं सहवासाचं रूपांतर प्रेमांत झालं—आणि पुढें आतां तर तूं आनंदाची बातमी दिलीस—

**शैला** : काय?

**मनोहर** : तुझं आणि श्रीधरचं म्हणे कडाडून भांडणं झालं!

**शैला** : असं सांगितलंत?

**श्रीधर** : मग खोटं आहे कीं काय?

**मनोहर** : खोटं कसं, खरंच असणार तें!

**शैला** : नाहीं, खोटं आहे तें!

**श्रीधर** : पुरे झाला हा लपंडाव!

**मनोहर** : आणि किती दिवस खेळाल तो लपंडाव? एकमेकांपासून कांहीं तरी गोड गुपित लपवून ठेवण्यांत रोमान्स असतो. पण तें—संसाराच्या उंबरठ्यावर पहिलं पाऊल पडतं तेव्हां. पण उंबरठा ओलांडून आंत गेल्यावर नव्हे. पुढं तें जमत नाहीं, तें टिकत नाहीं! तें टिकवण्याचा नवरा खूप प्रयत्न करतो, त्याची बायको तर त्याच्याहून खूप प्रयत्न करते, पण तें टिकत नाहीं! आणि मग सुखी संसाराच्या आदर्श स्वप्नाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतात! तें कल्पनारम्य चित्र फाटतं, रंग उडून जातात—घरकुलाच्या दारावर लावलेलं तें इंद्रधनुष्याचं तोरण कोसळून मोडून पडतं! पण खरं सांगूं श्रीधर, 'लग्न'-या कृत्रिम, नकली, तकलादी वैवाहिक संस्थेवर आपला विश्वास नाहीं! कुणाचाच विश्वास नाहीं! मग हें सर्व माहीत असून काय म्हणून तुझ्या बायकोनं आपल्या मनाचा कोंडमारा सोसावा?

**श्रीधर** : मग, माझ्या बायकोचा काय विचार आहे पुढं?

**शैला** : तुमची बायको मी आहें—इथं जिवंत उभी आहे. मला विचारा. मनोहरला कशाला टाकतां हा प्रश्न?

**श्रीधर** : मग तूं सांग.

**मनोहर** : ती काय [illegible] सांगणार! स्त्रियांना गोड पण खोटं बोलतां येतं, कडु पण खरं बोलता येत नाहीं. मी सांगतों तिच्या मनांत काय आहे तें.

**श्रीधर** : मग तूं सांग.

**शैला** : मग मीच सांगतें तर—

**मनोहर** : ती माझ्याबरोबर पळून जाणार आहे.

**श्रीधर** : पळून जाणार?

**मनोहर** : होय म्हण, शैला, होय म्हण.

**शैला** : आणि मी 'नाहीं' म्हणालें तर?

**मनोहर** : नाहीं? आतां नाहीं असं तुला बोलायला तोंड नाहीं.

**शैला** : कां?

**मनोहर** : कारण तुझ्यावरचा तुझ्या नवऱ्याचा विश्वास आतां उडाला आहे! तो तुझ्या शब्दावर विश्वास ठेवायला आतां तयार नाहीं! खरं कां नाहीं श्रीधर?

**श्रीधर** : खरं आहे तें.

**मनोहर** : पहा, म्हणत नव्हतों मी? कांच एकदां फुटली कीं जोडतां येत नाहीं, वास उडाला कीं फुलाच्या पाकळ्या गळूं लागतात, तार तुटल्यावर सतारीचे पडदे मुके पडतात, फूट लाइटस् फेल गेले कीं नाटक शेवटचा पडदा पडायच्या आंत संपतं! संसाराचंहि तसंच आहे शैला!

**श्रीधर** : नवरा म्हणून मला तुझ्याबरोबर जगतां येणार नाहीं!

**शैला** : असं. मग मला पण तुमची पत्नी म्हणून या चार भिंतींच्या कोंडवाड्यांत राहायची इच्छा नाहीं!

**श्रीधर** : कोंडवाडा?

**शैला** : कोंडवाडा!

**मनोहर** : कोंडवाडा नव्हे, तुरुंग! लग्न म्हणजे तुरुंग—जन्माचा बंदिवास! खऱ्या तुरुंगांतल्या त्या कैद्यांना, पगाराच्या आशेनं न्यायाधीश शिक्षा ठोठावतो, आणि संसारांतल्या या कैद्यांना आईबाप आणि लग्न लावणारे भटभिक्षुकांची 'ज्यूरी' शिक्षा ठोठावते! Transportation for life—काळ्यापाण्याची शिक्षा! काळ्यापाण्याची कैद भोगून कैदी एखाद वेळीं जिवंत सुटेल, त्याला सुटावंसं वाटेल, पण या लग्नाच्या लाल पाण्याची शिक्षा भोगणारा कैदी कधींच जिवंत सुटणार नाहीं. एका काळ्यामण्याच्या दोरीनं दोन जिवांच्या नरड्याला एकदांच तात लागते पण जीव जायला कमींत कमी तीस-चाळीस वर्षें लागतात!

**श्रीधर** : शैला, मी आज कामावर जाणार नाहीं.

**मनोहर** : मीहि तेंच म्हणणार होतों. या प्रश्नाचा निकाल लागला, तुझी बायको या घरांतनं एकदां बाहेर पडली कीं मग खुशाल तूं कामावर जा. हा एक दिवस—तुझ्या आणि शैलाच्या आयुष्यांतला हा अत्यंत महत्त्वाचा दिवस आहे! आजचा हा दिवस म्हणजे Red letter day— लाल तारखेचा दिवस— सणाप्रमाणं आपण साजरा करूं या!

**श्रीधर** : सणाप्रमाणं नाहीं, संसाराच्या सरणाप्रमाणं म्हण!

**मनोहर** : एकच! मग काय नि सरण काय! कुठे तरी इथं आंत—आंत—कांहीं तरी अगम्य—गूढ, उदास—ज्याच्यावर आपला काडीमात्र हक्क नाहीं असं कांहीं तरी वे—जळत असतं. आणि त्या जळणावर माणसाचं खरं मन भाजलं जात असतं. ते अग्निदाह तोंड दाबून आनंदानं सहन करणं त्यालाच मोठ मोठे ऋषी सुख म्हणतात!

**श्रीधर** : शैला, शैला—आह्—! (कॉटवर अंग टाकतो.)

**शैला** : काय होतंय्? अरे देवा—

**मनोहर** : शैला, भिऊं नकोस त्याला! आतां तुझा नि त्याचा संबंध उरला नाहीं— He is no more your husband.

---



# शकुन्तलेचें पत्रलेखन !

सखे तूं लाजुं नको लेखणी—
हृदयामधलें गूज रुणझुणे येउनिया कंकणीं !

माझ्यासम कां तूंहि लाजसी ?
देहलतेसम हलुं थरथरसी

घननीळाच्या मुरलीची तूं भगिनी मधुभाषिणी !

कमलदलावर वितर भावना
भावि सुखाच्या तरल कल्पना

अक्षर कर तूं प्रीत आमुची प्रथम पत्र लेखनीं !

कृष्णमुखी ! कां वदन फिरविसी ?
थिजल्या तेथें कां घुटमळसी ?

महाकवींची मात्र सखी तूं मुग्धांची वैरिणी

नयनांनो, द्या दोन आंसवें
विरह अतां ना मला साहवे

अश्रूंनो, जा सांगा 'त्यां'ना क्षधिर किती विरहिणी !
सखे तूं लाजुं नको लेखणी !

—सूर्यकान्त खाण्डेकर

**श्रीधर** : चांडाळ, सैतान ! तूं इथून जातोस का—(Throws a flowerpot at him—)

**मनोहर** : मी इथून हलणार नाहीं ! शैला खोटं बोलते आहे—ती ढोंग करते आहे—रस्त्यांत व्हिक्टोरियाचं ओझं ओढणारा घोडा पाय घसरून पडतांच माणसं त्याली उचलायला धांवतात, त्यांत त्यांची सहानुभूति असते—तें प्रेम नव्हे ! तूं आजारीपणाचं ढोंग करतो आहेस म्हणूनच तुझी बायको तुझ्याविषयींही कळकळ दाखविण्याचं धाडस करते आहे !

**श्रीधर** : मनोहर—मन्या—राक्षसा—थांब तुझं नरडं दाबून—

( Throws some sounds—नंतर मारामारी—Big fight )

**शैला** : श्रीधर—मनोहर—माझी शपथ आहे—सोड-सोड त्यांना—

**मनोहर** : ( शेवटीं 'ओह्' करीत विव्हळून कोसळतो )

**श्रीधर** : He is dead. मेला-मेलास-मेला तो ! शैला, तुझा प्रियकर मेला !

**शैला** : ( Telephone ) टू फोर एट, टू फोर एट... हॅलो हॅलो—पोलिस स्टेशन्—पोलीस... श्रीधरनं माझ्या प्रियकराचा खून केला... धांवा लौकर... खून—( She shrieks )

( दारावर टकटक )

एका म्हाताऱ्या स्त्रीचा आवाज } —सूनबाई ! काय झालं ग ?

**श्रीधर** : ( खडबडून जागा होतो ) आं ? कोण आई !

**शैला** : ( जागी होते ) काय झालं ?

**आई** : तरीच. आढ्याखालीं झोंपूं नये, वाईट वाईट स्वप्नं पडतात ! तुम्हाला पटत नाहीं—अन् मग रात्रीं-अपरात्रीं ओरडतां, किंचाळतां—

**शैला** : मी ओरडलें ?

**आई** : केवढ्यानं किंचाळलीस !—पण ऐकलं तर ना ? जातें मी.

**श्रीधर** : आतां तरी एका कृपा करून आईचं अन् या इकडे झोंपायला !

**शैला** : मनोहर ? अं हं !

**श्रीधर** : मनोहर ! कोण मनोहर ?

**शैला** : हं. ( झोंपते पुन्हा )

**श्रीधर** : ऐ बेडपरा ! हें बघ शैला—

**शैला** : हुं !...

[ Fade Out ]

—दॉय किणीकर

आपल्याला टाकून हा कुठें चालला? कां निघाला?




# आठ घटकेचा अनंत

**त्याच्यासाठीं इतकीं स्वप्नें उभारल्यानंतर तीं सारीं चुरगाळून टाकून हा कसली तपश्चर्या करणार आहे?**

सुनीताची सामानाची आवराआवर आटोपेपर्यंत तिची निघण्याची वेळ येऊन पोचली. तिनें एकदां घड्याळाकडे पाहिलें आणि मग नोकराला हांक मारून स्टेशनवर जाण्यासाठीं टांगा घेऊन येण्यास फर्मावलें. ज्या घरांत ज्याचे काळ्याचे पांढरे झाले होते असा तो नोकर क्षणभर दारांत घुटमळून म्हणाला, "साहेब परत येण्याची वाट पहाणार नाहीं आपण?" या प्रश्नाबरोबर तिच्या भुवया वक्र झाल्या, आणि कपाळावर आठ्या उमटून गेल्या. त्याचें विचारणें तिला रुचलें नाहीं हें उघड होतें. सकाळीं दुकानावर जातांना अनंता, तिला तिच्या निघण्याच्या वेळेपर्यंत परत येतों असें सांगून गेला होता हें खरें, पण तो येऊं शकणार नाहीं किंवा शक्य तर येण्याचें टाळील याची तिला पूर्ण खात्री होती.

आज ती कांहीं पहिल्यानेंच माहेरीं चालली होती असें नव्हे. गेल्या सात आठ वर्षांत माहेरींच नव्हे, तर इतर अनेक कारणांनीं परगांवीं जाण्याचे प्रसंग तिच्यावर आले होते. त्या प्रत्येक प्रसंगीं अनंता तिच्या निघण्याच्या वेळीं घरांत येणार होता. पण प्रत्येक खेपेला कांहीं अपरिहार्य अडचणी निघून तो येऊं शकला नव्हता. त्यामुळेंच परगांवीं जातांना वा येतांना अनंताची वाट पहायची नाहीं असें

तिनें स्वतःशीं ठरवून टाकलें होतें. आणि शिवाय अनंता घरीं येऊन तरी विशेष काय करणार होता? ठिचून भरलेल्या सामानामुळें विश्वरूप झालेल्या होल्डॉलचा एक पट्टा तिला लागत नव्हता आणि बॅगच्या कडीनें कोड्याशीं असहकार पुकारला होता. अनंतानें आंगच्या बळानें त्यांना ठाकठीक केलें असतें. स्टेशनवर रांगेत उभे राहून तिचें तिकीट काढून दिलें असतें. तिचें सामान डब्यावर वाहून नेणाऱ्या हमालाशीं हुज्जत घालून त्यानें त्याच्या हातावर कमी पैसे ठेवले असते. आणि कोठल्या तरी डब्यांत बायापैकीं जागा बघून तिला बसवून दिलें असतें. आणि मग पुढें?

पुढें काय?—हाच खरा मोठा प्रश्न होता. गाडींत ऐसपैस बसल्यावर तिनें खिडकींतून तोंड काढून अनंताला स्वतःच्या प्रकृतीची काळजी घेण्याविषयीं वारंवार बजावलें असतें. अनंतानेंहि कांहीं पैसाअडका लागल्यास मागवून घेण्यास तिला सांगितलें असतें. आणि मग या मामुली प्रश्नोत्तरानंतर अनंतानें सकाळींच वाचून झालेलीं वर्तमानपत्रें पुन्हा विकत घेतलीं असतीं आणि त्याच त्याच बातम्यांवरून नजर फिरविण्याचा खेळ त्यानें सुरू केला असता. आणि मग तिनेंहि चहा-चिवडा विकणाऱ्या पोऱ्यांचा आरडाओरडा आणि तांबडीं हिरवीं निशाणें घेतलेल्या पांढऱ्या पोशाखांतल्या अधिकाऱ्यांची धांवपळ पहात बसावें लागलें असतें. गाडी स्टेशनमधून हलेल तेव्हां त्या दोघांना हायसें वाटलें असतें. तीं दोघें परस्परांना उद्देशून कांहीं मामुली शब्द पुटपुटत असतांनाच गाडीनें त्या दोघांना हवी असलेली फारकत करून दिली असती.

म्हणून तिच्या भुंवया वक्र झाल्या आणि कपाळावर आंठ्या उमटल्या. ती नोकराला उद्देशून एकेंच म्हणाली, "ते कांहीं येतील असा रंग दिसत नाहीं. तूं गाडी घेऊन ये जा." त्याबरोबर त्या म्हाताऱ्या नोकरानें मोठी विस्मयजनक चमत्कारिक मुद्रा केली आणि तो निघून गेला. त्याच्या चमत्कारिक मुद्रेनें तिच्या मनांतल्या अढीचें रागांत रूपांतर झालें. खरें म्हणजे ती त्याला असें म्हणणार होती कीं, ते येतील वा न येतील; तुला कशाला हव्यात फाजील चौकशा? सांगितलेलें काम तूं कर जा! पण अगदीं शेवटच्या क्षणीं तिनें आपले ओठावरचे शब्द मागें खेचले, आणि त्यांना सौम्य करून उच्चारलें. पण जाण्यापूर्वी नोकरानें केलेली मुद्रा पाहून तिला वाटलें, कीं अशा नोकराला कडक शब्दांचा मारच योग्य होता. उभयतां पति-पत्नींनीं एकमेकांशीं कसें वागावें याची घरांतल्या नोकर-चाकरांनीं दखल घेण्याची काय जरूरी? आणि या म्हाताऱ्यानें अशा चमत्कारिक मुद्रेनें आपल्याकडे पहावें, अशी आगळीक तरी काय घडली आहे? नवऱ्यानें बायकोला स्टेशनवर पोंचवायला आलें म्हणजेच त्या उभयतांच्यांत प्रेमरसाचा पूर वाहूं लागतो असें थोडेंच आहे? ही केवळ एक सोयीगैर-सोयीचा बाब आहे. शिवाय घरांतून कोठेंहि बाहेर पडतांना आपल्याला नवऱ्याचा पांगुळगाडा घ्यावा लागावा इतका 'इन्नपणा' आपल्या अंगीं थोडाच आहे? असे कितीतरी प्रश्न विचारून तिनें अकारण रुष्ट झालेल्या स्वाभिमानाची स्वतःची फसवणूक करून घेतली.

तेवढ्यांत टांगा येऊन नौकर आला. आणि मग पुढच्यांत सामान ठेवण्यापासून ते घराला कुलूप घालून किल्ली त्याच्यांत घेण्यापर्यंत तिनें त्याच्या कामांत अनेक चुका काढून त्याजवर डाफरणें घातलें, तेव्हां तिला समाधान वाटलें. ती टांग्यांत जाऊन बसली आणि मग थोड्या वेळाकीनें तिनें नोकराचा निरोप घेतला. जणूं घराच्या किल्लीबरोबरच, तो नोकर तिचा निरोप त्यांतील मवाळकीसुद्धां अनंताला नेऊन पोंचता करणार होता.

टांगा स्टेशनकडे दौडूं लागल्यावर तिचें मन फारच उलून आलें. अकारण विपण्णतेची तिला आतां संवय झाली होती. पण मन कधीं भडकून गेलें कीं त्याचें काटे ढिला भारी तापदायक होत. अनंता तिला स्टेशनवर कधीं पोंचवायला येत नसे. त्यांत केवळ सोयीगैरसोयीची बाबत होती, हें तिला यापूर्वीहि कधीं पटलें नव्हतें आणि आजहि पटलें नाहीं. दहा वर्षांपूर्वी तिचें लग्न झालें त्या वेळीं अनंतानें असें केलें असतें काय? आणि त्या वेळीं तिनेंहि त्याचा असला बेफिकीरपणा चालूं दिला असता काय? औषध-विक्रीसाठीं फिरतीवर असणारा अनंता ती माहेरीं जाणार असल्याचा सुगावा लागतांच महिना महिना घरीं मुक्काम करून कामधंद्याची हेळसांड करीत असे, आणि तिला आपल्या आसक्तीनें तो छळत असे. तिला आपल्या घरकामांतहि धीट मन घालतां येऊं नये इतका तो तिचा पाठपुरावा करी. आणि त्या वेळीं ती चिडून अनंताला म्हणे, "काय हा बाइलवेडेपणा? लोक हंसतात तुम्हाला नि मला..." त्यावर अनंता हंसत उत्तर देई, "हंसू देत हंसले तर! स्वतःच्या बायकोचंच वेड आहे ना मला? कीं लोकांच्या बायकांवर डोळा ठेवला आहे मीं?" धंद्याच्याशिवाय अनंता तिला सोडून कोठेंहि हिंडत फिरत नसे. थंडीपडशानें जरी ती आजारी झाली, तरी एकाद्या घरघर लागलेल्या माणसाच्या नातेवाइकांसारखी तो डॉक्टरकडे पळापळ करी. आणि फिरतीवरून परत येतांना तिला आवडणाऱ्या भेटवस्तूंचा तर तिच्यावर इतका वर्षाव करी कीं कधीं कधीं तिला त्याच्या उधळपट्टीबद्दल त्याची खंडकून हजेरी घ्यावी लागे. तिच्या मैत्रिणी आणि त्यांचे शेजारीपाजारीहि कधीं कधीं तिला विचारीत; "काय हो, तुमचा प्रेमविवाह झाला आहे काय?" त्या वेळीं काय उत्तर द्यावें याची तिला अडचण पडे. कारण तिनें "नाहीं" म्हटलें असतें, तर त्यावर थोडेंच कोणी विश्वास ठेवणार होतें? दिवसरात दोघांचा घरांत चालणारा दंगा प्रेमिकांच्या अल्लडपणाला आणि पागलपणालाच साजेसा होता. घरांत धांवणें पळणें, हाय हुई किंचाळणें, थोड्या कारणावरून भांडण-तंटा करणें, गंगायमुनांच्या ओघांत समेट होणें, खिदखदून हंसणें, बेसूर आवाजांत गाणीं म्हणणें, जनमनाची लाज सोडून परस्परांचीं चुंबनें घेणें, असल्या त्यांच्या पागलपणाला कंटाळून त्यांच्या शेजारीं रहाणाऱ्या एका ब्रह्मचाऱ्यानें विवाहाबद्दल केला होता. पण त्याला आतां दहा वर्षें झालीं!

आतां तोच अनंता आणि तीच ती—

घराचीं दारें उघडीं दिसतात, म्हणूनच आंत माणसें रहात असावींत असें शेजारपाजारी मानीत असत. एरवीं कामापुरतें मोजकेंच संभाषण आणि जरूरीपुरते एकत्र व्यवहार, असा त्या दोघांचा संसार रखडत चालला होता. दिवसभर तो कामधंद्यासाठीं बाहेर बाहेर असे; आणि तीहि महिला मंडळाच्या कामांत गुंतलेली असे. संध्याकाळीं अनंता क्लबांत उत्तररात्रीपर्यंत क्लबमध्यें ब्रिज खेळत बसे आणि सुनीता घरकामांतून वेळ झालाच तर मैत्रिणींच्या घरीं वेळ काढीत असे. तसा दोघांत भांडणतंटा वा अबोला घडला होता असेंहि नाहीं. कारण एकमेकांची तीं दोघें अत्यंत मायेनें जपणूक करीत होतीं. पण.....

पण टांगा स्टेशनपाशीं आला, आणि सुनीता भानावर आली; आणि टांग्यांतून खालीं उतरली. तिनें टांगेवाल्याचे पैसे चुकते केले, हमालाच्या ताब्यांत सामान दिलें आणि मग आंत जाऊन तिकिटासाठीं ती बायकांच्या रांगेंत उभी राहिली. तिच्यापुढें दोन कुणब्याच्या बाया. खाकोटीला पोरें

घेऊन उभ्या होत्या. त्याच त्या प्रश्नांचा भडिमार करून तिकीटमास्तरला इतक्या भंडावीत होत्या कीं, क्षणभर सुनीताहि चिडचिडल्यासारखी झाली. कारण पलीकडे पुरुषांची रांग खोळंबून उभी होती. पुढच्या दोन्ही बाया अखेर सरकल्या. सुनीता झटकन् पुढें झाली आणि आपला उजवा हात विकिटाच्या खिडकींतून तिनें आंत घातला. पण त्याच वेळीं दुसराहि एक हात घुसला होता. त्या हाताची तिच्या हाताला स्पर्श होतांच ती एकदम दचकली, आणि तिनें पाहिलें. पुरुषांच्या रांगेंत पुढेंच उभ्या असलेल्या एका पोरसवदा अधीऱ्या तरुणानें गडबडीनें आपला हात आंत घुसवला होता. हात हाताला भिडले—वधू-पित्यानें वधूचा हात वराच्या हातीं द्यावा, तसे! गडबडीनें तिनें आपला हात खसकन् मागें ओढला. त्याबरोबर तिनें मुठींत धरलेले पैसे खळकन् जमिनीवर सांडले. तिच्या डोळ्यांत अंगार उसळला आणि अपशब्दांनीं ओंठ फुरफुरूं लागले. तोंच तिच्या नजरेंत त्या पोरसवदा तरुणाच्या मुद्रेंतील देखणेपणा, शरीराचा बांधेसूदपणा आणि दृष्टींतील भावुकपणा भरूं लागला आणि तिच्या डोळ्यांतील अंगार विझूं लागला. त्याची कोवळी मुद्रा ओशाळी झाली आणि कोकरूच्या नजरेनें तिची क्षमा मागून तो तिचे सांडलेले पैसे गोळा करून देऊं लागला. तिला एकदम त्याची कींव आली. आणि तीहि त्याला मदत करूं लागली. पुन्हा एकदा नजरेला नजर भिडली, आणि सहजगत्या हाताला हाताचा स्पर्श झाला. तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. सळसळ करीत शेकडों सर्प आंगांगांतून उसळले. तिच्या डोळ्यांतल्या विझलेल्या अंगारांत सतरंगी आशूय नाचूं लागला. आणि तिच्या दृष्टीला त्याची दृष्टि भिडतांच, कसाईखान्यांतलें कोंकरूं मुक्त होऊन हिरव्यागार मैदानावर कोवळ्या उन्हांत बागडूं लागलें. भ्रमरांच्या दिठींत सतरंगी स्वप्नें इमले उभे करूं लागलीं.

तो क्षणाचा खेळ आटोपला. तिनें तिकीट घेतलें आणि उरलेले पैसे पर्समध्यें टाकून ती हमालाच्या मागून जाऊं लागली. तिला मधेंच एकदां मागें वळून त्या पोरसवदा तरुणाला न्याहाळावें अशी उबळ आली होती. पण तिनें पाहिलें नाहीं. कारण तिला खात्री होती कीं, तोहि माना मुरडून तिच्याकडे टक लावून निलाजरेपणानें पहात असला पाहिजे. तरी पण दारावर तिकीट चेकरला तिकीट दाखवितांना तिनें सहजगत्या वळून एक दृष्टिक्षेप टाकलाच. आपला तर्क खरा असल्याचें उमजतांच तिला कोण आनंद झाला! असा आनंद दहा वर्षांपूर्वी अनंतानें तिला मागणी घातली होती त्यावेळीं झाला होता. अकारण उल्हासानें तिचे डोळे जळजळूं लागले. ती घरीं असती तर अल्लडपणें नाचली असती; तिनें बेसूर आवाजांत गाण्याची एक लकेर घेतली असती; आणि टुणकन् पलंगावर लवंडत शिवरीच्या कापसाची उशी वक्षस्थळाशीं दाबली असती. रंगांत आणि लाडांत आलेला माणूस एकांतांत असला म्हणजे जसे वेडेचार करतो तसे अनेक वेडेचार करून आपण तिशीच्या घरांत येत आहोंत याचा तिनें स्वतःला विसर पाडला असता. पण ती कांहीं असला वेडेपणा करायला आपल्या घरीं एकांतांत नव्हती. शेकडो प्रकारची माणसें तिच्या आजूबाजूला नजरेचे अंकुश घेऊन वावरत होतीं. जणूं तिच्या मनानें हमरस्त्याचा धोपट मार्ग सोडूं नये यासाठींच ते अंकुशधारी महात्मे तिच्याभोंवती वर्दळ वाढवीत होते. त्यांच्या अंकुशांपासून आपल्या दृष्टींत उचंबळलेलीं सतरंगी स्वप्नें लपवीत सुनीता हमालानें दाखविलेल्या गाडीच्या कुठल्याशा एका डब्यांत चढली आणि सामान लावून बसून खिडकीपाशीं बाकावर ऐसपैस स्थानापन्न झाली. "कुठं, म्हमईला जायाचं का, बाई?" या कोणाच्या तरी विचारण्यानें ती त्या जीवघेण्या स्वप्नांतून क्षणभर भानावर आली. तिनें समोर पाहिलें. मघांच्याच कुणब्याच्या दोन बाया तिच्यासमोर टाण मांडून मांडीवर पोरांना पाजीत बसल्या होत्या. त्यांपैकीं एकीनें तिला तो प्रश्न केला होता. तिनें होय म्हटलें. पण तें किती नाखुशीनें? सतरंगी स्वप्नांतून ती परत यायला तयार नव्हती. पण अंकुश घेतलेल्या त्या बाया तिला सहजासहजीं असें थोडेंच सोडतात? कनवटीची चंची सोडत त्या बाईनें तिला पुन्हा म्हटलें, "लगीन झालं न्हाय वाटतं आजूनपोतर?" त्याबरोबर तिला हंसूं लोटलें. पोलक्याच्या आंत टाकलेलें मंगळसूत्र तिनें बाहेर काढीत हंसून म्हटलें, "दहा वर्षं झालीं बाई माझ्या लग्नाला! निम्मा संसार झाला!" पण तो प्रश्न तिला आवडला. कारण तिच्या सतरंगी स्वप्नाशीं तो संवादी होता. उत्तर देऊन तिनें आपल्या पर्समधील छोटा आरसा काढून आपलें लावण्य न्याहाळून त्या बाईच्या प्रश्नांत दडलेला हळुवार आशय पारखून घेतला. लग्न न झालेल्या पोरीप्रमाणें ती बांधेसूद, रसरशीत आणि देखणी दिसत होती. फक्त तिच्या मुद्रेवर काळानें आणि कष्टानें कोण जाणे, जे भाव चिकटविले होते ते जरासे विसंगत दिसत होते. गेल्या कित्येक वर्षांत तिनें वयांत आलेल्या पोरीचा अल्लडपणा टाकला होता आणि 'अय्या' हा शब्द तर ती विसरूनच गेली होती. तिनें आतां ठरविलें, कीं मुद्रेवरील या आगंतुक प्रौढत्वाला हद्दपार केलें पाहिजे. तसें करून ती काळाचे काटे उलटे फिरवून अठ्ठाविसाव्या वर्षावरून अठराव्या वर्षावर उलटी उडी मारणार होती. तिच्या मानगुटीवरील काळाची मांड थोडी ढिली झाली होती. ती संधि साधून हिसडा देऊन, स्वतःची सुटका करून घेऊन आतां ती उलट्या दिशेनें पळत सुटणार होती. बिचारा अनंता तेवढा पस्तिशींतून चाळिशीकडे रखडत जाणार होता. त्याचे केस पांढुरके दिसूं लागले होते. त्याच्या मुद्रेंतील तिला आवडणारा कोवळेपणा लुप्त होऊन तो निबर दिसूं लागला होता. पण त्याला ती काय करणार? ज्याचें मरण त्यानेंच मरायचें असतें.

ती पुन्हा एकदां भानावर आली. ती कुणब्याची बाई तोंडांत तंबाखूची फक्की मारून तिला विचारीत होती, "प्वाराबाळांना संगं न्हाय आनलं?" तो प्रश्न कानीं पडतांच ती गांगरली. असा प्रश्न आजवर तिला कोणी विचारला नव्हता. विचारणारे असें विचारीत, "तुम्हाला कांहीं मूलबाळ वगैरे...?" अशा वेळीं ती फक्त मानेनें 'नाहीं' म्हणून वेळ मारून नेत असे. पण हा प्रश्न विचित्र होता. आपल्याला मुलें असलींच पाहिजेत अशा समजुतीनें त्या बाईनें हा प्रश्न केला होता. त्यामुळें सुनीता गांगरली. स्वतःच्या सप्तरंगी स्वप्नांतून ती धडपडत ठेचकाळत उलटीपालटी होत उजाड भूमीवर कोसळली. अंगांगांवर झालेल्या जखमा दाबीत तिनें त्या बाईचा प्रश्न काय होता, तो आठवण्याचा प्रयत्न केला. तो प्रश्न त्या बाईनें कसाहि विचारलेला असो, तिला उमजला तो प्रश्न असा होता कीं, "लग्न होऊन तूं दहा वर्षं झालीं असें मोठ्या ऐटींत सांगतेस, पण तूं 'आई' झाली आहेस काय?" लाकडी पाय बसवून समाजांत ऐटीनें चालणाऱ्या माणसाचा लाकडाचा पाय निखळून पडावा, तसा तिचा अहंकार कोलमडला. मनाला पडलेल्या शतशः अनामिक भेगा टायीं टायीं चिरत गेल्या. तिला त्या प्रश्नाचा राग आला. पण अगतिकतेच्या पुरांत तो पांगळा राग लटपटून कोपऱ्यांत जाऊन रुसून बसला. तिला वाटलें केविलवाण्या नजरेनें त्या बाईचे पाय धरावे आणि लाचारीनें तिच्या सहानुभूतीची याचना करावी. तिला मूल होत नव्हतें ही गोष्ट खरी होती. पण त्यामध्यें आपल्या शरीरांतलें कोणतेंहि वैगुण्य त्याला कारण नाहीं याची तिनें खात्री करून घेतली होती. तें गुपित त्या बाईलाहि

सांगून तिची खात्री करून [illegible] अशी तिला उबळ आली. पण तसें तिनें केलें असतें तर ती बाईच नव्हे तर डब्यांतलीं सारीं माणसें तिच्या बोलण्याचा कांहींच्या बाहीच अर्थ करून फिदफिदलीं असतीं. ती आई होऊं शकत नव्हती याचा दोष जसा तिच्याकडे नव्हता तसा तिच्या अनंताकडेहि नव्हता. चारचौघांप्रमाणें ती जशी निरोगी स्त्री होती तसाच तोहि चारचौघां-सारखा रसरशीत पुरुष होता. सहा वर्षांपूर्वी त्या दोघांनीं मुंबईच्या नामांकित वैद्याकडून आपली तपासणी करून घेतली नव्हती काय? पण तिनें कितीहि असा खुलासा केला असता तरी डब्यांतल्या त्या टारगट प्रवाशांना तो मुळींच पटला नसता. ते सारे तसेच मिस्कीलपणें फिदफिदत राहिले असते. लंगड्या पायाचा माणूस रस्त्यावरून खडतांना पडलेला पाहून लोकांनीं हंसावें तसें ते हंसले असते. पण 'असते' कशाला?.

तीं दोघें रहात होतीं, तिथले शेजारीपाजारी आणि त्या दोघांचे निकट-वर्तीय, याच मिस्कील आशयानें गेलीं पांचसहा वर्षें फिदफित आले होते. निकटवर्तीयांचें मिस्कील हास्य आणि वैद्यकशास्त्राचा कठोर निर्णय त्या दोघांच्या भोंवतीं भुतांप्रमाणें फेर धरून नाचत गात आजवर भेडसावीत आला होता. अनंताच्या आणि तिच्या गाढ प्रीतीला आव्हान देत आला होता. तें आव्हान म्हणत होतें—झालेला संसार बस् झाला! आतां परस्परां-वरील प्रीतीला चुरगाळून टाका! कोमल भावनांचा शिरच्छेद करा! एकमेकांत गुंतलेले पाश खसखसा चिरून मोकळे करा! आणि उभयतांनीं निरनि-राळ्या स्त्री-पुरुषांबरोबर नव्यानें संसार थाटा! सारें पहिल्यापासून सुरू करा! तें आव्हान म्हणत होतें—असें केलेंत तरच तूं आई होशील आणि अनंता बाप होईल. तसें झालें तरच दोघांच्या मनांतला दहा वर्षांपासून रंगणारा चालणारा काळ पुढें धावूं लागेल. आणि मग तिला अठराव्या वर्षावर उलटी उडी मारण्याची गरजहि भासणार नाहीं.

पण तें शक्य होतें काय? तिला अनंताला सोडून जगणें शक्य होतें काय? तिच्याशिवाय अनंता आनंदांत राहूं शकला असता काय? तें शक्य नाहीं, हें त्या दोघांनीं परस्परांपाशीं कबुली न देतांच ओळखलें होतें. आणि म्हणूनच दुर्दैवाचा कडवट पेला पिऊन टाकून त्या दोघांनीं तें आव्हान स्वीकारलें होतें. प्रीतीच्या सामर्थ्यानें त्यांनीं या दुःखाशीं अबोल झुंज द्यावयाची ठरविली होती. पांचसहा वर्षें तीच झुंज चालली होती. पण या सहा वर्षांत तिला आणि त्याला कळून चुकलें होतें कीं ही झुंज केवळ समाजाशीं नाहीं. ही झुंज केवळ वैद्यक शास्त्राशीं नाहीं. ही झुंज शरीरांतल्या आणि मनांतल्या निसर्गाशीं आहे. त्या दोघांनीं युद्ध पुकारतांच शरीरांतले असंख्य धर्म आणि मनांतल्या अनंत प्रेरणा त्यांच्या प्रीतीविरुद्ध बंड करून उठल्या आणि संग्रामाला सिद्ध झाल्या. त्यांतली एकेक प्रेरणा आणि एकेक धर्म धारातीर्थीं पतन पावली तर मरतांना असंख्य विकृतींना जन्म देऊन मरत होती.

आणि या संग्रामांत तिच्या आणि त्याच्या हातांतील प्रीतीचे पाश गळून पडत होते. त्यांच्या इवल्याशा जीवनांतील काळाचीं पावलें खरोखरीच उलट पडूं लागलीं होतीं. पराकाष्ठेच्या प्रीतींतून निकटची मैत्री, निकटच्या मैत्रींतून भोळाबावडा परिचय, परिचयांतून केवळ उसनी तोंडओळख, आणि तोंडओळखींतून अनोळखी उदासीनता, असें हें चक्र उलटें फिरत होतें. फुलांतराचें परिवर्तन हळूहळू सरपटणाऱ्या सुरवंटांत होत होतें. प्रीतीचा शोध करण्यासाठीं वादळांत झुंकारलेलें हें जहाज, कोठल्या तरी अज्ञात हिमप्रदेशांत रुतून निर्जीव होऊन पडलें होतें.

म्हणून सुनीता आणि अनंता एकमेकांशीं भांडणतंटा करीत नसत, हें खरें. तसेंच एकमेकांचीं तीं दोघें मायेनें जपणूक करीत हेंहि कांहीं

खोटें नव्हतें. पण त्या दोघांच्या निकटवर्तीयांना त्यांच्यात पूर्वीसारखी उत्कटता आणि आतुरता उरलेली दिसत नव्हती. प्रेमळ धनी घर सोडून निघून गेला असतांहि, त्याच घरांत त्याच्या मायेवर पोसलेलें एकादें मांजर, तिथेंच घोटाळत रहावें, तसें त्यांचें एकत्र राहणें होतें. निकटवर्तीयांनाच कशाला? तिलाहि तें कळत होतें. म्हणूनच त्या बाईचा तो प्रश्न ऐकतांच तिच्या काळजांत एक अनामिक कट्यार खुपसली गेली. ती भानावर आली. ती कट्यार उपसून तिनें फेकून दिली आणि भळभळां वाहणाऱ्या जखमेवर तिनें ढोंगीपणाच्या मलमपट्टया चिकटवीत म्हटलें, "त्याचं असं आहे, बाई, परगांवीं न्यायचं तर एका मुलालाच नेऊन कसं चालेल! बाकीचे हट्ट घेऊन बसतात! म्हणून सर्वांनाच घरीं ठेवून निघालें!"

हें उत्तर दिल्यानंतर तिला मनस्वी आनंद झाला. कारण त्या बाईची आणि डब्यांतल्या साऱ्या माणसांची त्यामुळें खात्री होणार होती कीं या बाईला एकच मूल आहे असें नव्हे, तर पुष्कळ मुलें आहेत आणि पुष्कळ मुलें होणार आहेत. तीं सारीं माणसें खरें खोटें पडताळून पाहण्यासाठीं तिच्या घरीं थोडींच येणार होतीं?

इतक्यांत ती पुन्हा एकदा भानावर आली.

सहज तिचें लक्ष खिडकींतून बाहेर गेलें.

मघांचा तो पोरसवदा तरुण जागा शोधीत—जणूं तिलाच शोधीत—फलाटावरून येत होता. त्या दोघांची पुन्हा नजरानजर झाली. त्याबरोबर सारीं सप्तरंगी स्वप्नें तिच्या डोळ्यांत पुन्हा उसळलीं, आणि त्यांची नशा चढून ती अगदीं सहजमूल्य त्याच्याकडे पाहून दिलखुलासपणें हंसली. त्यावर तोहि साभिप्राय हंसला. डब्यांत जागा आहे काय असें त्यानें तिला पुसलें. तिला वाटलें, तिच्या शेजारीं बसायला जागा देण्यास ती राजी आहे काय, असें तो विचारीत होता. डब्यामध्यें गर्दी होऊं लागली होती तरी तिनें कसल्या तरी अनामिक उल्हासानें उठून त्याला आंत बोलावलें आणि पुढें होऊन त्याच्या सामानाला हातभार लावला. आणि मग तो आंत येऊन तिच्या शेजारीं बसला. तिला अगदीं लगटून बसला. हवापाण्यावरून तीं दोघें आपसांत मामुली संभाषण करूं लागलीं. पण तें बोलणें खोटें होतें. दोघेंहि बोलण्यापेक्षां एकमेकांना चोरट्या नजरेनें नीट न्याहाळून पहात होतीं. तो तिला आवडूं लागला होता यांत प्रश्नच नाहीं. पण तीहि त्याला आवडूं लागली होती याचें सुख तिला विशेष होत होतें. गाडी सुटण्याची वेळ होऊं लागली तशी डब्यांतली गर्दी वाढून खेचाखेच होऊं लागली. त्यामुळें तिला अधिकच लगटून बसणें त्याला भाग पडत होतें. गर्दीनें त्या दोघांचा जीव गुदमरत होता. तरी डब्यांत आणखी माणसें यावींत आणि त्यांनीं जास्त खेचाखेच करून त्याला तिच्या अंगावर ज्यास्तींत ज्यास्त ढकलावें



असें तिला वाटूं लागलें. अखेर दोन बाकांमध्येंहि माणसें तिष्ठत उभीं राहूं लागलीं. त्यामुळें तिला मनस्वी गुदगुल्या झाल्या. कारण माणसांच्या मधल्या रांगेचा आतां त्या दोघांसमोर पडदा तयार झाला होता. त्यामुळें अनेकांच्या दृष्टीचे अंकुश चुकवून त्याच्या सलगीला तिला उत्तेजन देतां येत होतें. गाडी सुरू झाली आणि संध्याकाळच्या अंधुक प्रकाशांत ती पिसाटाप्रमाणें दौडूं लागली. गाडींतल्या ऊठबशीचा गलबला शांत झाला. आणि क्रुसावर चढविलेल्या खिस्ताप्रमाणें, छतांच्या कड्यांना दोन्ही हातांनीं धरून बाकांमधें उभीं असलेलीं माणसें पेंगूं लागलीं. जणूं त्यांनीं ज्ञानवृक्षाचें फळ चाखण्याची संधीच अदाम आणि ईव्हला पुढें केली होती.

त्या संधीचा फायदा घेऊन त्या पोरसवदा तरुणानें शहारलेल्या शरीराला ठायीं ठायीं स्पर्श करून फुलवून टाकण्यास आरंभ केला. ओठांची भाषा विषयामागून विषय ओलांडीत होती. पण डोळ्यांची भाषा स्पर्शाच्या उन्मादाभोंवतीं गुंजन करीत होती. प्रणयवेड्या अनंतानें पहिल्या रात्रीं तिला असाच भीत भीत स्पर्श केला होता. त्या पोरसवदा तरुणाच्या स्पर्शांत अपरंपार आसक्ति आणि पराकाष्ठेची भीति होती. पण तिच्या डोळ्यांतल्या मूक उत्तेजनानें तो धिटाईनें पुढें पुढें जात होता. किती तरी वेळ सहज-गत्या एकमेकांच्या बोटांत मिसळलेलीं त्यांचीं बोटें जीवघेणी क्रीडा करीत होतीं. त्यानें ज्या लोलुपतेनें तिच्या वक्षस्थलाकडे पाहिलें, तें तिच्या लक्षांत येतांच ती वधूसारखी एकदम लाजली. असंख्य सुखसंवेदनांनीं तिचें मन भराभरा ओतूं गेलें.

इतक्यांत लोणावळा स्टेशन आलें आणि गाडी दचकन् थांबली. त्याबरोबर माणसें एकमेकांवर कलंडलीं. आणि तोहि तिच्या अंगावर कलंडला. सहज-गत्याच तो कलंडला. तिला वाटलें जणूं चुंबनासाठीं तो ओणवा होत आहे. तिला त्याच्या गळ्यांत आपले करपाश टाकावेत अशी उबळ आली. पण तिनें तसें कांहीं एक केलें नाहीं. फक्त पदर सारखा करीत ती थोडी दूर सरकली. माणसांच्या ऊठबशीचा गलबला पुन्हा सुरू झाला. पेंगणारे क्रुसा-वरील खिस्त हातपाय मोकळे करण्यासाठीं फलाटावर उतरून फिरूं लागले. त्या तरुणानें तिला चहा घेण्याचा आग्रह केला. तिला वाटलें, जणूं तो अनुनयाचाच भाग आहे. तिनें रुकार देतांच त्यानें खिडकींतूनच खालीं फलाटावर उडी मारली आणि चहावाल्या पोराच्या मागें गर्दींत तो कोठें दिसेनासा झाला. त्याबरोबर त्या मघांच्याच कुणब्याच्या बाईनें तिला पुन्हा एकदां प्रश्न केला,

"तुमचे यजमान दिसत्याती जनूं?"

त्या प्रश्नाचा तिला विस्मय वाटला. पण सप्तरंगी स्वप्नांची नशा चढलेल्या तिच्या मनाला पुन्हा एकदां असंख्य गोड गुदगुल्या झाल्या. औटघटकेपुरता त्याच्याशीं संसार करण्याची तिला जबरदस्त लालसा झाली नव्हती काय? म्हणून तिनें फक्त "हूं" म्हटलें आणि चोरट्या तृप्तीचें सुख भोगून घेतलें.

तिच्या पलीकडेच दोन माणसें टाकून, दोन पगडीवाले म्हातारे तावा-तावानें कांहीं कुजबुजत बसले होते, तिकडे तिचें लक्ष गेलें. तिला शंका आली कीं या खोकडांनीं तर आपली सलगी न्याहाळली नाहीं ना? म्हणून ती लक्ष देऊन त्यांचें बोलणें ऐकूं लागली. एक पगडीवाले दुसऱ्या पगडी-वाल्यांना विचारीत होते, "कोणाचें सांगतां आहांत तुम्ही? आपल्या नानासाहेबांच्या यमीचें काय?"

"होय, अहो तिचेंच. त्या वेळीं आम्हीं नानासाहेबांना म्हटलं कीं, त्या पोराची तुमच्या यमीबरोबर चाललेली सलगी आम्हांला कांहीं बरी दिसत नाहीं बुवा! राग आला तेव्हां त्यांना! म्हटलं राहिलं! पुढं व्हायचा तोच

प्रकार झाला. पोरीला दिवस गेले आणि पोरगा चक्क कानांवर हात ठेवून मोकळा झाला—"

"घ्या! आणि मग पुढें?"

"पुढें काय? सगळा गोंधळ. सगळा तमाशा. कोटल्याशा डॉक्टरिणीला पैसे चारून पाप निस्तरलं तें. पण..."

तेवढ्यांत तिचा औट घटकेचा अनंता हातांत कप घेऊन स्वतःच आला. त्यानें स्वतःच कप आणलेला पाहतांच तिला भारी सुख झालें. जणूं तिच्या संसाराची तो पूर्वतयारीच करीत होता. तिनें चहा घेतला आणि कप परत केला. मग गाडी सुटण्याच्या सुमाराला तो परत आंत येऊन तिच्या शेजारीं बसला. गाडी पुन्हा पिसाटाप्रमाणें आंधारांत धावूं लागली. तिला वाटलें ही नानासाहेबांची यमी खुळी आहे. उदरीं आलेल्या मुलाचा असा चोरटा नाश करायला तिनें कशी संमति दिली? उद्यां तिच्या नशिबीं एकादा अनंता आला म्हणजे ती आई कशी होणार? तिनें आपल्या मनाला हा प्रश्न केला मात्र; त्याबरोबर आधींच दुखावलेलें तें हळवें मन चिडचिडून उठलें आणि तिला म्हणालें—याचा अर्थ काय? हवा आहे कशाला तो आईपणाचा अभिमान? आईपणा म्हणजे यौवनाचा नाश, रूपाचा चोळामोळा, अनामिक जीवांचें दास्य, वेळेचा अपव्यय, शक्तींचा ऱ्हास, अकारण काळजी आणि नाकासमोरच्या रस्त्यानें काळाबरोबर कुतर-ओढ, अशी कितीतरी समीकरणें तिनें तात्यापंतोजीप्रमाणें आपल्या मनाला शिकविलीं. पण हट्टी मुलांप्रमाणें तिचें मन तर्कवादानें गुंडाळलें जाईना.

तेवढ्यांत त्या तरुणानें हळूच तिच्या दंडाला स्पर्श केला. आणि तिच्या मनांत त्या हट्टी आशयाच्या विजयाची पताका फडकली. बिचारा तर्कवाद, नास्तिकाच्या घरांतून एकाद्या भटजीनें चंबुगवाळें आवरावें तसा फजीत होऊन देशोधडीला लागला. त्याच्या स्पर्शानें ती पुन्हा एकदां विलक्षण लाजली. आणि त्याच्या हातानें फाजील धिटाई दाखवूं नये म्हणून तिनें पदर नीट सांवरून घेतला. पण तिच्या तेवढ्या कृत्यानें डोळ्यांतली आसक्ति विषण्ण झाली. आणि मग तिला वाटलें कीं त्याचा हा छळ पुरे झाला.

मावळत्या सूर्याला साक्षी ठेवून त्याच्याशीं गांधर्व विवाह लावावा. त्याला हवा असलेला औटघटकेचा संसार थाटावा. कोठल्या तरी भर पंक्तींत त्याला लाजून हळूच घास द्यावा. कोणी तरी "जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा दिसतो!" असें म्हणतांच लाजून मुरका मारावा. त्याचें नांव कांहींहि असलें तरी बदलून आपण त्याला 'अनंता' म्हणावें. मधुचंद्रासाठीं त्याला घेऊन आपण दूर दूर कोठें जावें. पहिल्या रात्रीं त्याचा छळ करून मग आपण त्याच्या स्वाधीन होवें. त्याला हवें आहे तें पुरेपूर लुटूं द्यावें. आपल्या लावण्यानें, आपल्या अल्लड क्रीडेनें आणि आपल्या अपरंपार प्रीतीनें त्याला अनंतासारखें वेडें करावें. त्याच्या शब्दाबरोबर नाचावें. आणि त्याला जीवघेण्या हट्टानें आपल्याभोंवतीं भिंगरी [illegible] लावावें. त्याशीं खूप खूप बोलावें; कधीं रडून त्याच्या अंत पहावा तर कधीं गुदगुल्या करून हंसवून त्याला बेजार करावें. कधीं रुसून त्याच्याकडून अनुनय करून घ्यावा तर कधीं आपल्या पागलपणानें त्याला चकित करावें. आणि असें करून मेनकेनें विश्वामित्राला तपश्चर्येपासून जसें च्युत केलें तसें त्या औटघटकेच्या संसारांत त्याला त्याच्या लौकिक जगापासून फरफटत ओढून नेऊन आपल्याला हवें आहे तें प्राप्त करून घ्यावें.

आणि मग एक दिवस ही तपश्चर्या फळाला आल्यावांचून [illegible] नाहीं. आपल्याला ज्या वेगळेपणाची हाव लागली आहे, ज्याच्यावांचून आपला संसार बेचवपणानें रखडत चालला आहे; तो वेगळेपणा, ती मुक्ति, आपल्याला प्राप्त होईल. त्या वेगळेपणाचा त्याला उमज पडतांच त्या तरुणासारखा तो गांगरून जाईल. विश्वामित्रासारखा तो आपल्या कर्माला दोष देऊं लागेल. आणि दमयंतीला अरण्यांत टाकून पळणाऱ्या नळासारखा तो एक दिवस अन्तर्धान पावेल. नानासाहेबांच्या यमीला फसवून फरारी होणाऱ्या पोराप्रमाणें तोहि कोठें बेपत्ता होईल. आणि [illegible] नाहीं झालें तर उर्वशीप्रमाणें ती तिच्या पुरूरव्याचा त्याग करण्यास मागेंपुढें पहाणार नव्हती.

माहेरून परतल्याप्रमाणें ती हळूच एक दिवस आपल्या अनंताच्या संसारांत परत जाणार होती. पण पूर्वीसारख्या [illegible] उदासीनतेनें आणि बेचव बेफिकिरीनें नव्हें. सहा वर्षांपूर्वींच्या उल्हासानें आणि अल्लडपणानें! तिच्यांतला बदल लक्षांत येतांच अनंता आश्चर्यानें आणि आनंदानें चकित होणार होता. असें चकित होण्यासाठीं तो गेलीं सहा वर्षे वाट पहात नव्हता काय? तो बदल त्याला समजला असता म्हणजे त्याचीहि सूरत पालटून गेली असती. त्याच्यांतला चोरटेपणा मावळला असता आणि तो तिच्याभोंवतीं पुन्हा नाचूं बागडूं लागला असता. तिच्या पोटांतला जीव कोणापासून जन्माला आला आहे हें त्यानें पुसलें नसतें आणि तशी त्याला शंका येण्याचें कारणहि नव्हतें. कठोर निर्णय देणारे नामांकित वैद्यहि निसर्गाचा चमत्कार पहून तोंडांत बोट घालून "असें कधीं कधीं घडतें," असें पुटपुटले असते. तिचें रहस्य त्यांना कोण जाऊन सांगणार होतें? आणि मग आजवर फिदफिदणारे आतेष्टहि फजीत

पावले असतें. कालांतरानें तिच्या यौवनाचा नाश झाला असता, तिचें रूप चुरगळले गेलें असतें आणि तिच्या घरांत चौकोनी पावलें दुडुदुडुं लागतांच या औटघटकेच्या संसाराची सुखदुःखहि तिच्या मनांत विरून गेली असती. आणि मग आजवर तिच्या आणि त्याच्या जीवनांत केवळ वेचव रेंगण घालीत बसलेला काळ, ध्वनिमुद्रिकेवरील अडखळलेल्या सुई-प्रमाणें पुढें सरकून झपाट्यानें दौड मारूं लागला असता. हिमप्रदेशांत रुतलेल्या जहाजाभोंवतींचें बर्फ कसल्या तरी अनामिक उबेनें वितळून गेलें असतें. आणि तें जहाज डौलानें शिडें उभारून पुन्हा दर्यासंचार करूं लागलें असतें! पण तेवढ्यांत गाडीचा कर्णकटु भोंगा तिच्या कानांवर आदळला. आणि कल्याणच्या स्टेशनांत शिरून गचकन् थांबणाऱ्या गाडीच्या धक्क्यानें ती पुन्हा एकदां त्या तरुणाच्या अंगावर कलंडली. त्या स्पर्शानें झालेला आनंद ती मोहक हास्य करून व्यक्त करणार होती. पण तितक्यांत ती दचकली. ऊटवशीचा-गलबला चालला असतांनाच तो तरुणहि खालीं सामान घेऊन उतरण्यासाठीं उठला. त्याबरोबर ती चकित होऊन त्याजकडे पाहूं लागली. आपल्याला टाकून हा कोठें चालला? कां निघाला? त्याच्यासाठीं तिनें इतकीं स्वप्नें उभारल्यानंतर तीं सारीं चुरगाळून टाकून हा कसली तपश्चर्या करणार?... असले वेडे प्रश्न तिचे डोळे त्याला विचारूं लागले. ओठ मात्र हंसतमुखानें परस्परांचा मामुली निरोप घेत होते. कसल्या तरी अनामिक वेदनेमुळें तिचा जीव कळवळल्यासारखा झाला. अरण्यांत आक्रोश करणाऱ्या दमयंतीप्रमाणें तिचें मन आंतल्या भयाण एकांतांत आक्रंदन करूं लागलें. पण त्याला त्याचें काय? शकुंतलेला नाकारणाऱ्या दुष्यंताचे संभावित डोळे आपल्याकडे त्याच्या दृष्टींतून पहात आहेत असें तिला वाटलें. त्यानें हंसतमुखानें तिचा निरोप घेतला आणि एकदम् जणूं कांहींच घडलें नाहीं अशा भावनेनें तो खालीं उतरून गर्दीत कोठें दिसेनासा झाला. तो गेला आणि क्षणभर तिला डोळ्यांसमोर अंधेरी आल्यासारखें झालें. तिचा औटघटकेचा अनंता, तिचा दुष्यंत, तिचा पुरुरवा तिला टाकून गेला होता. आणि ती? प्रचंड आगीनें जिच्या खोपटाची राखरांगोळी झाली आहे अशा जख्खड कुब्जा म्हातारीनें किडुकमिडुकाच्या आशेनें राखेचे ढिगारे ढोपशीत बसावें, तशी तीं आपलीं करपलेलीं स्वप्नें चिवडूं लागली. अठ्ठाविसाव्या वर्षावरून अठराव्या वर्षावर उडी मारणाऱ्या तिच्या मनाला कोणी तरी जबरदस्त चपराक लगावली. त्याबरोबर काळाच्या मांडीखालीं निमूटपणें मानगूट देऊन ती पुन्हा तिशीकडे धडपडत-ठेचकळत रखडूं लागली. तो तरुण भेटल्यापासून तिच्या मनीनें उंशी घेऊन उड्डाण करून काळाच्या रिंगणांतून मुक्त होण्याचा जो यत्न केला होता, तो फुकला होता. त्याचा अर्थ आतां पुन्हा पूर्वीसारखेंच सारे यथासांग चालणार होतें. पस्तिशींतून चाळिशीकडे रखडणाऱ्या अनंताबरोबर सात वर्षांचें अंतर ठेवून तीहि रखडणार होती.

आणि मग दोनतीन स्टेशनांनंतर तिलाहि उतरावयाचें होतें तें स्टेशन आलें. खिडकींतून तिनें डोकावून पाहिलें, तों तिला उतरवून घेण्यासाठीं तिचे वृद्ध वडील आणि तिचीं धाकटीं भावंडें आलीं होतीं. ती खालीं उतरतांच तिच्या भावंडांनीं तिच्याशीं झोंबून गिल्ला करून आपला आनंद दाखविला आणि वडिलांनीं तिला मायेनें म्हटलें, "ठीक झाला नी प्रवास? कमीजास्त कांहीं विशेष?—" त्यावर ती किंचित हंसली.

तिला वाटलें, विशेष? विशेष पुष्कळच घडलें होतें! पण तसें विपरीत कांहींच घडलें नाहीं!



# पिंपळपानें

सळसळून पिंपळपानें
गातात नित नवें गाणें
कधिं झुळझुळ निर्झर लाजे
कधिं सतार नवथर वाजे
कधिं विणिति स्वरांत उखाणे
गातात नित नवें गाणें!
हळु येतां नीरव रजनी
धरि गूढ अबोला धरणी
तरि सरे न यांचें हंसणें
गातात नित नवें गाणें!
कधिं चांद नभांतुन दिसतां
जळ निळें रेशमी हंसतां
गुणगुणती धुंद तराणे
गातात नित नवें गाणें!
कधिं छाया वेढुनि बसतां
अन् रानकिडे किरकिरतां
स्वर यांचे केविलवाणे
गातात नित नवें गाणें
कधिं किमया होय ढगांची
पालवी फुटे रंगांची
अन् यांचें हृदय उधाणे
गातात नित नवें गाणें!
कधिं येवो शिशिर विरागी
वा वसंत कधिं अनुरागी
तरि यांचें गीत दिवाणें
गातात नित नवें गाणें
तालावर काळाच्या हीं
गातात बनून विदेही
उपनिषदें आणि पुराणें
गातात नित नवें गाणें
सळसळून पिंपळपानें
गातात नित नवें गाणें

—मंगेश पाडगांवकर



जशी ज्याची श्रद्धा असेल तसा त्यानें
या नाट्य-काव्याचा रसास्वाद घ्यावा;
कारण
या काव्यवस्तूंत भोग आहे
तसा त्यागहि आहे !

जयदेव हा राजकवी होता. चालू अणुयुगांत काव्याबरोबर राजसत्तेलाहि उतरती कळा लागली आहे. राजयुग संपून लोकयुगाला–लोकशाहीच्या युगाला–सुरुवात झाली आहे. राजकवी जाऊन "लोककवी" पुढें येत आहेत! पूर्वी कवींना राजे लोक आश्रय देत व त्यांचा गुणगौरव करीत. इतकेंच नव्हें तर स्वतःला कवी म्हणवून घेण्याचीहि त्यांची महत्वाकांक्षा असे. सम्राट् समुद्रगुप्ताला साहित्यिक होण्याची तळमळ लागलेली होती. श्री हर्ष राजानें "कादंबरीकार" बाणाला आश्रय दिला होता. शिवाय स्वतःहि रत्नावलीसारखीं नाटकें लिहिलीं होतीं. धारानगरीचा भोज राजा व मृच्छकटिककार शूद्रक यानींहि साहित्यसेवा केली आहे.

कविकुलगुरु कालिदास याला विक्रम राजाचा आश्रय होता हें सर्वांना माहित आहेच. त्याचप्रमाणें कवि जयदेव याला बंगालचा शेवटचा हिन्दू राजा लक्ष्मणसेन वैद्य याचा उदार आश्रय मिळाला होता. हा राजा १२ व्या शतकांत होऊन गेला.

जयदेव नुसता राजकवी नसून कवीराजहि होता. खुद्द कवीनें गीतगोविंदांत आपला उल्लेख कवीराज असा केला आहे. आतां ऐतिहासिक कालाच्या दृष्टीनें पाहिल्यास गीतगोविंदकार जयदेव हा कालिदास, भवभूति या कविपरंपरेंतील शेवटचा मोठा कवी (Major poet). तो ख्रिस्तोत्तर बाराव्या शतकांत होऊन गेला. तो काल म्हणजे संस्कृत काव्याच्या अवनतीचा काळ होय. पण या काळांतच 'नैषधीय चरित' हें महाकाव्य निर्माण झालें. पण तें फार कृत्रिम काव्य आहे. कालिदासाच्या महाकाव्यांतील अव्याज मनोहरता त्यांत नाहीं. पण अशा काळांतहि जयदेवानें गीतगोविंदासारखें परिपूर्ण काव्य रचलें.

गीतगोविंद काव्य हें संस्कृतमधील एक सुंदर भावकाव्य आहे. श्री. चिंतामणराव वैद्यांचे मतें गीतगोविंद हें जगांतील उत्कृष्ट व सर्वांग सुंदर Lyric भावकाव्य आहे. कालिदासानंतर सातव्या शतकांत भर्तृहरीनें शतकत्रय रचिलें. त्याच शतकांतील अमरुशतक पण संस्कृतमधील एक भावकाव्य होय. जगन्नाथ पंडिताचें गंगालहरी हें प्रसिद्ध काव्य पण याच वर्गांत पडतें. आतां एक गोष्ट मात्र खरी कीं जयदेवाच्या या कलाकृतीच्या स्वरूपा (Form) बद्दल विद्वानांत वाद आहेत. लॅसेन्, सर वुईल्यम जोन्स या पंडितांच्या मतें हें 'नाट्य' आहे. तर पिशेल, लेवी या विद्वानांना हें 'नाट्यकाव्य' वाटतें. म्हणजे काव्य आणि नाटक यांच्या दरम्यानचें कांहीं तरी. डॉ. कीथ या इंग्लिश प्रोफेसरांनीं याला असंदिग्धपणें Poem किंवा काव्य म्हणून मान्यता दिली आहे. काव्यांत सर्ग असतात व नाटकांत अंक असतात. या कसोटीप्रमाणें गीतगोविंद हें बारा सर्गांत विभागलेलें काव्य आहे. शिवाय गीतगोविंद या नांवांतच जयदेवानें या कलाकृतीचें 'गीत' (Poem) हें स्वरूप दिग्दर्शित केलें आहे. नवव्या प्रबंधाचे शेवटीं 'जयदेवानें गायिलेलें गीत मुकुंद होवो' असा स्पष्ट उल्लेख आढळतो. असे उल्लेख अनेक आहेत.

गीत गोविन्दाची रचना अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण व मौलिक आहे हें डॉ. कीथ यांचें मत कुणासहि पटण्यासारखें आहे. हें काव्य बारा सर्गांत

हरिहर उर्सेकर एम्. ए., एल्एल्. बी.

विभागलेलें आहे. त्यांत एकंदर २४ प्रबंध किंवा भावगीतें—ज्यांना सर्वसाधारणपणें अष्टपद्या म्हणतात त्या—आहेत. आतां सगळ्याच अष्टपद्यांत केवळ आठच कडवीं नाहींत. उदा.—पहिल्याच प्रबंधांत अकरा श्लोक किंवा कडवीं आहेत. पण बहुतेक प्रबंधांत आठच कडवीं आहेत. तसेंच २४ प्रबंधांची विभागणी १२ सर्गांत सारखी केलेली नाहीं. ९ व्या सर्गांत एकच प्रबंध आहे. तर सातव्या सर्गांत ४ प्रबंध आहेत. संस्कृत वाङ्मयांत 'यात्रा' या नांवाचा एक प्रकार आहे. त्यांत कथानकाला जोडणारीं वाक्यें अगर श्लोक म्हणणें हे पात्रांच्या शीघ्र कवित्वावरच सोपविलेलें असतें. पण त्या उलट गीत गोविन्दांत कथानक सांधणारे सर्व दुवे जयदेवानें श्लोकरूपानें दिलेले आहेत. यामुळेंच या श्लोकांत विविधता, वैचित्र्य व बांधेसूदपणा निर्माण झालेला आहे. शेवटीं यांतील अष्टपद्या गावयाच्या आहेत व श्लोक नुसते म्हणावयाचे आहेत. हेंच या काव्याच्या स्वरूपाचें वैशिष्ट्य होय. आतां या काव्याच्या विषयाकडे वळूं या.

या काव्याचा विषय जयदेवांच्याच शब्दांत सांगायचें म्हणजे "श्रीवासुदेवरतिकेलिकथा" असा आहे. "श्री" म्हणजे राधा व वासुदेव कृष्ण यांच्या क्रीडेची कथा या काव्यांत गुंफलेली आहे. ज्यांना हरि–स्मरणाची गोडी असेल व विलासकलेबद्दल कौतुक वाटत असेल अशाच रसिकांसाठीं हें "मधुरकोमलकान्त पदावलींनीं" परिपूर्ण असें काव्य ऐकावें, त्यांच्यासाठींच जयदेवानें हें लिहिलें आहे, असा काव्याच्या प्रारंभींच कवीनें स्पष्ट खुलासा केला आहे. त्याचप्रमाणें काव्याच्या शेवटीं जयदेवानें असेंहि म्हटलें आहे कीं—या गीतांत जयदेवाचें संगीत-प्राविण्य, विष्णुभक्ति व शृंगारविषयक संयमपूर्ण रचना काव्यांत गुंफलेली विचारवंतांना जरूर आढळून येईल.

गीत–गोविंदांत कथा अथवा गोष्ट तशी फारच थोडी आहे. या कथेंत तीन पात्रें आहेत. श्रीकृष्ण हा नायक, राधा ही नायिका आणि राधेची सहेली, सखी, ही दूती. वसंतऋतूची मेघमय रात्र हा काल आहे. आणि यमुनेच्या तीरावरील कुंजवन हें स्थळ आहे. सुरवातीस विरहाकुल अशा राधेचें कवीनें चित्रण केलेलें आहे. नंतर ती सखीला कृष्णाकडे पाठवते व त्याची वाट पहात बसते. सखी कृष्णाला राधेची अवस्था कळवते व परत येऊन तिला कृष्ण येत असल्याची खबर देते. पण कृष्ण दुसऱ्या दिवशीं सकाळीं येतो. राधेच्या पायां पडून तो तिची क्षमा मागतो. राधा त्याला "शठ" वगैरे शब्दांनीं धिक्कारते व त्यामुळें कृष्ण परत जातो. नंतर राधेला कृष्णाला घालवून दिल्याबद्दल दुःख होतें. दुसऱ्या दिवशीं रात्रीं राधेला तिची सखी कुंजांत नेते व कृष्ण-राधेची भेट होते. बस्, इतकीच गोष्ट आहे या काव्यांत. पण तसें पाहिलें असतां मेघदूत हें सुद्धां एक महान् काव्य नाहीं कां? पण त्याला तरी दीर्घ असा कथाभाग कुठें आहे? काव्याचें महत्त्व हें त्यांतील कथानकावर अवलंबून नसतें तर केवळ काव्य गुणांवरूनच त्याचें मोजमाप होत असतें. जयदेवाचेच शब्दांत सांगावयाचें म्हणजे हें गीत म्हणजे "पदावली" शब्दांचा हार आहे. त्यांतील चोवीस प्रबंध हे मोती आहेत आणि हे सारे एकत्र ओवण्यास वरील कथाभागाचें सूत्र पुरेसें आहे.

वर सांगितलेला विषय जयदेवानें बारा सर्गांत वर्णिलेला आहे. यांतील विशेष म्हणजे जयदेवानें रचिलेले चोवीस प्रबंध अगर अष्टपद्या आणि अष्ट नायिकांचीं मनोहर शब्दचित्रें हे होत. संस्कृत वाङ्मयांत अष्टनायिकांचीं इतकीं सुंदर वर्णनें क्वचितच आढळतील. गीतगोविंदाच्या चौथ्या सर्गांत उत्का अगर उत्कंठिता, पांचव्यांत अभिसारिका, सहाव्यांत वासकसज्जा, सातव्यांत विप्रलब्धा, आठव्यांत खंडिता, नवव्यांत कलहांतरिता, दहाव्यांत मानिनि व शेवटच्यांत स्वाधीन-भर्तृका अशीं नायिकांचीं वर्णनें आढळतात. जयदेवानें आपल्या गीतांच्या बारा सर्गांना काव्यमय सुंदर अशीं नांवें दिलीं आहेत. पहिल्या सर्गाचें नांव 'सामोददामोदर' असें आहे. सुरवातीस काव्याचा विषय व प्रयोजन कवीनें सांगितलें आहे. तें वर उद्धृत केलेलेंच आहे. जयदेवानें आपल्या समकालीन अशा पांच कवींवरील स्वतःचा अभिप्राय चवथ्या श्लोकांत वर्णन केलेला आहे व त्याच ठिकाणीं स्वतःचें काव्य निर्दोष शब्दरचनेंत परिपूर्ण आहे असेंहि म्हटलें आहे. या प्रस्तावना-वजा चार श्लोकानंतर मंगलाचरणाचा पहिला प्रबंध आहे. यांत कवीनें दशावतारांची स्तुती केली आहे. याचें वैशिष्ट्य म्हणजे विष्णूचे सारे दहा अवतार केशवाचेच म्हणजे कृष्णाचेच आहेत असें म्हटलें आहे. आतां लौकिक समजुतीप्रमाणें विष्णूचा आठवा अवतार म्हणजेच कृष्ण. पण स्वतः कृष्णच कृष्णाचा अवतार कसा होणार? म्हणून कवीनें हलधर म्हणजे म्हणजे बलराम हाच कृष्णाचा आठवा अवतार आहे अशी कल्पना केलेली आहे. आतां कृष्ण स्वतः "वर्तमान" असा असतांना समकालीन असा त्याचा भाऊ त्याचाच अवतार कसा असूं शकेल? पण हें काव्य आहे हें विसरतां कामा नये. तदनंतरच्या श्लोकांत कवीनें कृष्णाला वंदन केलें आहे. दुसऱ्या प्रबंधांत कृष्णाचा जयजयकार "जय जय देव हरे" ह्या अष्टपदींत केला आहे.

अशा रीतीनें संस्कृत वाङ्मय संकेतानुसार प्रस्तावना व मंगलाचरण झाल्यानंतर तिसऱ्या प्रबंधापासून कथेला सुरवात झालेली आहे. पहिल्या प्रबंधांतील "पदनखनीरजनितजनपावन" हें वर्णन गंगेच्या समासाची आठवण करून देतें. तिसऱ्या प्रबंधांत कृष्णविरहानें व्याकुळ झालेल्या राधेला सखी सभोंवतालच्या वसंताचें वर्णन ऐकवीत असते. वसंतऋतूंत हरी गोपींसह रासक्रीडा करीत आहे "विहरति हरिरिह सरस वसन्ते" हें धृपद तर फारच नाद-मधुर आहे. नंतरच्या तिसऱ्या श्लोकांत वसंत ऋतूंतील भ्रमरांनीं कंपायमान करून सोडलेल्या रसाळ मंजीरीवर बसून "कुहूकुहू" करणाऱ्या कोकिळांचा शब्द विरहीजनांना सुख न देतां दुःखदायक, कष्टदायक असा ठरतो आहे असें बहारदार वर्णन आहे. चवथ्या प्रबंधांत सखी राधेजवळ कृष्णाचें गोपीसमवेत चाललेल्या विहाराचें वर्णन करतें, त्यानंतरचे श्लोकांत नायक जो कृष्ण त्याचें "शृंगारासखिमूर्तिमानिव क्रीडति" असें वर्णन सखीच्या तोंडीं घातलेले आहे. कृष्ण म्हणजे मूर्तिमंत शृंगाररसच होय. प्रत्यक्ष शृंगारच साकार होऊन विलास करीत आहे अशी कल्पना कवीनें केलेली आहे. या ठिकाणीं भवभूतीनें उत्तररामचरित्रांत सीतासुतांचें वर्णन करतांना "तें बालक म्हणजे प्रत्यक्ष वीररसच होय" असें लिहिलें आहे त्याची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. तसेंच इंग्रजी वाङ्मयाच्या वाचकांना मिल्टननें आपल्या "लॅलेग्रो" (आनंदी) या कवितेंत Laughter holding both its sides म्हणजे प्रत्यक्ष हास्यरसच खदखदां हांसत आहे असें वर्णन केलेलें आहे तें स्मरतें.

दुसऱ्या सर्गाचें नांव अक्लेशकेशव, असें आहे. या सर्गांत दोन प्रबंध आहेत. पहिल्या सर्गांत कृष्ण हा गोपींसह रासक्रीडा करीत आहे हें आपण पाहिलेंच. त्यामुळें राधेचा मत्सर जागृत होतो. पण कृष्णावर तिची भक्ति असल्यामुळें ती पूर्वीच्या कृष्णलीलांचें वर्णन आपल्या सखीजवळ सांगते त्यांत कृष्णानें राधेशीं पूर्वी केलेली थट्टा तिला आठवते. त्यांत "मोहन" नांवाची बांसरी

वाजवणारा कृष्ण हा, डोक्यावर धारण केलेल्या मयूर पिसांनीं, इंद्रधनुष्यामुळें रंगीत दिसणाऱ्या मेघाप्रमाणें, कसा दिसतो हें सांगितलें आहे. हें वर्णनहि मनोहर असेंच आहे. कृष्ण हा देव आहे ही भावना राधेच्या मनांत सतत जागृत आहे असें दिसतें. कारण राधेला आठवणारा कृष्ण हा "मुनिवर", मनुष्य प्राणि, देव आणि दैत्य या साऱ्यांनीं वंदिलेला आहे असें राधा सखीला सांगते. त्या पुढील स्फुट श्लोकांत प्रेमाचा आंधळेपणा व अनिवार्यता दाखविली आहे. राधा सखीला म्हणते, "मी कृष्णाच्या दोषाकडे न पहातां फक्त गुणसमुच्चयाकडेच पहातें आणि त्यामुळें माझें मन त्याच्याकडे ओढ घेतें" आणि म्हणूनच सहाव्या प्रबंधांत राधा सखीचीं आर्जवें करून म्हणते कीं, त्या "केशीमथनाशीं" माझें मीलन घडवून आण. त्यानंतरच्या दुसऱ्या श्लोकांत राधा सखीला पुन्हा सांगते कीं विरहतापानें तिला अशोकाच्या फुलांपासून त्रास होतो, जलाशयावरून वहात आलेला उपवनपवन तिला त्रास देतो आणि या स्थितींत तिला सुख द्यावयाला आम्रमंजिऱ्याहि असमर्थ ठरतात. हा श्लोक "शिखरिणी" वृत्तांत आहे हें कवीनें आपल्या श्लोकांत "शिखरिणी" हा शब्द गुंफून फारच कलापूर्ण रीतीनें सूचित केलें आहे. पहिल्या दोन सर्गांत राधेचा कृष्णावरील अनुराग वर्णन केल्यावर कृष्णाचेंहि राधेवर फार प्रेम होतें हें तिसऱ्या सर्गांत वर्णन करून सांगितलें आहे. याचें नांव 'मुग्धमधुसूदन" असें आहे. राधा ज्याप्रमाणें कृष्णविरहानें खिन्न झाली आहे याचप्रमाणें माधवहि यमुनानदीचे तीरावरील कुंजांत विषाद करीत आहे असें वर्णन आहे. सातव्या प्रबंधांत कृष्णाच्या विरहव्यथेचें वर्णन आहे. कृष्ण म्हणतो, "मला गोपींनीं घेरलेलें पाहून राधा रुसून निघून गेली, पण मीं तिला थांबवून धरलें." अशा रीतीनें राधेचा अपमान केल्याबद्दल कृष्णाला दुःख वाटतें आणि म्हणूनच राधेच्या विरहामुळें कृष्ण म्हणतो, "आतां 'किं जनेन किं धनेन किं मम जीवितेगृहेण' अशी माझी स्थिति झालेली आहे आणि म्हणून मला आतां कशांतहि अर्थ वाटत नाहीं." या प्रबंधाच्या शेवटच्या ओळींत जयदेवानें किंदुबिल्वरूपी सागरांत जन्म झालेला रोहिणीरमण, म्हणजे चंद्र असें स्वतःचें वर्णन केलें आहे. यानंतरच्या श्लोकांत अपन्हुती अलंकार फार सुरेख साधला आहे. कल्पना अशी : मदन हा कृष्णावर शंकर समजून प्रहार करायला येतो. तेव्हां कृष्ण त्याला म्हणतो, "माझ्या गळ्यांत सर्पासारखी दिसणारी वस्तु सर्प नसून कमलाच्या देठांचा हार आहे. कंठभागी नीलप्रकाश दिसतो तें हलाहल नसून ती नील कमळांची माळ आहे. त्याचप्रमाणें शरीरावरील पांडुवर्ण भस्म नसून चंदनाची उटी आहे." हा श्लोक वाचून "जटानेयं वेणी" या श्लोकाची रसिक मनाला आठवण झाल्यावांचून कशी राहील? यानंतरच्या श्लोकांत मेलेल्याला मारण्यांत पुरुषार्थ काय या अर्थाचें "मूर्च्छित-जनाघातेन किं पौरुषम्" हें सुंदर सुभाषित आढळतें. आतांपर्यंतची नायक-नायिकेची पृथक् विरहावस्था वर्णन केल्यानंतर चौथ्या 'स्निग्धमधुसूदन' या सर्गांत कवीनें, राधेनें कृष्णाकडे पाठविलेल्या दूतीची कामगिरी वर्णिली आहे. आठव्या प्रबंधांत राधेच्या विरहामुळें खिन्न झालेल्या कृष्णाची सखी भेट घेते व माधवाला सांगते की "सा विरहे तव दीना" राधा तुझ्या विरहानें दीन झालेली आहे. यांतील सहाव्या श्लोकांत सखी वर्णन करते,—"कृष्णवियोगानें सुधानिधी चंद्रदेखील तनुदाह करतो." हें अतिशयोक्ति अलंकाराचें उदाहरण होय. यानंतरच्या श्लोकांत राधेचें वर्णन करतांना एका ओळींत एकाच वेळीं सहा क्रियापदांचा उपयोग केला आहे, तो असा— विलपति, हसति, विषीदति, रोदिति चंचति, मुंचति तापम्—

येथें दीपक अलंकार आहे. पांच श्लोकांतील नवव्या प्रबंधांत राधेची स्थिति दूतीनें कृष्णापाशीं जाऊन "राधिका तव विरहे केशव" या सुंदर अष्टपदींत सांगितलेली आहे. या प्रबंधांत जयदेवानें उत्का किंवा उत्कंठिता नायिकेचं सुंदर चित्र रेखाटलें आहे. मेघप्रियाचा संकेत नायक पाळीत नाहीं म्हणून त्याच्या न येण्याच्या कारणाचा विचार करत असलेली नायिका म्हणजे उत्कंठिता नायिका होय. राधा ही कृष्णविरहानें क्षीणशरीर झालेली आहे व अश्रुपूर्ण नेत्रांनीं कृष्णाच्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे. या वेळीं तिची मान किंचित् एका बाजूला कललेली आहे व तिनें आपल्या गालाला हाताचा आधार दिलेला आहे. यामुळें जणूं संध्याप्रकाशांत दिसणारी द्वितीयेची चंद्रकोरच दिसते आहे अशी कविकल्पना. या सर्गाच्या शेवटच्या फुटकळ श्लोकांत उपेंद्रवज्रा, पुष्पिताग्रा शब्दांना त्याच वृत्तांतील श्लोकांत प्रयोग केला आहे.

पांचव्या सर्गाचें नांव 'साकांक्ष पुंडरिकाक्ष' त्यांत कृष्ण सखीजवळ राधेकरितां म्हणून निरोप सांगतो व सखी तो निरोप राधेला कळविते. तो निरोप दहाव्या प्रबंधांत आहे. "तव विरहे वनमाली सखि सीदति" असें त्या निरोपाचें आकुण कडवें आहे. कृष्ण, ज्यांत राधेचें नांव आहे असें राध (वैशाख) हें महिन्याचें नांव लोकांनीं उच्चारल्याबरोबर, कान लावून ऐकतो. त्याची स्थिति एखाद्या तपस्व्याप्रमाणें झाली आहे. हें त्या निरोपाचें सार असतें. हा निरोप सांगितल्यावर सखी राधेला म्हणते 'तो वनमाळी यमुनातीरावर वास करीत आहे तर तू वेळ न घालवितां ताबडतोब यमुनातीरावर जा. या अकराव्या प्रबंधांत जयदेवानें अभिसारिका नायिकेचें वर्णन केलेलें आहे. अभिसारिका स्त्रीचें लक्षण असें सांगितलें आहे: जी स्त्री लज्जा सोडून तारुण्याच्या मदानें आपल्या प्रियकराकडे संकेतस्थळीं जाते अशी स्त्री.

सखी राधेला म्हणते 'कृष्णाकडे तूं अभिसारिकेच्या वेषानें जा. कृष्ण वेणुवादन करीत आहे व त्यांतच संकेताप्रमाणें तुझ्या नांवाची साद घालीत आहे. झुणझुणु शब्द करणारे ते नूपुर तूं काढून टाक, नीलवस्त्र तूं परिधान कर आणि अंधकारानें युक्त अशा सांकेतिक लताकुंजांत तूं प्रवेश कर. चल, आटप. श्रीकृष्ण अभिमानी आहे. अभिसारणेचा क्षण फार रम्य असतो (रम्योभिसारक्षणः). यानंतर सखी राधेला एका कुंजांत घेऊन जाते व तिला तेथेंच ठेवते. इतकें झाल्यावर सखी श्रीकृष्णाकडे जाऊन तिचें वर्णन करते. सहाव्या सर्गांत एकच प्रबंध आहे. आणि त्यांत वासकसज्जा नायिकेचें वर्णन आहे. अलंकार घालून प्रियकराच्या स्वागतास सज्ज झालेल्या प्रणयिनीस वासकसज्जा नायिका असें म्हणतात. सखी कृष्णाला सांगते कीं, "नाथ हरे सीदति राधा आवासगृहे।" राधा संकेतस्थानीं जाऊन बसली आहे व चारी दिशांकडे भिरभीर पहात आहे. उत्साहानें कृष्णाकडे निघाली असतां वाटेंत मूर्छित पडते व शुद्धीवर आल्यानंतर कृष्ण आला नाहीं हें समजल्यामुळें ती विलाप करतें आहे. हा बारावा प्रबंध नादमाधुर्याच्या दृष्टीनें अति सुन्दर असा वठला असून फारच गोड आहे.–भवति विलंबिनि विगलित लज्जा। विलपति रोदिति वासकसज्जा॥ या सर्गाचें नांव 'धन्यवैकुंठ' असें आहे.

सातव्या 'नागर–नारायण' नांवाच्या सर्गांत संकेत स्थळीं श्रीकृष्णाची वाट पहात बसलेली राधा कृष्ण न आल्यामुळें निराश होते त्याचें वर्णन आहे. यांतील तेराव्या प्रबंधांत विप्रलब्धा नायिकेचें वर्णन आहे. प्रियकरानें संकेत न पाळल्यामुळें फसलेली अशी जी नायिका असते तिला विप्रलब्धा नायिका म्हणतात. या सर्गाचे सुरुवातीसच दोन श्लोक चंद्रोदयावर्णनासाठीं योजले आहेत. वर्णन मनोहर असेंच आहे. त्यांत चंद्रावरील डागांवर सुन्दर उत्प्रेक्षा आहे. श्रीकृष्णाकडे अभिसारिकांचे वेषांत जाणाऱ्या गोपींचा मार्ग चंद्रप्रकाशानें अडवला म्हणून चंद्राला पातक लागलें आणि तें पातकच चंद्र जणूं कांहीं त्याच्यावरील कलंकाचे रूपानें धारण करीत आहे अशी कल्पना आहे. तेरावा प्रबंध वाचतांना बाणाच्या कादंबरींतील, महाश्वेतेची वाट पहाणाऱ्या पुंडरिकाची आठवण होते. राधा म्हणते, "कृष्ण इकडेच येत आहे असें सांगून मला विनाकारण सखीनें फसविलें आहे; आतां मी कुणाला शरण जाऊं?" "यामि हे कमिह शरणं" हें ध्रुपद "वद जाऊं कुणाला" पदाचें पूर्वज तर नसेल? या प्रबंधांतही नादमाधुर्य सुंदर साधलें आहे. यानंतरच्या चौदाव्या व पंधराव्या प्रबंधांत राधा म्हणते, "कृष्ण इतर गोपींशीं रासक्रीडा करीत असेल." या वेळीं कृष्णाच्या रासक्रीडेचें वर्णन आहे. याच ठिकाणीं जयदेवानें स्वतःचें वर्णन 'कवींचा राजा', 'कविनृप' असें केलेलें आहे.

ती रात्र संपते. दुसऱ्या दिवशीं सुप्रभातीं कृष्ण राधेकडे येतो व तिची क्षमा मागतो; तरीपण राधा त्याची कानउघाडणी करते व मला आणखी फसवूं नकोस, असें सांगून त्याला परत पाठविते. हा भाग 'विलक्ष्यलक्ष्मीपति' नांवाच्या आठव्या सर्गांत आला आहे. यांतील सतराव्या प्रबंधांत राधेनें काढलेली कृष्णाची खरडपट्टी आहे. कृष्णाचें, राधा वक्रोक्तिपूर्ण असें वर्णन करते. यांत 'खंडिता नायिका' हिचें वर्णन आहे. पतीचें प्रेम एकनिष्ठ नसल्याचें कळून आल्यावर रुष्ट झालेल्या नायिकेस 'खंडिता नायिका' असें म्हणतात. पहिल्या सात सर्गांतील कथा एकाच रात्रींत घडते. आठवा सर्ग दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सुरू होतो. यासाठींच जयदेवानें सातवा प्रबंध भैरव रागांत रचला आहे. यावरून कवीचें संगीतविषयक ज्ञान किती परिपूर्ण होतें याची सहज कल्पना येईल. राधा कृष्णावर इतकी रुष्ट झालेली असते कीं ती त्याला म्हणते, "तूं जसा बाहेरून काळा आहेस तसा अंतर्यामींही काळाच आहेस; नाहीं तर तूं माझी वंचना केलीच नसतीस." राधेनें कानउघाडणी केल्यावर कृष्ण परत जातो. पण राधा मात्र खिन्न होते आणि अशा प्रकारें नंतर विषाद करीत बसणाऱ्या राधेला 'कलहांतरिता' नायिका असें कवीनें संबोधिलें आहे. तिचें वर्णन नवव्या सर्गांत आहे. राधेला तिची सखी या वेळीं म्हणते, "माधवे माकुरु मानिनी मानमये" म्हणजे हे मानिनी, तूं माधवाची अवहेलना करूं नकोस. या नवव्या सर्गाचें नांव मुग्धमुकुंद असें आहे.

दुसरा दिवस तसाच जातो. सायंकाळीं हरि पुन्हा राधेकडे येतो. हें वर्णन 'चतुर चतुर्भुज' या नावाच्या दहाव्या सर्गांत आलें आहे. कृष्ण राधेला म्हणतो, प्रिये चारुशीले, मनांत धरलेली अढी सोडून दे—वगैरे. या सर्गांत मानिनी नायिका दाखविली आहे. यांतील १९ वा प्रबंध वाचतांना व विशेषतः त्यानंतरचा 'मुग्धे विदेहि' हा श्लोक वाचतांना सौभद्र नाटकांतील "नच सुंदरि करु कोपा—" या प्रसिद्ध पदाचें मूळ सांपडल्याचा आनंद होतो. आतां दोन प्रतिभावंत कवींना एकच कल्पना सुचावी हें शक्य आहे. वाङ्मयहारि अण्णासाहेब किर्लोस्कर प्रतिभावंत नव्हते असें त्यांचीं नाटकें वाचलेला रसिक कसा म्हणूं शकेल?

यापुढील अकराव्या 'सानंद दामोदर' या सर्गांत कृष्ण निघून गेल्यावर सखी राधेला तूं कृष्णाकडे जा असें सांगते व राधेला यमुनातीरीच्या कुंजांत घेऊन जाते. हा भाग तीन प्रबंधांत सांगितला आहे. शेवटच्या दोन सर्गांची वेळ दुसऱ्या दिवशीं रात्रीची आहे. सखी राधेला म्हणते की, मदनदूति कोकिळा ही आवाज करून तूं कृष्णाकडे जा, असें सांगत आहे. राधे, तूं अभिसारिकेचा वेष करण्याची जरूरी नाहीं; कारण अंधकारानें तीं सर्व वस्त्रभूषणें तुला दिलीं आहेत. या श्लोकांत सखी राधेला म्हणते, अंधकार "प्रेमहेम निकष" झाला आहे. म्हणजे अंधार हा प्रीतिरूपी सुवर्णाचें निर्मलत्व सिद्ध करणारी कसोटी आहे. ही उपमा फार समर्पक आहे.

शेवटच्या सर्गांत राधाकृष्णांचा विरहकाल संपतो. या सर्गाचें नांव 'सुप्रीतपितांबर' असें आहे. यांत स्वाधीनभर्तृका नायिका—राधा—दाखविली आहे. जी आपल्या पतीला मुठींत ठेवते त्या नायिकेला 'स्वाधीनभर्तृका' म्हणतात. या सर्गाचे शेवटीं जयदेवानें आपल्या आईबापांचीं नांवें सांगितलीं आहेत आणि अखेरच्या श्लोकांत जोंपर्यंत जयदेवाचें हें काव्य जिवंत आहे तोंपर्यंत मधु, साखर, द्राक्षं, अमृत वगैरे कुठल्याहि गोडगोष्टींची ज्याला आवश्यकता नाहीं असें सांगितलें आहे. या श्लोकाचे पडसाद ज्ञानेश्वरांच्या

माझा मऱ्हाटाची बोल कौतुकें
परि अमृतातेंहि पैजा जिंके ।

या ओळींत उठलेले दिसून येतो.

असें आहे थोडक्यांत या काव्याचें स्वरूप. मूर्ति लहान पण कीर्ति थोर अशा वर्गांत पडणारें हें जयदेवाचें काव्य आहे. पाश्चात्य व पौर्वात्य विद्वानांनीं आणि कवींनीं हें काव्य एकमुखानें वाखाणलें आहे. डॉ. कीथपासून भारताचार्य वैद्यांपर्यंत पंडितांनीं आणि गटेपासून टागोरांपर्यंत महाकवींनीं या काव्याला मोठें स्थान दिलें आहे. या काव्याचीं अनेक भाषांत भाषांतरें, रूपांतरें झालेलीं आहेत. इंग्रजी भाषेंतील जोन्स व एडविन ऑर्नाल्ड यांचीं भाषांतरें प्रसिद्ध आहेत. १९४७ सालीं जॉर्ज कीट यांनीं एक सुंदर इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केलें आहे. या भाषांतराचें वैशिष्ट्य म्हणजे स्वतः कीट यांनीं प्रसंगानुरूप चित्रें काढिलीं आहेत. आतां या भाषांतरांत मूळचें संस्कृत भाषेंतील नादमाधुर्य तितकेंसें उतरूं शकलें नाहीं, पण काव्य चांगलें साधलें आहे. आतां समासप्रचुर संस्कृत भाषेंतील नादमाधुर्य भाषांतरांत जसेंच्या तसें उतरविणें हें कठिण आहे पण भारताचार्य वैद्यांच्या मतें Rucaort या जर्मन पंडितानें केलेलें गीतगोविंदाचें भाषांतर बरेंचसें मुळास धरून आहे. कारण जर्मन भाषेंत समास करतां येतात. मराठींत अगदीं जुनें असें भाषांतर म्हणजे भावाचार्य अष्टपुत्रे यांनीं १८५० मध्यें केलेलें आहे असें सांगतात. त्याची प्रत मला पहावयास मिळाली नाहीं. पण त्याचा उल्लेख चेतोहरदेव (प्रा. पाटणकर) यांनीं १८८८ सालीं प्रसिद्ध केलेल्या प्राकृत समश्लोकी भाषांतराचे प्रस्तावनेंत सांपडला. त्यानंतर १९११ सालीं अनंततनयांनीं 'महाराष्ट्रतात्पर्य अर्थासह' प्रसिद्ध केलेलें गीतगोविंद पुस्तक आढळून येतें. आणखी एक उल्लेखनीय विशेष भाषांतर म्हणजे डॉ. श्रीखंडे यांचें 'सुश्लोक गोविंद' हें होय. तसेंच रसिकप्रिया व रसमंजरी या दोन संस्कृत टीका यावर आहेत.

आतां ह्या काव्यानें विद्वानांना व कवींना कां मोहिनी घातली? काय बरें याच्यांत असे गुण आहेत?

प्रथमतः या काव्याची रचना फार बांधेसूद आहे. कवीनें उंच दर्जाचें रचनाकौशल्य प्रकट केलें आहे. कलाकृतीच्या यशस्वीपणाला आवश्यक असणारा स्थल, काल व कृति यांचा सर्वांगसुंदर मेळ या काव्यांत आपल्याला आढळतो. यमुना नदीच्या तीरावरील कुंजवनांत या काव्यांतील प्रसंग (Action) घडतात. सबंध काव्याच्या कथानकाचा काल फक्त छत्तीस तासांचा आहे. कथानकाची सुरवात वसंतऋतूतील मेघाच्छादित रात्रीं होते. पहिल्या सात सर्गांतील प्रसंग या रात्रींत घडतात. आठव्या सर्गाचे वेळीं दुसऱ्या दिवसाची सकाळ झालेली असते. दहाव्या, अकराव्या व बाराव्या सर्गांतील प्रसंग दुसऱ्या दिवशीं रात्रीपासून तिसऱ्या दिवसाच्या सकाळपर्यंत घडतात. आतां यांतील कथाभाग म्हणजे राधाकृष्णांचा विरह व मीलन होय. हा भाग फक्त तीन पात्रांच्या मदतीनें वर्णिला आहे. अशा रीतीनें काव्याचा परिणाम एकमेव होतो. तो काय तो आपण पुढें पाहूं.

या काव्याचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे यांतील विषय—राधाकृष्णाचें प्रेम. मनुष्याच्या आदिभावनांपैकीं प्रेम ही भावना असल्यानें त्या विषयावरील वाङ्मय मनाची पकड घेतें. या काव्यांत प्रणयाच्या सर्व छटा आहेत. अनुराग, विरह, उत्कंठा, प्रेमकलह, मीलन! फक्त निराशा व चिरविरह यांखेरीज गडकऱ्यांनीं सांगितलेल्या सर्व अवस्था आहेत. शृंगार हा प्रेमाचा आविष्कार आहे. हें प्रेमाचें बाह्य स्वरूपही या काव्यांत पहावयास सांपडतें.

या विषयाच्या अनुषंगानें जयदेवानें आपल्या प्रतिभासंपन्न लेखणीनें रंगविलेली उत्कंठिता, अभिसारिका, वासकसज्जा, विप्रलब्धा, खंडिता, कलहांतरिता, मानिनी व स्वाधीनभर्तृका या अष्टनायिकांचीं चित्रें फार हृद्य आहेत. काव्य हें बोलकें चित्र आहे व मूक काव्य आहे या इंग्रजी वचनाची प्रचीति येते ती असें काव्य वाचतांना. थोर कवींच्या काव्यांतून अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. या ठिकाणीं शाकुन्तलांत कालिदासानें 'कार्यासैकतलीनहंसमिथुना' या श्लोकांत काढलेल्या मालिनी नदीच्या आसमंताचें शब्दचित्र उद्धृत करण्याचा मोह आवरत नाहीं.

जयदेवाच्या अष्टनायिकांप्रमाणेच त्याच्या अष्टपद्या प्रसिद्ध आहेत. अशा चोवीस अष्टपद्या या काव्यांत आहेत. प्रत्येक अष्टपदी स्वतंत्र आहे. एक एक अष्टपदी म्हणजे भावगीत आहे. यशवंतांच्या जयमंगला काव्याची येथें आठवण येते. पण या दोन काव्यांचे रचनेंत फरक म्हणजे जयमंगलेंत दोन भावगीतांना जोडणारे फुटकळ श्लोक त्यांत नाहींत. या अष्टपद्या नादमाधुर्यामुळें सहज तोंडांत बसतात. त्यांची खरी गोडी त्या तालासुरांत गायलेल्या ऐकण्यांतच आहे. अष्ट-

अनुक्रमणिका

पद्यांचीं ध्रुपदें फार सुंदर आहेत. त्यांची कल्पना वेदांतील ऋचांवरून घेतली असण्याचा संभव आहे. खाडिलकरांच्या कांहीं पदांचीं तीं फार छान आहेत. त्याप्रमाणेंच या अष्टपद्यांचीं ध्रुपदें फार सुंदर आहेत.

जयदेव हा केवळ कवीच नव्हता तर तो संगीतज्ञहि होता. प्रत्येक अष्टपदीवर त्यानें राग व ताल दिलेला आहे. याबाबतींत मराठी कवींत कविवर्य तांबे यांच्या कविता दृष्टीपुढें येतात.

जयदेवाच्या काव्याचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील भाषासौंदर्य व नादमाधुर्य. हें काव्य अत्यंत प्रासयुक्त आहे. संस्कृत भाषेंत समासाची सोय असल्यानें हें नादमाधुर्य कवीला साधलें. यामुळेंच हें काव्य डॉक्टर कीथ यांच्या मतें उत्कृष्ट आहे. कारण त्याचें भाषांतर करणें अशक्य आहे. या दृष्टीनें पहातां बर्नार्ड शॉ यांचीं नाटकेंही भाषांतर करण्यास कठिण आहेत. जयदेवाचें काव्य बऱ्याच अंशीं दीर्घ समासानें युक्त अशा गौडी रीतींत आहे. बाणाची कादंबरी याच शैलींत आहे. पण पुष्कळ ठिकाणीं सोप्या शब्दांत प्रसादयुक्त वर्णन करणारी म्हणजे कालिदासाप्रमाणें वैदर्भी रीति पण गीतगोविंदांत आढळते. अशा रीतीनें संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनीं काव्याचे जे तीन मुख्य गुण ओज, प्रसाद व माधुर्य सांगितले आहेत ते सर्व जयदेवाचे काव्यांत सांपडतात. त्यांतल्या त्यांत पदलालित्य हेंच जयदेवाच्या शैलीचें वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल. शब्दाच्या नादांतून अर्थप्रतीति करून देणें हें महाकवीचें काम होय. "येरा गबाळ्याचें काम नोहे." इंग्लंड-मधील महाकवि मिल्टन 'पैराडाईज लॉस्ट' (स्वर्गच्युति) या काव्यांतहि हा गुण कांहीं जागीं आढळतो. नादमाधुर्याबरोबरच जयदेवाची भाषा अलंकारानें नटलेली पण आहे. थोडक्यांत म्हणजे पायांत नूपुर घातलेल्या अभिसारीके प्रमाणें जय-देवाची शैली आहे—नादमधूर, आकर्षक व रसमय!

जयदेवाची रसवंती हवा लागेल अशी आहे; म्हणूनच कीं काय, तिच्या प्रत्येक कपोलांवर एकेक गालखोर आहे.

जयदेवाचा पहिला दोष म्हणजे अफाट आत्मश्लाघा! कालिदासाच्या विनयाशीं तुलना करतां ही कवीची आत्मस्तुति औचित्यपूर्ण वाटत नाहीं. या छोट्याशा काव्यांत 'जयदेव' हें कवीचें नांव सुमारें अठ्ठावीस वेळां आलें आहे. स्वतः कवि आपला उल्लेख 'कविनृप' 'कवि-राजराज' अशा शब्दांनीं करतो व शेवटच्या श्लोकांत तर जगांतील सर्व गोड वस्तू आपल्या काव्यापुढें त्याज्य आहेत असे उद्गार कवीनें काढले आहेत!

या काव्यांतील दुसरा दोष म्हणजे त्यांतील सदभिरुचीचा भंग करणारी वर्णनें. त्या दोषांचें समर्थन करणें शक्य नाहीं. म्हणून कांहीं आवृ-त्तींत वर्णनांना कात्री लावलेली आहे. आणि म्हणूनच चेतोहरांनीं त्यांना 'संस्कृत लावण्या' म्हटलें आहे तें योग्यच आहे.

आतां हे दोष गुणांच्या मानानें कमी असल्यानें ह्या काव्याचा गुणगौरवच अधिक होतो.

शेवटीं एकच प्रश्न उरतो, तो म्हणजे हें काव्य-लिहिण्यांत कवीचें उद्दिष्ट काय? या काव्यांतील मुख्य रस कोणता—शृंगार कीं भक्ति? हाहि प्रश्न निर्माण होतो.

जयदेवानें याचें उत्तर काव्याच्या सुरुवाती-सच देऊन ठेवलें आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणें ज्यांचें मन हरिभक्तींत रंगून जातें व ज्यांना विलासकलाबद्दल कुतूहल आहे त्यांनीं हें मधुर लालित्यपूर्ण काव्य ऐकावें. त्यानंतर बाराव्या सर्गांतील अखेरच्या एका श्लोकांत कवीनें असें सांगितलें आहे कीं, या काव्यांत जयदेवाचें संगीतनैपुण्य, विष्णुभक्ति व शृंगाररसाचा विवेक पहावयास मिळेल. हें झालें जयदेवाचें म्हणणें.

आतां आपल्याला हें काव्य वाचून जयदेवा-विषयीं काय वाटतें तें पाहूं. संबंध काव्य वाचल्या-वर जयदेव हा एक थोर कवि, रसिक, संगीततज्ज्ञ होता, तो सौंदर्याचा भोक्ता होता, असें वाटतें. गीतगोविंदांतील अष्टनायिकांच्या वर्णनांत, वसंत ऋतूच्या वर्णनांत किंवा राधा व कृष्ण यांचीं शृंगारचित्रें रंगवितांना वाचकाला जयदेवाची सौंदर्यदृष्टि दिसून येते. त्याच्या काव्यांत असुंदरतेला जागा नाहीं. या बाबतींत इंग्रजी कवि कीट्स् (Keats) याच्याशीं त्याची तुलना करतां येईल. कीट्सप्रमाणें "Beauty is truth and truth beauty" म्हणजे सौंदर्य हें सत्य आहे व सत्य हें सौंदर्य आहे असा जयदेवाचा विश्वास होता. आतां जयदेव हा कृष्णभक्त होता. तेव्हां राधा-कृष्णांचें मीलन म्हणजे जीव किंवा आत्मा याची परमात्माप्राप्तीविषयींची तळमळ. आणि जय-देवाच्या दृष्टीनें तेंच अंतिम सत्य होतें. ही गोष्ट या काव्याच्या अनेक प्रबंधांत त्यानें स्पष्ट केली आहे. जयदेवाच्या काव्यप्रकृतींत रसिकतेचा व कृष्णभक्तीचा, भोगाचा व त्यागाचा असे दोन्ही प्रवाह दिसून येतात. त्यामुळें गीतगोविंदकार, कलेच्या भक्तीबरोबर, भक्तीच्या कलेलाहि विसरला नाहीं असें दिसतें. आणि म्हणून शृंगार व भक्ति हे दोन रस प्रामुख्यानें त्याच्या काव्यांत आढळतात. आतां भक्ति हा स्वतंत्र रस मानावयाचा कीं नाहीं हा प्रश्न निराळा. पण दोन्ही रसांचा स्थायीभाव माझ्या मतें रति हाच आहे. भक्तिरसांत परमेश्वराचे ठिकाणीं भक्ताची रति किंवा प्रेम असतें. 'रूप पाहतां लोचनीं सुख झालें हो साजणी—' ही ओळ काय दाखविते? हें मत कुणास पटो वा न पटो, गीतगोविंदाच्या बाबतींत एक गोष्ट निश्चित आहे कीं, या काव्यांत भक्ती आणि शृंगार दोन्हींही आहेत. जसा ज्याचा दृष्टिकोण असेल, जशी ज्याची श्रद्धा असेल तसा त्यानें रसास्वाद घ्यावा. पण कांहीं म्हणा तरी गीतगोविंद काव्यांतील भाषेचें, विषयाचें, रचनेचें, काव्याचें, संगीताचें आणि प्रणयभावनेचें होणारें सौंदर्यदर्शन कोणत्याहि काळांत विलोभनीय ठरल्यावाचून राहणार नाहीं. कारण सौंदर्य हें सत्यदर्शी तें चिरंजीव आहे.

चंडोलपक्षी आपलें प्रेमगीत गातो तेव्हां म्हणे, कांट्यानें आपल्या उराला जखम करून घेतो.

आपण सर्व असेंच करतो. नाहीं तर आपण गाणार तरी कसे?






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

— घरचीं माणसं तीं अशीं आणि रमेश हा असा !

# अचानक गांठ—

अशा परिस्थितींत जगण्यांत तरी काय अर्थ आहे ?
पण जेव्हां तिची आणि रमेशची
पुन्हां नेहमीप्रमाणें
'अचानक गांठ' पडली तेव्हां—




'जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं,' असं वाटण्याची वेळ प्रत्येकाच्या आयुष्यांत केव्हां ना केव्हां तरी येत असते !

—किनाऱ्यावरच्या वाळूंत पाय पसरून बसलेल्या सुमनच्या आयुष्यांत ती वेळ आज आली होती. आज सुमन साऱ्या जगावर चिडली होती. तिचे आईबाप स्वार्थी होते, बहीण-भाऊ बेअकली होतीं, आणि सर्वांत दुःखाची गोष्ट ही कीं, तिचं ज्याच्यावर निस्सीम प्रेम होतं तो तिचा प्रियकर विश्वासघातकी होता. निदान तिला तरी असं वाटत होतं आणि तिला असं वाटायला कारणंहि पुष्कळ होतीं.

इंटरला नापास होईपर्यंत सुमनच्या वडिलांनीं तिला शिकवलं होतं. सुमन जेव्हां इंटरला नापास झाली तेव्हां अधिक पैसे पाण्यांत न घालतां त्यांनीं तिला रेशनिंग ऑफिसांत चिकटवून दिलं होतं. तिच्या शिक्षणापायीं पैसा खर्च होण्याऐवजीं पैसा घरांत येत होता. नोकरीला लागून तीन वर्षं झालीं तरी तिच्या लग्नाचं ते नांव काढीत नव्हते. तिच्या लग्नानंतर दरमहा शंभर-सव्वाशें रुपयांचं त्यांचं उत्पन्न बुडणार होतं. तिचे वडील स्वार्थी आहेत असं जे तिला वाटत होतं त्याच्यामागे ही जाणीव होती. अधूनमधून तिची आई वडिलांजवळ तिच्या लग्नाचा विषय काढी, पण तोहि इतक्या बेतानं कीं, तात्या तिकडे सहजच दुर्लक्ष करूं शकायचे. मग आईहि गप्प बसायची. सुमन मिळवती झाल्यापासून घरांतल्या माणसांच्या गरजा वाढल्या होत्या. इरकली लुगड्याशिवाय आणि खरवाडी खणाशिवाय आईचं चालत नव्हतं. सुमन मिळवती झाल्यापासून तात्यांनींहि पोषाखांत बदल केला होता. त्यांच्या दीडशें रुपये पेन्शनमध्यें त्यांची गरम सुटाची हौस मारली होती. पण सुमनची नोकरी लागल्यापासून वर्षाच्या आंतच तात्यांनीं स्वतःला गरम सुटांत गुंडाळून घेतलं होतं. मॅट्रिकच्या क्लासमधला बबन बुशकोट आणि नॅरो-बॉटमची पँट याशिवाय बात करीत नव्हता. बेबी हे फक्त

'गेरु' लोकांसाठीं आहेत, असं आजकाल त्याचं मत बनलं होतं. बबनहून दोन वर्षांनीं लहान असलेली सुधा नुकतीच पातळ नेसायला लागली होती. पण तिच्या वर्गातल्यां शरयू कुलकर्णीसारखी जॉर्जेटची साडी हवी म्हणून तिचा हट्ट सध्यां चालू होता. सुमनची नोकरी हाच साऱ्यांच्या सुखांचा उगम होता. जो तो आपापल्या आवडीनिवडीचं कौतुक करण्यांत दंग झाला होता. सुमनकडे कुणाचंच लक्ष नव्हतं, आणि हीच गोष्ट सुमनला दुःखदायक वाटत होती.

सुमनला नोकरी लागल्यानंतर पहिले कांहीं दिवस घरांतलीं माणसं तिच्या कलानं वागत होतीं. पण तात्यांना तें फार दिवस जमेना. त्यांच्यांतला हुकुमशहा त्यांना फार दिवस असं वागूं देईना. 'कारटी कमावती झाली म्हणून काय झालं ? घरांतला कर्ता पुरुष मी आहें. माझ्या संमतीशिवाय घरांतलं पानहि हलतां कामा नयें ' ह्या विचारानेंच सुमनला सगळा पगार दरमहा त्यांच्या स्वाधीन करावला त्यांनीं सांगितलं. आतां मुलगी एवढी मिळवती झाली आहे, म्हणून तिला हातखर्चाला दहा रुपये तात्या काढून देत असत, ही गोष्ट वेगळी. पण कित्येकदां हे पैसे खर्च होण्याआधींच एखाद्या जरूरीच्या कारणासाठीं तिच्याकडून परत घेतले जात. आणि मग एखाद्या दिवशीं सुमनला सिनेमाला जायची लहर आली तर आईच्या मनधरण्या कराव्या लागत. सुमनला हें जिणं नकोसं झालं होतं. पैसे ती कमावीत होती, पण ते खर्च करण्याचा अधिकार मात्र तिला नव्हता.

तिच्या ऑफिसमधला हंसऱ्या चेहेऱ्याचा रमेश राजेंद्र तिचा मित्र होता. त्याला सुमन खूप खूप आवडत होती. (असं त्यानंच पुष्कळदां तिला सांगितलं होतं.) आणि तिलाहि तो आवडत होता. ऑफिस सुटल्यावर ताबडतोब घरीं न जातां सुमन 'रीगल' रेस्टॉरंटमध्यें जायची. थोड्या वेळानं रमेशहि तिथं यायचा आणि मग दोघांची 'अचानक' गांठ पडल्यानंतर तीं फॅमिली-रूममध्यें शिरायचीं. अर्थात् बाहेर पडतांना ऑम्लेटचं बिल रमेश द्यायचा.

'रीगल'मधून बाहेर पडल्यानंतरही ताबडतोब घरीं जावंसं सुमनला वाटत नसे. घरीं जाऊन तरी काय करायचं ? तात्या चोवीस तास घरांतच बसलेले असायचे. आणि घरांतल्या बारीकसारीक गोष्टींत डोकं खुपसून विनाकारण आरडाओरडा करायची त्यांना सवय होती. अगदीं क्षुल्लक चूकसुद्धां तात्यांचं डोकं फिरायला कारणीभूत व्हायची. सबंध दिवसांत एकदांही तात्या रागावले नाहींत असं कधींहि झालं नव्हतं. सबंध दिवसांत एकदांही रागवायला संधि मिळाली नाहीं, तर तात्यांना चुकल्याचुकल्यासारखं वाटायचं. हा त्यांचा स्वभावच बनला होता. अशा वेळीं ते अस्वस्थ व्हायचे आणि घरांत पिंजऱ्यांतल्या वाघाप्रमाणें फेऱ्या घालीत बाहेरून येणाऱ्या सुमनची वाट बघायचे. सुमन घरांत आली कीं ते ओरडायचे, "किती उशीर हा घरीं यायला ? कुठं गेली होतीस इतका वेळ ?" सुमनला त्यांचे हे शब्द रोज ऐकायची आतां सवय झाली होती. त्यामुळें 'वाटेंत मैत्रीण भेटली' किंवा 'बस लवकर मिळाली नाहीं' किंवा 'ऑफिसांत आज फार काम होतं' असं कांहींतरी पुटपुटत ती स्वयंपाकघरांत निसटायची. रेशनिंग ऑफिसांतल्या मुलींना फार काय पण थोडंसुद्धां काम नसतं, हें तात्यांना माहीत नव्हतं म्हणून बरं. ऑफिसमधल्या मुलींचं काम करण्यासाठीं तरुण कारकुनांमध्यें किती चुरशीची स्पर्धा चालते हें तात्यांना काय माहीत ? त्यामुळें सुमननें सांगितलेल्या सबबीवर तात्यांचा विश्वास बसायचा !

सुमन सरळ मनाची मुलगी होती. आईबापांना असं फसवणं तिला मनापासून आवडत नसे. खोटं बोलण्याचा तिला तिटकारा होता. पण खोटं बोलल्याशिवाय तिला रमेशबरोबर चौपाटीवर गप्पा मारणं कसं शक्य होतं ? आणि तो तर तिचा नित्याचा कार्यक्रम होता. प्रथम सुमन चौपाटीवर जायची अन् ठरलेल्या जागीं वाळूवर पाय पसरून बसायची. थोड्या वेळानं रमेश तिथं यायचा आणि मग त्या दोघांची पुन्हा 'अचानक' गांठ पडायची. आणि मग "अय्या, तुम्ही इकडे कुणीकडे ?" असं म्हणून सुमन आश्चर्य व्यक्त करायची. तिचा हा अभिनय रमेशच्या चांगलाच परिचयाचा झाला होता. त्यामुळें एखाद्या दिवशीं सुमन असं म्हणायचं विसरली तर तिनं तसं म्हटल्याशिवाय रमेश खालीं बसत नसे. सुमनचा तो अभिनय पहाण्याचा हक्क त्यानं स्वाधीन ठेवला होता. त्यांची ठरलेली जागा जरा आडबाजूला होती. त्यामुळें दोघांच्याहि ओळखीचीं माणसं तिकडे फिरकण्याचा फारसा संभव नव्हता.

पण एक दिवस बबन त्याच्या मित्रांसहवर्तमान वर्गातल्या मुलींचा पाठलाग करीत चुकून त्या जागीं येऊन पोहोंचला. त्यानं सुमनला अन् तिच्या शेजारीं बसलेल्या रमेशला पाहिलं. पण सुमनच्या दृष्टीला न पडतां तो मागच्या मागें सटकला. बबन त्या वेळीं जरी कांहीं बोलला नसला तरी त्याची फाजील जिज्ञासा त्याला स्वस्थ बसूं देईना. रात्रीं सर्वजणं जेवायला बसलीं असतांना शक्य तितकी भाबडी मुद्रा करून बबननं विचारलं, "ताई, आज चौपाटीवर तुझ्याबरोबर तो कोण ग होता ?"

प्रश्न साधाच होता आणि बबननं तो अगदीं 'सहजच' विचारला होता. पण तात्या एकदम दचकले. सुधा सुमनकडे पहायला लागली.

आईच्या हातांतला घांस हातांतच राहिला. सुमनचे गाल लाजेनं लाल झाले. आणि हा सगळा अनर्थ करणारा बेअक्कली कार्टा बबन शांतपणें जेवत होता.

सुमननं झटकन् स्वतःच्या चेहऱ्यावरचे भाव लपवले अन् एखादी अगदीं क्षुल्लक गोष्ट सांगावी इतक्या सहजतेनं तिनं म्हटलं,

"तो होय? अरे तो आमच्या ऑफिसमधला एक क्लार्क आहे. सहज भेटला तेव्हां बोलत होता चार शब्द!"

तिनं असं हें म्हटलं खरं; पण नंतर तिचं तिलाच, आपल्याला हें किती सहजपणें बोलतां आलं, याचं आश्चर्य वाटायला लागलं. नंतर तिला बबनचा राग आला. केव्हां, कुठें, काय बोलावं ह्याची त्याला अक्कल नाहीं, बेअक्कली कुठचा! पण बबनला शिव्या देण्यांत अर्थ नव्हता. मग ती स्वतःवरच चरडली. तेवढ्यांत सुधानं तिला विचारलं, "कसा ग आहे तो?"

—सुधाचा हा प्रश्न ऐकतांच तात्यांनीं कान टवकारले. आईनं मान वर उचलली आणि पाणी पिण्यासाठीं उचललेलं फुलपात्र बबननं खालीं ठेवलं. आतां मात्र सुमन चिडली. जणूं काय तिच्याविरुद्ध आज साऱ्यांनीं एक टारला भरला होता आणि त्यांत तिची उलट तपासणी चालली होती! खरोखर या सुधालाहि कांहीं अक्कल नाहीं! आतां हा प्रश्न विचारण्याची काहा जरूर होती? बबन आणि सुधा ह्या दोन्ही मूर्खांना कधीं अक्कल येणार आहे, देव जाणे!

पण नुसतं असं म्हणून चालण्यासारखं नव्हतं. प्रश्नाचं उत्तर देणं आवश्यक होतं. मग तिनं सुधाला उलट विचारलं, "कसा म्हणजे काय ग?"



"कसा म्हणजे दिसायला कसा आहे—" सुधानं स्पष्टीकरण केलं.

"शी! दिसायला काळा आहे, बुटका आहे!" सुमननं सांगायला सुरुवात केली. "जाडा आहे, तोंडावर देवीचे वण आहेत, चष्मा लावतो, धोतर नेसतो, कोट घालतो. आणखी कांहीं माहिती हवी का?"

"हो." सुधा चावटपणानं म्हणाली, "त्याचं वय नाहीं सांगितलंस तूं?"

"असेल चाळीस-पंचेचाळीस!" सुमन शांतपणें म्हणाली.

वयाचा आंकडा ऐकून आईनं सोडलेला निःश्वास सुमननं ऐकला. इतक्या कुरूप नि वयस्कर माणसावर सुमन प्रेम करणं शक्य नाहीं, ह्या कल्पनेनं तात्याहि स्वस्थपणें जेवायला लागले. पण सुमननं केलेलं वर्णन ऐकून बबनला मात्र आपले डोळे डॉक्टरकडून एकदां नीट तपासून घ्यावेसें वाटलें. 'म्हणजे, आपल्या डोळ्यांनीं आपल्याला फसवलं कीं काय? इतका कुरूप आणि वयस्कर असलेला माणूस आपल्याला सुन्दर नि तरुण कसा दिसला बुवा?'—बबनच्या मनांत विचार आला. पण तो अधिक कांहीं बोलला नाहीं. ह्या प्रकरणांत अधिक बारकाईनं लक्ष घालून सविस्तर माहिती मिळाल्याशिवाय बोलायचं नाहीं असं त्यानं ठरवलं. पण बबनला अधिक बारकाईनं लक्ष घालायचा 'चान्स' मिळाला नाहीं. कारण त्या दिवसापासून सुमन सावध झाली आणि तिनं 'अचानक भेट' होण्याचं ठिकाण बदललं.

—पण सुमनच्या आणि रमेशच्या प्रेमाला गेल्या आठवड्यापासून कुणा तरी मेल्याची दृष्ट लागली होती! त्याशिवाय तिच्यावर प्राणापेक्षांहि जास्त प्रेम करणारा रमेश असा वागला नसता. रमेशच्या प्रेमाची आठवण झाल्याबरोबर रमेशनें तिच्यावर लिहिलेल्या एका कवितेची सुमनला आठवण झाली. त्या कवितेंत त्यानं सौंदर्याचं अतिरिक्त वर्णन केलं होतं. शेवटच्या दोन ओळींत तर त्यानं कळसच केला होता,—

"रंभा, मेनका, उर्वशी लाजल्या तुझ्या रूपाला,
त्यांनींच सुमन तुझा सौंदर्य-रस चोरला!"

सुमन दिसायला आकर्षक होती यांत शंका नाहीं. पण सुमनच्या घरीं आरसा होता, त्यामुळें स्वतःच्या रूपाची तिला योग्य ती जाणीव होती. तरीहि रमेशनं लिहिलेली कविता तिला आवडली होती. त्या कवितेनं तिला गुदगुल्या केल्या होत्या, तिला क्षणभर सुखविलं होतं अशी कविता लिहिणाऱ्या रमेशनं गेल्या आठवड्यापासून विचित्र रीतीनं वागायला सुरुवात केली होती, आणि सुमनच्या दुःखांत त्यामुळेंच आणखी भर पडली होती. ज्याच्यावर आपण निस्सीम प्रेम केलं त्यानं दुसऱ्या तरुणीबरोबर सिनेमाला जावं, ह्यापेक्षां जगांत अधिक दुःख कोणतं असेल? आणि ज्याला आपण हिरा समजलो तो एक कांचेचा तुकडा आहे हें कळल्यानंतर जगण्यांत तरी काय अर्थ होता!

ऑफिसांत सुमनचं आणि रमेशचं टेबल समोरासमोर होतीं. त्यामुळें रमेशच्या बारीकसारीक हालचालींवरसुद्धां सुमनला सहज नजर ठेवतां येत असे. रमेशच्या शेजारीं नलिनी देशपांडेचं टेबल होतं. इथपर्यंत सारं ठीक होतं. पण गेल्या आठवड्यापासून नखरेल नलू देशपांडे काम करतां करतां मान वांकडी करून तिरप्या नजरेनं रमेशकडे पहायला लागली होती. कामं करतांना आलेल्या शंका, अडचणी रमेशला विचारीत होती. हें तर कांहींच नाहीं, पण कित्येक वेळां त्याच्याकडे पाहून गालाला खळी पाडत होती. गोष्ट मेली!

तिचं हें वागणं सुमनला सहन होणं शक्यच नव्हतं, आणि म्हणूनच ती अस्वस्थ झाली होती. पण नलू जरी अशी वागली तरी रमेशनं तिला उत्तेजन द्यायला नको होतं. गेल्या बुधवारीं तर कळसच झाला होता. त्या संबंध दिवसांत नलूनं एकशें त्रेपन्न वेळां रमेशकडे पाहिलं होतं. रमेश नुसता पुरुषच नव्हता तर तरुण पुरुष होता. तेव्हां त्याला विरघळायला कितीसा वेळ लागणार?

बुधवारच्या साडेसहाच्या 'शो'चीं दोन तिकिटं रमेशनं आधींच काढून ठेवलीं होतीं. एक तिकीट त्याच्यासाठीं अन् दुसरं सुमनसाठीं! ऑफिस सुटायला अर्धा तास अवकाश होता तेव्हां रमेशनं घाईघाईनं एका कागदावर दोन ओळी खरडल्या. डिंकानें चिठ्ठी बंद केली अन् वरती तांबड्या शाईनं 'अर्जंट' असा शेरा मारून शिपायाबरोबर त्यानं ती सुमनकडे पाठविली. सुमननं चिठ्ठी उघडून वाचली, "आज संध्याकाळीं 'बरसात'ला येशील का? तिकिटं काढलेलीं आहेत."—हा 'अर्जंट' मजकूर त्यांत होता. सुमनला जावंसं वाटलं. पण घरीं सांगितलेलं नसतांना ती सिनेमाला गेली असती तर तात्यांनीं आकाश पाताळ एक केलं असतं. तात्यांचा रागीट चेहरा तिच्या नजरेपुढें उभा राहिला आणि अत्यंत द्विधा मनःस्थितींत सुमननं उत्तर पाठवलं, "सॉरी! घरीं सांगितलेलं नाहीं, त्यामुळें येऊं शकत नाहीं. तिकिटं दुसऱ्या कुणाला तरी देऊन टाक. आपण उद्यां जाऊं." पण सुमनचा हा सल्ला रमेशनं मानला नाहीं. त्याला त्याच दिवशीं 'बरसात' पहायची हुक्की आली होती. त्यानं शेजारीं बसलेल्या नलूला तोंच प्रश्न विचारला. आणि ती तावडतोब तयार झाली. संध्याकाळीं ऑफीस सुटल्यानंतर त्या दोघांना बरोबर जातांना सुमननं पाहिलं, तेव्हां तिच्या हृदयांतले रेशमी धागे तटातट तुटले. तिला खूप खूप कुणाशीं तरी भांडावंसं वाटलं. तिला रमेशचा संताप आला. त्याहिपेक्षां नलूवर ती फार भडकली. रमेशबरोबर सिनेमाला जाण्याचा तिला काय अधिकार होता? आणि रमेशनंहि तिला सिनेमाला नेऊन तिच्या तशा वागणुकीला उत्तेजन देण्याचं काय कारण होतं? दिवसांतून एकशें त्रेपन्न वेळां मान वांकडी करून रमेशकडे पहाण्याची नलूची तपश्चर्या फळाला आली होती, दुसरं काय? इतरांपेक्षां रमेश वेगळा आहे असं सुमनला वाटत होतं. पण अखेरीस तो आपल्या जातीवरच गेला होता. स्त्रियांपेक्षां पुरुषच अधिक चंचल असतात!

सिनेमा-प्रकरणानं सुमनचं मन फार दुखावलं होतं. दुसऱ्या दिवशीं तिला रमेशनं त्याची भूमिका स्पष्ट करणाऱ्या तीन चिठ्ठ्या पाठवल्या. पण एकहि चिठ्ठी सुमननं वाचली नाहीं. त्याच्या देखत चिठ्ठ्यांचे तुकडे करून सुमननं बास्केटमध्यें टाकले. हें पाहून रमेशहि चिडला आणि त्यानं स्वतःचं टेबल सुमनच्या देखत नलूच्या टेबलाकडे सरकवलं. पण एवढ्यावर तो थांबला नाहीं. ऑफिस सुटल्यानंतर नलूला बरोबर घेऊन तो 'रीगल' मध्यें गेला. तेंच रेस्टॉरंट, जिथें अनेक वेळां सुमननं रमेशबरोबर ऑम्लेट खाल्लं होतं! आतां मात्र सुमनच्या दुखावलेल्या कोमल भावनांनीं टोकांत कैफ. प्रेमभंग म्हणतात तो ह्यापेक्षां अधिक काय वेगळा असणार? आणि प्रेमभंग झालेली माणसं आत्महत्या कां करीत असतात, हें सुमनला आतां पटलं. आज ऑफिस सुटल्यावर तिची पावलं 'रीगल' ऐवजी समुद्राकडे वळलीं.

—घरचीं माणसं ती तशीं, रमेश हा असा! अशा परिस्थितींत जगण्यांत तरी काय अर्थ होता? किनाऱ्यावरच्या वाळूंत पाय पसरून बसलेल्या सुमनचं मन ह्या एकाच विचारानं व्यापलं होतं. समुद्राच्या लाटांकडे ओघावलेल्या नजरेनं सुमन बघत होती. असा किती वेळ गेला कुणास ठाऊक!......

......समुद्राच्या पाण्यानं सुमनची साडी भिजली तेव्हां तिला फार वाईट वाटलं. ती तिची फार फार आवडती साडी होती. पण जीव द्यायचा म्हटलं म्हणजे साडी भिजणारच, त्याला इलाज नाहीं! गुडघाभर पाण्यांतून सुमन कमरेइतक्या पाण्यांत शिरली. नंतर मग एक प्रचंड लाट आली आणि त्या लाटेनं सुमनला समुद्राच्या अंतरंगांत ओढून नेलं. सुमनच्या नाकातोंडांत पाणी जाऊन तिचा जीव गुदमरला. तिनं डोळे मिटले. तशा स्थितींतच ती खोल खोल जायला लागली. इतक्यांत कुणी तरी तिच्या कमरेभोंवतीं हाताचा विळखा घातला आणि नंतर तिला अलगद दोन हातांवर उचलून धरलं. काय होत आहे हें कळण्याआधींच कुणाच्या तरी ओलसर ओठांचा तिच्या नाजुक ओठांना स्पर्श झाला. त्या चुंबनानं सुमनचं अंग एकदम शहारलं. तिला रमेशची आठवण झाली. एकदां 'रीगल'मध्यें रमेशनं तिचं असंच अचानक चुंबन घेतलं होतं आणि त्यावेळींहि तिच्या अंगावर असेच रोमांच उभे राहिले होते. पण हा स्पर्श रमेशचा नव्हता. तिनं डोळे उघडले.

—रत्नजडित मुकुट घातलेल्या एका सुंदर तरुणानं तिला हातांवर उचलून धरलं होतं. होय. तो तरुण रमेशपेक्षां हजार पटीनें अधिक सुंदर होता. त्या परक्या तरुणाच्या हातांतून सुटण्याचा सुमननं प्रयत्न केला. तिच्या धडपडीला तो हंसला. त्याच्या हातांची पकड अधिकच घट्ट झाली.

"कोण तुम्ही?" सुमननं विचारलं. तो हसला. त्याच्या हसण्याबरोबर पुंढर, सतेज, शुभ्र मोती उधळले गेले.

"ह्या सागराचा अधिपति आहें मी- जलदेव म्हणतात मला! तूं फार गोड मुलगी आहेस. अशा मुली फार आवडतात मला. माझी पट्टराणी करणार आहें मी तुला!" तो म्हणाला.

"नको. मला पट्टराणी व्हायचं नाहीं. मला परत जाऊं द्या."

"तुझ्या रमेशपेक्षां मी किती तरी चांगला आहें स्वभावानं, सुंदर आहें दिसायला, श्रीमंत आहें पैशानं. आणि मला तूं फार आवडतेस. तुझ्या रमेशप्रमाणें तुला टाकून नल्लूबरोबर 'बरसात'ला जाणार नाहीं मी. चोवीस तास तुझ्याच तैनातींत राहीन!" जलदेवाचा आवाज मंजुळ होता, मधुर होता. बोलतां-बोलतां सुमनला घेऊन तो खोलवर चालला होता. तो चालला असतांना सारे जलचर अदबीनं शेपट्या वळवून बाजूला होत होते. राजवाड्याजवळ जलदेव थांबला. हातावरच्या सुमनला त्यानं खालीं ठेवलं. पृथ्वीवरचीं माणसं ज्याप्रमाणें हवेंत वावरतात त्याचप्रमाणें जलदेवाचा स्पर्श झाल्यापासून सुमन पाण्यांत वावरत होती. पृथ्वीवरच्या माणसांना हवेचं अस्तित्व जाणवत नाहीं, तसंच तिलाहि पाण्याचं अस्तित्व जाणवत नव्हतं.

जलदेवाचा राजवाडा पारदर्शक होता. सागराच्या तळाशीं सांपडणाऱ्या अमोल रत्नांनीं तो राजवाडा शृंगारलेला होता. दोन मोठाले चमकणारे सोनेरी देवमासे राजवाड्याभोंवतीं पोहून पहारा करीत होते. जलदेवानं हात धरून सुमनला सिंहासनावर बसवलं. इतक्यांत दिवस संपला अन् अंधार पडला. अन् दुसऱ्याच क्षणीं रत्नांच्या प्रकाशानें सबंध राजवाडा उजळून निघाला. निरनिराळ्या रत्नांच्या निरनिराळ्या रंगांच्या प्रकाशानें राजवाड्यांत इंद्रधनुष्याच्या सप्तरंगांची शोभा दिसत होती. इतक्या लवकर दिवस संपलेला पाहून सुमनला फार आश्चर्य वाटलं. तिच्या मनांतला प्रश्न ओळखून जलदेवानं उत्तर दिलं, "तुला आश्चर्य वाटणं साहजिक आहे. कारण तुमच्या पृथ्वीवरचा एक क्षण म्हणजे आमचा दिवस असतो."

जलदेवाच्या राजवाड्यांतल्या स्वर्गसुखांचा उपभोग घेत सुमन तिथें किती तरी दिवस राहिली. तिथें तिला कसलंहि दुःख नव्हतं. तिच्यावर कोणी रागवत नव्हतं. सारेजण तिच्यावर प्रेम करायचे. सारेजण तिच्या आज्ञेंत असायचे. पृथ्वीवर असतांना जें सुख तिनं स्वप्नांतसुद्धां उपभोगलं नव्हतं तें ती इथें उपभोगीत होती. पण लवकरच सुमनला हें सारं सुख नकोसं वाटायला लागलं. तिला तिच्या तात्यांची, आईची, बबनेची, सुधाची, रमेशची, साऱ्यांची तीव्र आठवण यायला लागली. 'कदाचित् आपण नाहीं म्हणून रमेश नल्लूबरोबर रोज सिनेमाला जात असेल', ह्या विचारानें सुमन अतिशय अस्वस्थ झाली. 'छे, कांहींहि करून हें थांबलंच पाहिजे, निदान ह्यासाठीं तरी पृथ्वीवर अवश्य जायला हवं'—ह्या विचारानं तिचं मन व्यापून टाकलं आणि राजवाड्यांतल्या सुखी जीवनांत तिचं मन रमेनासं झालं. ती दुःखी दिसली. तिला तशी दुःखी पाहून कोमल अंतःकरणाच्या जलदेवालाहि फार दुःख झालं. त्याच्या डोळ्यांतून निळे मोती ओघळले.

"सुमाराणी, इथं कसलं दुःख आहे तुला? सांग ना मला!" तो म्हणाला.

"इथल्या सुखांत माझं मन रमत नाहीं. मला माझ्या पृथ्वीवरच्या माणसांची आठवण येतेयू. आणि त्यामुळेंच मला हें सुख नकोसं वाटतंयू!"

"तूं सुखी होण्यासाठीं काय करूं मी?" जलदेवानें विचारलं.

"मला पुन्हा किनाऱ्यावर नेऊन सोडा. माझ्या माणसांच्या सहवासांत मी सुखी होईन." सुमननं सांगितलं.

"पण पृथ्वीवर तुला सुख लाभत नाहीं. तुझे तात्या तुझ्या अंगावर ओरडतात, रमेश तुला टाकून नल्लूबरोबर 'बरसात'ला जातो, ह्या गोष्टींत का सुख आहे?"

"आपल्या प्रियजनांशीं झालेल्या कलहांतदेखील जें एक प्रकारचं सुख असतं त्याची तुम्हाला काय कल्पना, जलदेवा? त्यासाठीं पृथ्वीवरच रहायला हवं!"

"जशी तुझी इच्छा!" जलदेव जड अंतःकरणानं म्हणाला. सुमन परत पृथ्वीवर जाणार म्हणून त्याला दुःख झालं होतं. अधिक कांहीं न बोलतां यानं सुमनला अलगद हातांवर घेतलं आणि तो समुद्राच्या पृष्ठभागाकडे येऊं लागला. किनाऱ्याजवळ येतांच त्यानं सुमनचं शेवटचं चुंबन घेऊन आशिर्वाद दिला—

'अष्टपुत्रा सौभाग्यवति भव'...

"आत्महत्या करायचा विचार चाललाय का?" रमेशच्या आवाजानं दचकून सुमन भानावर आली. तिच्यासमोर रमेश उभा होता. त्याच्या चेहऱ्यावर तेंच टाविक मिस्किल हास्य होतं.

"माझ्या आत्महत्येची तुला कां काळजी? मी मेलें तरी तुझी नल्लू आहेच कीं तुझ्याबरोबर सिनेमाला यायला!" सुमन रुक्षपणें म्हणाली. 'तुझी नल्लू' हे शब्द उच्चारतांना तिच्या हृदयाच्या रेशमी धाग्यांना पीळ पडला होता.

"सुमन, माफ कर मला! केवळ तुला चिडवण्यासाठींच मी नल्लूबरोबर सिनेमाला गेलों, 'रीगल'मध्यें गेलों. माझा त्यांत दुसरा कोणताहि हेतु नव्हता. तूं इतकं 'सीरिअसली' घेशील ही मला कल्पना नव्हती."

"म्हणजे, नल्लूवर तुझं खरंच प्रेम नाहीं?"

"नाहीं. नाहीं. नाहीं. आतां कोणत्या शब्दांत सांगितलं म्हणजे तुझा विश्वास बसेल? शब्दाशिवाय दुसरी एकच भाषा मला येते. त्या भाषेंत सांगूं?"

—सुमननं होकार देण्यापूर्वींच रमेशनं तिला जवळ ओढली. सुमननं आजूबाजूला पाहिलं. अंधार पडत चालला होता. त्यामुळें जो तो घरीं जाण्याच्या गर्दींत होता. सुमनकडे कुणाचंहि लक्ष नव्हतं.

—सुमनचं घर जवळ येतांच तिच्या कानाजवळ तोंड नेऊन रमेश कुजबुजला, "उद्यां पुन्हा 'बरसात'! नक्की जायचं हं!"

—सुमन घरांत शिरली. नेहमींच्या सवयीप्रमाणें तात्या सुमनची वाट पहात घरांत अस्वस्थपणें फेऱ्या घालीत होते. सुमन दृष्टीस पडतांच ते ओरडले, "किती उशीर हा घरीं यायला? कुठं गेली होतीस इतका वेळ?"—

—गेलें होते मसणांत—(म्हणजे समुद्रांत या अर्थी) असं सुमनला उत्तर द्यावंसं वाटलं. का नकळे, तात्यांचा तो आवाज—तें घर—तीं घरांतलीं तीं माणसं पाहातांच तिला जलदेव—समुद्र—नल्लू—रमेश आणि पुन्हा समुद्र दिसूं लागला.



# निवृत्ति

चक्रवर्ति योगीयांचा
ज्ञानियांचा ज्ञानेश्वर
आज प्रस्थाना निघाला
होऊनियां व्योमाकार.

डोळां पाणी ये मुक्तेच्या
ऊर फुटे सोपानाचा
रडे ढळाढळा नामा
सुन्न देह निवृत्तीचा.

उभे ठेले चंदनाचे
स्तंभ समाधीभोंवतीं
निरामय निरांजनें
निर्विकल्प आसमन्तीं.

अशाश्वत हें त्यजून
परमार्थी निघे ज्ञाना
फोडी द्वैताचे कबंध
सन्तमंडळीचा राणा.

बावरली मुक्ताबाई
बावरलाहे सोपान
पारमार्थी लोकशाही
पुशी ओलेते नयन.

भरे मुहूर्ताचा घट
शकुनाची होई वेळा
योगीयाला झाला स्नानें
याचा मळवट भरा.

ज्ञानदेवीचा लेखक
आज प्रस्थाना निघाला
मुसमुसे गीताआई
ताल वेदांचा फाटला.

मुक्ताबाई गहिवरे
गहिवरेही सोपान
नामा तर झाला वेडा
जणूं फाटलें अस्मान.

निरामय ज्ञानेश्वर
होतो आहे निराकार
ज्ञानदेव निरन्तन
होतो आहे शुभं कर.

अवघ्या वाहीं दुवळीलें
व्योम, वाटे त्यास आज
लाख भास्करांचीं तेजें
शोभविती त्याची शेज.

अवघ्या भक्तांचा मेळावा
पंढरीची पंचक्रोशी
जमे इंद्रायणीतीरीं
द्याया निरोप प्रभूशी.

एका विशाल ज्योतीला
आज मिळणार ज्योत
लाख तीर्थांचे संगम
इंद्रायणीच्या डोहांत.

दीपनिर्वाणाचा याचा
सोनसोहळा पहात
ज्ञानदेवाचा हा गुरू
कां हो उभा एकांतांत?

याच्या हृदयांत आज
होत कैसा कोलाहल
जाहला जो स्थितप्रज्ञ
असा कैसा थरारेल?

आले आले ज्ञानेश्वर
शिर चरणीं ठेवण्या
भरल्या हृदयानें उभ्या
एकांतांत निवृत्तीच्या.

तेज 'बाबा' चें देखतां
पुशी आंसवें नवृत्ति
ज्ञानदेवाचा गुरुजी
ज्ञानेशाला आशीर्वची.

भरे घटी निर्याणाची
निर्वाणाचा ये मुहूर्त
ठेवी ज्ञानेश प्रस्थान
ऐचवुनी सारें आर्त.

शोक आवरूनी त्याला
समाधींत ने निवृत्ति
जाणी अर्थ समाधीच
होई खराच निवृत्ति.

बैसे आसनीं ज्ञानेश
करी विशाल स्तवन
पुढें ठेवून 'ईश्वरी'
जोडी कर येळा तीन.

दीप निवाला—निवाला
ज्योत ज्योतीला मिळाली
योगियांचा योगेश्वर
झाला...झाला व्योमाकारी.

अर्थ जाणुन रे याचा
येइ निवृत्ति बाहेर
अर्थ देखुनी रे यांत
चिरा ठेवी यज्ञवर.

नामा गद्गदे नि म्हणे—
सूर्य अस्तंगत झाला
सूर्य दिवंगत झाला
सूर्य प्रभूरत झाला.

होतां योगीयांचा योगी
पूर्ण स्वरूप स्वरूपीं
फाटे आकाशाचें पोट
बोले आभाळाची वाणी—

'अगा भगा रे ज्ञानेश्वरा
चंद्रतारा तंव दिनकरा
तंव तुझी समाधी स्थिरा
राहो रे निरंतर.

जंववरी हें क्षितिमंडळ
जंववैरी हें समुद्रजळ
मग कल्पक्षणीं यथाकाळ
माझ्या हृदयीं ठसावें !

—ऋचा ऐकून व्योमाची
पुन्हां हेलाळे निवृत्ति
भरून ये ऊर त्याचा
महिरल्या त्याच्या वृत्ति

वाटे एकटें...एकटें
वाटे सारें सुन्न–शून्य
गत जीवनाचा साऱ्या
पट टाकी भणाणून.

कसें समजावूं मुक्तेला
मुक्त जीवनाचें सौख्य ?
कसें दावूं सोपाना
प्रस्थानाचें या माहात्म्य !

—सदानन्द रेगे




**कालचक्र कसें फिरत असतें हें जमीनीच्या पोटांत गडप झालेली ही गतवैभवा नगरी प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय कळणार नाहीं !**

'सा रम्या नगरी' म्हणून ज्या नगरींना म्हणतां येईल अशा नगरींतून एक 'तक्षशिला' नांवानें प्रसिद्ध असलेली नगरी मोडते. फार प्राचीन काळच्या या गोष्टी ! त्यांतून ही तक्षशिला नगरी जेथें होती तो देशविभाग बाहेरच्या शत्रूंकडून वारंवार हल्ले होऊन तुडविला गेलेला, त्यामुळें इतर अनेक नगरींपेक्षां या नगरीचा विध्वंस फारच मोठ्या प्रमाणावर झाला असला तर त्यांत नवल कांहींच नाहीं. आजहि ही नगरी पुनः प्रत्यक्ष भारतीय राज्यापासून तुटून पडली आहे !

तक्षशिला हें नांव आपल्याला भारतांत देखील आढळून येतें. जनमेजयानें तक्षशिला जिंकून घेतल्याचा निर्देश भारतांत आहे. त्याचप्रमाणें ग्रीकांच्या ग्रंथांत 'टक्सिला' या नांवानें स्पष्ट रीतीनें या जुन्या नगरीचें नांव नोंदिलें आहे. आणि प्लिनीनें अंतरें दिलीं आहेत तर स्ट्रॅबोनें इतर माहितीहि दिली आहे. याशिवाय फायलो-स्ट्रेटस वगैरे ग्रीक लेखकांच्या लिखाणांतून तक्ष-शिला नगरी, तेथील राज्य, लोकांची राहणी वगैरेंबद्दल माहिती लिहून ठेवलेली आढळते. शिवाय आपल्या इकडे पाली भाषेंत लिहिलेली जीं बौद्धांचीं जातकें आहेत त्यांतून तक्षशिलेचा उल्लेख 'तक्कसिला' असा शेंकडों ठिकाणीं आढळतो आणि चौथें प्रमाण मिळतें तें चिनी प्रवासी ह्यान् च्यांग, फायियान् आणि सुङ्युन् यांच्या वर्णनांत : फायियान् इ. स. ४०० त इकडे आला. तो या नगरीला 'चु-शा-शि-लो' म्हणतो; आणि ह्यान् च्यांग इ. स. ६३० त या शहरावरून आला आणि इ. स. ६४३ त पुनः परत जातांना येथील पवित्र स्थळांचीं दर्शनें घेऊन गेला. तो याचें नांव 'ता-चा-शिलो' असें देतो.

चिनी भाषेंत यु-शा-शिलो किंवा ता-चा-शिलो याचा अर्थ 'तोडलेलें किंवा छाटलेलें मुंडकें किंवा शिर' असा आहे. शिलो = शिर हें तर जुळतेंच. कनिंगहॅमची सूचना अशी आहे कीं 'चुत्यशिर' या संस्कृत शब्दाची ही चिनी आवृत्ति असावी. आतां 'तक्ष' शब्दांतूनहि 'तोडलेलें' असा अर्थ सूचित होतो. तेव्हां चिनी नांवें आणि तक्षशिला, ज्याला ग्रीक टक्सिला म्हणत, यांचा मेळ बसवावा. कारण चिनी लोक हे बौद्ध धर्माचे होते. आणि बौद्धांत अशी कथा प्रचलित आहे कीं बुद्धानें या जन्मीं किंवा पूर्वीच्या हजार जन्मांतून आपल्या शिराचें येथें भिक्षादान केलें—शीरच तोडून दिलें. या कथेवरून हीं नांवें पडलीं. तक्षक—नाग आणि परीक्षिति यावरून आणखी निराळाच संबंध मनांत येतो. तक्षकाचे वंशज ते 'तक्क' आणि तक्कांचा देश तो तक्कशिला. शिला म्हणजे दगड. हा अर्थ घेतला तर येथें पर्वत विपुल आहेत. तोडलेल्या दगडांनीं हा देश भरलेलाच आहे.

म्हटलें खरें पण हा देश म्हणजे कोणता आणि आहे कोठें ? ग्रीकांच्या लेखांत प्रवासीनांहि सांगितलेल्या आहेत. चिनी प्रवाशांनींहि मर्यादा व अंतरें सांगितलीं आहेत. त्यावरून निश्चितपणें ठरवितां येतें कीं, सिंधु नदीच्या विभागांत एक यन्याच दूर अशा भागांत हा नगर असला पाहिजे. बौद्ध जातकांतहि बनारसपासून हजारों मैल दूरवर तक्षशिला असल्याचे उल्लेख आहेत. पंच—हजारा जिल्हा आहे तें नांवहि हजार शिरांच्या भिक्षादानाचें सूचक वाटतें. येथें अनेक प्रयत्नां-वरून रावळपिंडीपासून वीस मैलांवरच्या भागांत 'तक्षशिला' असली पाहिजे हें ठरविलें गेलें.

म. म. दत्तो वामन पोतदार

मग सुचलेल्या जागीं खमण्यास कनिंगह्यमनें पाऊणशें वर्षांपूर्वी प्रारंभ केला. त्याला शाहडेरी भागांत ५५ स्तूप, २८ विहार, ९ देवळें, हजारों नाणीं, मोठाले पुतळे वगैरे आढळलें. परंतु रॉबर्ट्स यांना एक ताम्रपट तूर असा मिळाला कीं, त्यांत प्रत्यक्ष 'तक्षशिला' हें नांवच आढळलें. मग आणखी काय पाहिजे? पण चमत्कार असा कीं, एक आणखी असें थोडे सांपडलें कीं, ज्यांत हा स्तूप 'तक्षशिला' येथें बांधला, असा प्रत्यक्ष लेखहि आढळून आला. निश्चय तर झालाच कीं तक्षशिला एके काळीं होती तोच हा देश. कनिंगह्यमच्या शोधांनीं मोठेंच काम केलें.

तथापि पुरातत्त्ववस्तुसंशोधन खातें या कामीं जोसचें काम करूं लागल्याला आतां सुमारें ४० वर्षें झालीं. हें काम मार्शल यांनी केलें. सतत २० वर्षें उत्खनन चालू आहे. हा उत्खात 'तक्षशिला' विभाग चांगला १०-२० मैलांचा आहे. जिल्हा तक्षशिला कनिंगह्यमचे मतें क्षेत्रफळानें सुमारें ३०० मैलांचा असावा. प्रत्यक्ष ज्याला मार्शल प्रभृति शोधक तक्षशिला नगरी म्हणतात, त्या भागांत तीन निराळीं शहरें उकरून काढलेलीं आहेत. आज तक्षशिला रेल्वे स्टेशनच रावळपिंडी ते पेशावर या आगगाडीच्या फाट्यावर आहे. स्टेशनतळापासून अर्ध्या मैलावर आज तक्षशिला-संग्रहशाळा—म्युझियम्—स्थापलेली आहे. आणि या शाळेंत या विभागांत सांपडलेल्या हजारो वस्तु सुरक्षित व व्यवस्थित ठेवण्यांत आलेल्या आहेत. एवढी विशिष्ट पुराणवस्तुसंग्रहशाळा आपल्या बाजूस दुसरी क्वचित्च असेल.

मार्शल यांच्या उत्खननांत आढळलेलीं तीन शहरें म्हटलीं म्हणजे वरील संग्रहशाळेच्या नजीक असलेलें बीर-टेंक हें पहिलें. या बीर-टेंकाच्या पलीकडे पूर्वेलाच 'धर्मराजिका' नांवाचा स्तूप सांपडलेला आहे. आणि उकरून काढलेल्या तीनहि शहरांत 'बीरटेंक' सर्वांत प्राचीन आहे. ही पहिली तक्षशिला म्हणा. या बीरटेंकाच्या उत्तरेला तम्रा किंवा तत्रा नाला म्हणून हारो नदीचा एक मोठा नाला वाहतो. या नाल्यापलीकडे दुसरी एक नगरी आढळलेली आहे. तिला 'सिरकाप' हें नांव आहे. आणि तिसऱ्या तक्षशिला नगरीचें नांव 'सिरसुख' असें आहे. ती सिरकापच्या उत्तरेस हारो नदीचा लुंडी नाला वाहतो त्याच्याहि उत्तरेकडे आहे. याप्रमाणें दोनचार मैलांच्या घेऱ्यांत दोन नाल्याच्या कांठानें हीं तीन प्राचीन शहरांची रूपांतरित तक्षशिला नगरी आज सांपडून आपणासमोर उभी केलेली आहे.

'सिरकाप' या शहराच्या नांवांतहि शीर कापणें हा बोध होतो. आणि या भागांत मारगला टेकड्यांची ओळ आहे. त्याचाहि अर्थ गळा मारणें असा होतो. आणि बुद्धाच्या शिरदानाची कथा विचारांत घेतां या नांवांना व त्यांच्या अर्थाला एक सुसंगतपणा प्राप्त होतो हें लक्षांत घेण्यासारखें आहे. ह्यान् त्सांग वगैरे चिनी यात्री या विभागांत मुद्दाम येत. ते बुद्धाच्या या कृत्याचें स्मारक म्हणून एक स्तूप या भागांत होता त्याच्या दर्शनासाटीं येत याचाहि विसर आपणांस पडतां कामा नये. एकंदर छुळणीला याचा फार उपयोग होतो.

स्पष्टपणें माहीत झालेल्या इतिहासाकडे आतां थोडेंसे वळूं. प्रसिद्ध अलेक्झांडर किंवा शिकंदर यानें भारतावर स्वारी केली, त्या वेळीं त्यास तक्षशिलेचा राजा आंभी हा मिळाला. आंभीचें आणि तक्षशिलेच्या दक्षिणेस असलेल्या पौरवाच्या राजाचें म्हणणें पौरवेश्वराचें वैर होतें. हा पौरवेश्वर म्हणजे अलीकडे पोरस या नांवानें इकडील इतिहासांत येतो तोच होय. आंभीनें शिकंदराची मदत मागितली आणि त्याच्याकडे उदभांडच्या मुक्कामीं आपले दूत पाठविले. त्याप्रमाणें शिकंदर तक्षशिलेला आला. आंभीनें त्याचा मोटा सत्कार केला. त्यास हजारों बैल वगैरे साहित्य दिलें. पांच हजाराची फौजहि मदतीस दिली. शिकंदर विजयी झाला. मग परत जातांना त्यानें आंभी व पौरव राजा या दोघांस आपले सुभेदार नेमलें. शिकंदर-बरोबर आलेल्या ग्रीकांपैकीं कितीएकांनीं त्या वेळच्या तक्षशिलेचें व तेथील लोकांचे चालीरीतीचें वर्णन केलेलें आहे. त्यावरून आज आपणांस तारतम्यानें पुष्कळ उपयुक्त माहिती गोळा करतां येते.

या माहितीवरून कळून येतें कीं, हा प्रांत त्या काळीं 'सुजलां सुफलां सस्यश्यामलां' या वर्णनाला शोभेसा, संपन्न, भरभराटलेला आणि आणि लोकवस्तीनें गजबजलेला होता. मध्य आशियांत जाण्याचा मार्ग तक्षशिलेवरूनच जात असे. आजहि रावळपिंडीचें महत्त्व असेंच आहे. मोटा व्यापार त्या काळींहि चालत असे. अशी ही

जागा भरपूर पीकपाण्याची, व्यापाराची आणि मोक्ष्याची अशी आहे,

ग्रीकांच्या लिहिण्यावरुन येथें सतीची चाल पुष्कळच रूढ होती. ज्यांचीं लग्नें लौकर जुळत नसत अशा मुलींना बाजारांत उभ्या करून त्यांची विक्री करण्यांत येत असल्याचें हे ग्रीक सांगतात. अन्यत्रहि ही चाल रूढ असल्याचा पुरावा मिळतो. हा एक लग्नाचा बाजारच होता असें दिसतें.

अलेक्झांडरप्रमाणें दुसऱ्या एका जगविख्यात राजाचा तक्षशिलेशीं संबंध आला. हा राजा अशोक होय. शिकंदरची स्वारी खि. पू. ३२६ ची. थोड्याच वर्षांनीं अलेक्झांडर वारला. ग्रीकांपासून प्रख्यात चंद्रगुप्त मौर्यानें तक्षशिला जिंकून घेतली. पुनः ग्रीकांचा नवा पुढारी सेल्यूकस निकेतर चालून आला. त्याला चंद्रगुप्तानें पिटाळून लावलें. प्रसिद्ध ग्रीक इतिहासकार मेग्यास्थिनीस हा सेल्यूकसाचा वकील म्हणून चंद्रगुप्तापाशीं होता. या चंद्रगुप्ताचा नातू अशोक. हा अशोक स्वतः कांहीं दिवस तक्षशिलेचा सुभेदार होता. यानंतर वीस वर्षांनीं अशोक गादीवर आला. त्या वेळीं तक्षशिलेची संपत्तीची गणती आजच्या भावांत १०० कोटी रुपयांची होती असें म्हणतात ! केवढी अफाट संपत्ति ही ! अशी तक्षशिला एके काळीं सोन्यानाण्यांनीं मढलेली होती.

अशोक खि. पू. २३२ त वारला. आणि मौर्य साम्राज्य फाटलें ! पंजाब तक्षशिला या विभागावर बॅक्ट्रिअन् लोकांची सत्ता स्थापन झाली. या बॅक्ट्रिअन् अंमलांत वीरटेंकाजवळील वस्ती हलून थोडी उत्तरेला सरकली. आणि तेथें सुमारें १७०–७५ खि. पू. मध्यें सिरकाप या नव्या शहराची स्थापना झाली. मार्शल यांच्या-मताप्रमाणें तर अगदीं प्राचीनकाळीं प्रथम हा तक्षशिला भाग पारसीकांच्या ताब्यांत असावा. मग शिकंदर, मग मौर्य. मग बॅक्ट्रियन् ग्रीक. मग सिथिन् किंवा शक. मग त्यामागून सहावे पार्थियन आणि त्यानंतर कुशान् यांच्या ताब्यांत क्रमाक्रमानें गेला. शेवटीं श्वेतहूणांनीं या भागाचा विध्वंस करून टाकला. म्हणजे पारसीकांच्या ॲकमिनीड साम्राज्याच्या कालापासून अथवा खि. पू. ५५८ पासून खिस्तोत्तर ५०० पर्यंतच्या एक हजार वर्षांत एकंदर सातआठ स्थित्यंतरें आणि राज्यक्रांत्या झाल्या. त्या सगळ्यांचा परिणाम तक्षशिलेस भोगावा लागला. ह्यान्त्संगच्या भेटीचा प्रसंग हा या सर्व क्रांत्या घडून गेल्यानंतरचा सुमारें ६२९–६४५ इ. स.च्या काळांतला ! या काळानंतर मुसलमानी सत्तांचा काळ येतो. तक्षशिला जी एकदां याप्रमाणें जमीनदोस्त झाली, तिचें पुनर्दर्शन होऊं लागल्याला नुकतींच कोठें शंभर वर्षे होतील. कनिंगहामच्या आधीं जनरल व्हेंचुरा वगैरेंनीं कांहीं शोध घेतला होता. या सर्व विभागांतच नव्हे तर पुढेंहि थेट अफगाणिस्तानांत जागोजागीं मोडके बौद्ध स्तूप आणि विहार सर्वत्र पसरलेले अद्यापीहि आढळतात. आम्ही तक्षशिला, पेशावर वगैरे भागांत हिंडलों तेव्हां ते जुनीं अवशेषें जागोजागीं पडलीं असलेलीं आढळलीं. अफगाणिस्तानांत बामियान येथील अवशेष फारच भव्य व विपुल आहेत. आणि आतां पुरातत्त्वसंशोधनखात्यानें जें कार्य चालविलें आहे त्यामुळें जमिनीच्या पोटांत गडप झालेलीं नगरें, तट, स्तूप, देवळें, राजवाडे, घरें नवें पुनः आपणांस दिसूं लागलीं आहेत ! कालचक्र कसें फिरत असतें हें हीं स्थळें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय नीट कळणार नाहीं.

स्थूलमानानें एवढी कल्पना देतां येईल कीं, बीरटेंकाजवळचे स्तूप, घरें वगैरे मातीचीं आणि त्यांचें बांधकाम स्पष्ट आहे. पुढें सिरकापमध्यें दगडागोट्यांची बांधणी आणि रस्त्यांची सरळ—पद्यप्रमाणें आंख्णी आढळते. यांत मधून मधून तुकडेजोड आढळते. इंग्रजीत याला डायूपर् पद्धति म्हणतात. आणि चौकोनी चिरेबंदीला ॲशलर पद्धती हें नांव देतात. मातीच्या भिंताडानंतर दगडागोटांची आणि मधून तुकडेजोडीचें काम आणि त्यानंतरची सुधारणा म्हणजे चिरेबंदी चौकोनी बांधणी. या बांधणीवरच कामाचा काळ ठरवितां येतो.

ग्रीक किंवा हेलेनिस्ट बांधणीचे व कलेचे पुष्कळ परिणाम या काळच्या कामांत घडलेले प्रत्यक्ष अवशेष पाहिल्यावर स्पष्ट दिसून येतात. भाषेवर न लोकांच्या राहणीवरहि पुष्कळ परिणाम झालेले दिसतात. आमची पूर्वींचीं नाणीं म्हणजे कांहीं खुणा ठोकलेले धातूंचे वेडेवांकडे तुकडे. पण ग्रीकांचीं नाणीं म्हणजे प्रमाणशीर, सुबक आणि त्यावर चित्रें व अक्षरें. ही राजांचीं नांवें असलेलीं हजारों नाणीं तक्षशिलेच्या भागांत, बौद्ध स्तूपांत, बीरटेंकाच्या विहारांत वगैरे आढळलेलीं आहेत. नाणीं व लेख वाचून काळ ठरविणें व जुन्या घडामोडींचा क्रम लावणें शक्य झालें आहे. नानाविध खेळणीं, खिळे, दिवे, घरगुती भांडीं, मातीचे मणी, माळा, शेंकडो अलंकार, केस विंचरण्याचे कंगवे, बांगड्या इतक्या मिळाल्या आहेत कीं त्याला गणती नाहीं. मातीप्रमाणेंच दगड, रत्नें, सोनें, लोखंड, रुपें यांच्यापासून बनविलेल्या नानाविध वस्तू विपुल आढळलेल्या व काढून ठेवलेल्या आहेत, त्याला सुमार नाहीं. ही सर्व भूमि उकरली तर प्राचीन भारत त्याखालीं गाडलेला खचित सांपडेल. या वस्तूंचें वर्णन करण्यास एक ग्रंथहि पुरणार नाहीं.

या वस्तू पाहून त्या वेळच्या जीवनाची उत्तम मांडणी करतां येते आणि इतक्या प्राचीन काळच्या जीवनाचें हुबेहूब चित्र मनःचक्षूपुढें उभें करतां येतें.

पण 'तक्षशिला' या इतर सर्व गोष्टींपेक्षां ज्या एका गोष्टीसाठीं अत्यंत नांवाजलेली होती तें कारण या सर्वांहून निराळेंच आहे. 'तक्षशिला' हें विद्यापीठ होतें. बौद्ध जातकांत याचा पदोपदीं प्रत्यय येतो. तिलमुष्ठिजातकातली गोष्ट प्रसिद्ध आहे. बहुधा या गोष्टींना अशी सुरुवात होते: "पूर्वी वाराणशींत ब्रह्मदत्त राजा राज्य करीत होता. आपल्या मुलास सोळावें वर्ष लागतांच त्या काळच्या पद्धतीप्रमाणें राजानें त्यास शिकण्याकरितां दूर परराष्ट्रांत पाठविलें. पाठवितांना मनोरी तळाच्या वहाणा आणि इरलें दिलें. आणि गुरुदक्षिणेसाठीं एक सहस्र कार्षापण–नाणीं–दिलें. आणि सांगितलें कीं, दिशाप्रमुख आचार्य तक्षसिलेंत राहतात, तिकडे शिकण्यास जा. हे आचार्य म्हणजेच बोधिसत्त्व. हे पांचशें मुलांस शिल्प शिकवीत. हीं शिल्पें अठरा प्रकारचीं होतीं. यांत धनुर्वेकला, आयुर्वेद, मंत्रविद्या, सर्प–विद्या, निधिक्रिया, व्यवहार, गणीत, कृषिकला, व्यापारकला, नृत्य, गान, चित्रकला वगैरेंचा उल्लेख मिळतो. तक्षशिलेंत तीन वेदांचेंहि शिक्षण मिळे. वर्गगत भेदभाव बिलकुल नसे. राजापासून रंकापर्यंत सर्वांना प्रवेश असे. विशेषतः तक्षशिला आयुर्वेदाबद्दल फार प्रसिद्ध होती. पाणिनिदेखील तक्षशिलेजवळचाच रहिवासी होता. उज्जयनींत गणित, ज्योतिष तर तक्षशिलेंत आयुर्वेद असे या जुन्या भारतीय विद्यापीठांचे विशेष होते. हजारों विद्यार्थी, हजारों मैलांवरुन पदप्रवास येत. कोठें वाराणसी आणि कोठें तक्षशिला? कोठें मिथिला, कोठें आंध्रदेश आणि कोठें तक्षशिला? पण विद्यार्जनासाठीं विद्यार्थी अरण्यांतून त्रासांतून इतक्या दूरवर जात! केवढी ही प्राचीन भारतीयांची विद्याप्रीति! अशी ही जातकांची वर्णिलेली तक्षशिला गंधार देशांत होती.

आज गंधारला कंदाहार म्हणतात. एके काळीं गंधार राज्यांत ही मोडत असे. कनिष्कादि कुशान राजे हीवर राज्य करून गेले! गंधारमध्येंच कदाचित् चिनी ज्याला अभंद म्हणतो तो छीय तालुका असावा. त्यांत तक्षशिला मोडत असावी. अशी ही वैभवशाली तक्षशिला, हें विद्येचें माहेरघर केवळ स्मरणानें आपणांस मोठेपणाची इच्छा जागृत करो!

अनंत धोक्यांनीं आणि अपरंपार सौंदर्यानें भरलेलें अमरनाथ

# अमरनाथच्या वाटेवर...

धरणी असो की रमणी, पावित्र्य आणि
अद्‌भुतता यांचें तेज चढलें कीं
त्यांच्यांत असाधारण आकर्षण
निर्माण होतें तें असें !



बा. भ. बोरकर

काश्मीरला जायचा योग अनपेक्षित रीतीनें मला आला. केव्हाच्या सृष्टि सौंदर्याला गेलीं पांच वर्षें आंचवलेल्या माझ्या मनाला हा योग म्हणजे भाग्ययोगच वाटला. सारखें माझें मन त्या स्वप्नभूमींत भेंगाळ्या घेऊं लागलें. मिळतील त्या पुस्तकांतून आणि सांपडलेल्या लोकांकडून मी काश्मीरची माहिती मिळवूं लागलों. आणि कल्पनेच्या रेशमी रंगांनीं तेथलीं दृश्यें चितारूं लागलों. तेथलीं सफेदाचीं उंच उंच झाडें, निळाल छायांची गर्द चिनार, राजशाही बागा, देवदार आणि चीड या गगनचुंबी महावृक्षांचीं घनदाट अरण्यें, उन्हा-चांदण्यांत चमकत राहणारीं उत्तुंग हिममंडित पर्वतशिखरें, फेसाळत, थेंगावत धांवणाऱ्या धुंद नागमोडी नद्या, सागरासदृश असे विस्तीर्ण तलाव, त्यांत स्वच्छंदपणें विहार करणारे शिकारे, तरत्या बागा, सुस्त पडून असलेल्या आरामशीर नौकागृहें आणि या सर्व समृद्ध परिसरांत विहरणाऱ्या व गुलाबसफरचंदांना हंसत हंसत लाजवणाऱ्या लावण्यचौवना अशा किती तरी गोष्टी माझ्या या कल्पना साम्राज्यांत तरळत होत्या. पण या सर्व तुरुतुरा नाचें नाचणारी, अद्‌भुततेनें स्तिमित करणारी आणि पावित्र्यानें शुद्ध करणारी लावणारी अशी एक गोष्ट काश्मीरमध्यें असल्याचें मला कळलें आणि ती म्हणजे अमरनाथ.

—समुद्रसपाटीपासून जवळ जवळ १५ हजार फूट उंचीवर असलेल्या तेथल्या भव्य पर्वताच्या एका शिखरांत निसर्गाच्या चमत्कारानें एक भलीमोठी गुंफा असून त्यांतून पाणी झिरपत जातें आणि तें थिजत थिजत त्याच्यापासून एक शिवलिंग आपोआप तयार होतें. त्याचें वैशिष्टय असें कीं, शुक्लपक्षांतील चंद्राच्या वाढत्या कलांबरोबर वाढत जात पौर्णिमेला तें पूर्णाकार धारण करतें आणि कृष्णपक्षांतील चंद्राच्या उतरत्या कलांबरोबर क्षीण होत अमावास्येला अंतर्धान पावतें. ही माहिती मिळाली तसा तिच्यांतील या अद्‌भुततेनें मी आपादमस्तक शहारून निघालों. सृष्टि सुंदर आहे. लावण्ययौवना तिच्याहूनहि सुंदर आहेत. पण धरणी असो

ऋषि रमणी- असो पावित्र्य आणि अद्भुतता यांचें आगळें तेज त्यांच्यावर चढलें कीं त्यांच्या त्या सौंदर्याच्या ठिकाणीं असाधारण आकर्षण निर्माण होतें. त्या आकर्षणानेंच वेध लागून मी या स्थळाची विशेष माहिती मिळवूं लागलों तेव्हां अमरनाथची ही यात्रा अनंत धोक्यांनीं आणि अपरंपार सौंदर्यानें भरलेली असल्याचें मला कळून आलें. पूज्यवर्य काकासाहेब कालेलकर यांच्यासारख्या डोळस सौंदर्य-समीक्षकालाहि तिनें किती वेध लावला हें जसें त्यांच्या तोंडून मुंबईला मला ऐकावयाला मिळालें त्याचप्रमाणें शरणानंदजींसारख्या अंध साधूला पांचदां स्वतःकडे ओढून नेण्याचें सामर्थ्य तिच्यांत कसें आहे - हेंहि त्यांच्या मुखांतून मला अजमीरच्या पुष्कर तलावाच्या कांठीं ऐकावयास मिळालें. अमरनाथची ही यात्रा श्रावण पौर्णिमेला असते, आणि भाविक लोक तिचें श्रेय मरणाचा धोका पत्करण्याच्या इतकें महत्त्वाचें समजतात. प्रत्येक वर्षीं चार दोन माणसें मरतात, आठ-दहा घोडीं गतप्राण होतात, आणि तरीहि यात्रेचा हा क्रम शेकडों वर्षें अखंड चालू आहे. अमरनाथला इतकें महत्त्व कां आहे हें समजून घेण्याची उत्कंठा उत्कट व्हावयास एवढी माहिती पुरेशी नाहीं का? मी तें समजून घेण्याचा प्रयत्न केला. तसें करतांना अमरनाथची जी कथा मला कळली तीहि मोठी सुंदर होती. इतकी सुंदर कीं, जशी कळली तशी काव्यांत रेखाटली तर त्यांतून अखंड रमणीय अशी कलाकृति आपोआप तयार व्हावी. ती कथा सांगितल्याशिवाय या यात्रेचें खरें रसग्रहण करतां येण्यासारखें नाहीं. ती अशी :

ज्या प्रदेशाला आज आपण काश्मीर या नांवानें ओळखतों तो प्रदेश त्या वेळीं नव्हता. अर्थात् त्याला हें नांवहि नव्हतें, होतें एक अपरंपार सरोवर. शांत, विशाल, निश्चल! आणि त्याच्या मधोमध या सरोवराची अधिष्ठात्री देवता 'क्षीरभवानी' केवळ तेजाच्या स्वरूपांत ध्यानमग्न बसली होती. प्रजापतीच्या विधातृत्वाचा वारसा मिळविलेले ऋषि कश्यप एकदां तेथें पोंचला. सृष्टि-गर्भा आपोदेवतेचें तें धुंद मदालस स्वरूप पाहून विधातृत्वाची अनिवार ऊर्मि त्याच्या ठिकाणीं निर्माण झाली आणि ती त्यानें त्या तेजोरूपिणी उमेकडे प्रार्थनाभावानें व्यक्त केली. त्याच्या या संकल्पाला देवानें स्मितपूर्वक अनुमति दिली. दर्भाचा प्रहार करून त्यानें पर्वतांचा वेढा तोडला. आणि तटलेल्या पाण्याला वाट मोकळी करून दिली. हां हां म्हणतां दऱ्या, पर्वत, पठारें निर्माण झालीं. हिरवळीची मखमल त्यांच्यावर चढूं लागली. नक्षत्रें उगवावीं तशीं रंगीबेरंगी फुलें उमलूं लागलीं. केशर, चिनार, देवदार, चीड, अक्रोड, भूर्ज असे नानाप्रकारचे वृक्ष आपला वंशविस्तार करूं लागले. फळाफुलांची लयलूट झाली. फुलपांखरें आलीं, पांखरें आलीं. जनावरें चरूं लागलीं. सावजें डरकाळ्या फोडूं लागलीं. या सर्व ऐश्वर्याचें कौतुक करणारा माणूस आला. त्याची प्रिया आली. त्यांच्या संततीनें आपला विविध व्याप सुरू केला. सारी सृष्टि अधिकच सुंदर झाली.

त्यांनीं निर्माण केलेल्या कलांनीं आणि हुन्नरांनीं त्या सुंदरतेंत कलाबूत खेळूं लागली. आणि हें सारें पाहून पाण्याला हर्षाच्या उकळ्या फुटूं लागल्या. वारे सुगंधित होऊन डोलूं लागले. चांदणें मनांतल्या मनांत गाऊं लागलें. उन्हाच्या अंगाअंगात कांचनलहरी हेलावूं लागल्या. नक्षत्रें समाधानाच्या धुंदीनें काजुंली द्राक्षाप्रमाणें रसानें जडावून गेलीं. आणि आकाश निळ्या करुणीनें त्रेहोप झालें. तरीहि कश्यपाला चुकल्याचुकल्यासारखें वाटत होतें. त्याच्या मुखांत कसली तरी खिन्नता घोटाळत होती. अशा स्थितींत असतांना आकाशमार्गानें जाणाऱ्या देवतेच्या वीणेच्या निनादानें तो भानावर आला. त्यानें दृष्टि वर लावली. त्या दृष्टींतल्या कारुण्यानें ओढले जाऊन देवर्षि खालीं आले. आणि कश्यपाला म्हणाले, "तूं प्रतिब्रह्मा! ब्रह्मदेवाच्या सृष्टीलाहि लज्जित करणारी रम्य सृष्टि तूं निर्माण केलीस; मग ही खिन्नता कां?" यावर तो तपोधन उद्गारला, "ही सृष्टि सुंदर आहे! पण या साऱ्या सौंदर्याला जोंवर पावित्र्याची ओर आली नाहीं, अमर जीवनाची अद्भुतता त्यांत पैदा झाली नाहीं, तोंवर त्याला साफल्य नाहीं. मलाहि कृतार्थता नाहीं. मांगल्याचीं पावलें येथें टायींटायीं उमटल्याशिवाय तीर्थक्षेत्रें उगवणार नाहींत. येथें नांदणारा मनुष्यमात्र रम्यत्वांतून दिव्यत्वाकडे जाणार नाहीं. त्याची ही वाट कशी मोकळी होईल हा ध्यास मला लागला आहे. आणि म्हणून मी व्यथित आहें."

कश्यपाची ही व्यथा जाणून तो कल्पक महामुनि क्षीरभवानीकडे गेला आणि म्हणाला, "देवी, किती युगं, किती जन्म असें ध्यान करणार आहेस? जीवनाचें अमर रहस्य जाणणारा महेश्वर तुझा पति. त्याच्या गळ्यांतल्या माळेंतील एकशें नऊ रुण्डांइतकेच जन्म तूं घेतलेस, एकाहून एक वरचढ तप करीत त्याला वरलेंस. पण साऱ्या जगाला चोरून ठेवलेलें त्याचें रहस्य मात्र मिळवायचें तूं विसरलीस, असें हें रहस्य हाताशीं असतांना तूं हा ध्यानाचा ध्यास घेऊन बसली आहेस. नाभींतल्या कस्तुरीला विसरून बाहेरच्या सुवासांना तूं भुलून गेलीस."

नारदाचें हें म्हणणें उमेला पटलें. 'नवऱ्यांची जात ही अशीच,' असा विचार मनांत येऊन ती बेचैन झाली. नारदाची कळ बरोबर लागू पडली. थोर पुरुषांच्या कौटिल्यांत जगत्कल्याणाची कामनाच क्रीडा करीत असते. नारद गेला. भांडणाला सुरुवात झाली.

नेहमींप्रमाणें शंकर आले. पण उमा बोलेना. नाना युक्त्या केल्या तरी तिचा रुसवा जाईना. शेवटीं योगीराज हैराण झाले. अजीजीला येऊन तिला रुसव्याचें कारण विचारूं लागले. आतां ती भडकली. नवऱ्याच्या जातीला तिनें धारेवर धरलें. इतक्या जन्माची निष्ठा देऊनहि आपलें हृदयरहस्य लपवून ठेवल्याबद्दल तिनें त्यांची चांगली कानउघाडणी केली आणि निकरावर येऊन म्हणाली, "तुमच्या अंतःकरणांतल्या विश्वाचें परमरहस्य सांगितल्याशिवाय मी कांहीं तुमच्याशीं बोलणार नाहीं."

यावर शंकर म्हणाले, "दाहक रहस्य पचवायाला ताकद लागते. पावलोपावलीं दिव्य करावें लागतें. नाहीं तर तें अंगावर शेकतें. दिव्य करण्याची

तुझी तयारी असली तर माझी ना नाहीं. ”

शिवाप्रमाणें शिवपत्नी उमाहि त्यागमूर्तीच होती. तिनें हें आव्हान स्वीकारलें. निवांत स्थळ शोधून काढून तेथें हें अमर रहस्य सांगतों असे शिवानें कबूल केलें आणि दोघेही तसें स्थळ हुडकण्यासाठीं मार्गस्थ झालीं. भली मोठीं घाटी चढत आणि आजूबाजूच्या सृष्टीचें कौतुक करीत दोघेंहि एका उंचवट्यावर आलीं. थकवा आला म्हणून त्यांनीं तेथें आराम केला. दिलासा मिळावा म्हणून चंदन उगाळून अंगाला लावलें. तेथून तीं पुढें निघालीं. जें जाणून घेण्यासाठीं पार्वती शिवाच्या पाठीस लागली होती त्याचा तिला विसर पाडण्यासाठीं काय युक्त्या योजाव्या यांचा शिवजी मनांतल्या मनांत विचार करीत होते. कोणतेंहि रहस्य बायकांच्या तोंडीं फार दिवस टिकत नाहीं हें गडकऱ्यांपूर्वीहि त्यांना माहीत होतें. म्हणून उमेचें कलेचें वेड लक्षांत घेऊन त्यांनीं एका रम्य स्थळीं आपल्या डमरुवादनाला सुरुवात केली. दादरा—झपतालपासून विष्णुताल—शिवतालपर्यंत साऱ्या तालांचा महासागर त्यांनीं हेलावून सोडला आणि तिला आपल्या हृत्तालाचा विसर पाडण्याचा प्रयत्न केला, पण उमा फसली नाहीं. तिनें आपला हेका तसाच चालविला. या तालांचें रहस्य सांगत सांगत शिवजी पुढें चालत राहिले.

तोंच एकाएकीं जहरी वाऱ्यांचें वादळ चोहीं-कडून त्यांना घेरू लागलें. “पुढें जाणें धोक्याचे आहे. आपण परत फिरायचें का ?” असें त्यांनीं तिला विचारून पाहिलें पण ती हटेना. तेव्हां शिवजींना पुढें गेल्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. गळ्यांतल्या शेपाला ते म्हणाले, “हा वीयुवर्जन राक्षस विषाचे वारे ओतत आहे. तें पिऊन टाक. त्यासाटीं सहस्रमुखांचें वरदान मी तुला देत आहें ”

शेषानें तें विषवायु पिऊन टाकले. सगळें वातावरण निर्मळ झालें. पण तो थकून गेला. तेव्हां त्याला त्यांनीं तिथेंच आराम करायला सांगितलें. त्यासाठीं तो पंचपर्वतांच्या पोकळींत आडवा झाला. आणि शिवाच्या अद्‌भुत किमयेमुळें विशाल सरोवरांत त्याचा कायापालट झाला. शेषेही आतां चौदा हजार फूट उंचीपर्यंत आलीं होतीं. तीं अजस्र चढणी चढलीं होतीं. कित्येक मैल प्रदेश त्यांनीं पायीं ओलांडला होता. इतके श्रम झाले तरी उमा परत फिरण्याचें नांव काढीना अन् आपला हट्टहि सोडीना. तेव्हां शिवजींनें तांडव नृत्याला सुरुवात केली. त्या नृत्यानें अंगांत जाणवणारी सुखद कंप असह्य होऊन त्यांच्या जटेंतली गंगा पंचधारांनीं वाहूं लागली. सर्वत्र पाणीच पाणी झालें आणि त्या पाण्याच्या प्रलयांत तो नटराज अदृश्य झाला. उमा हांका घालूं लागली. पण उत्तर मिळेना. ती कावरीबावरी झाली. पुढें जाणार म्हटलें, तर वाट दिसेना. पण तिची श्रद्धा त्या पाण्यापेक्षांहि अथांग होती. तिनें पानांची गायत्री केली आणि तिला पाण्यांत सोडलें. तिच्या तपोबळामुळें ती खरीखुरी गायत्री होऊन पाण्यांतून पुढें जाऊ लागली, आणि प्रत्येक गौपद्मबरोबर पाणी ओसरूं लागलें. गायत्रीच्या पावलावर पावलें टाकीत उमाहि चालूं लागली आणि शेवटीं कोरड्या भूमीवर येऊन पोंचली. तेथें शंकर तिला पाहून खदखदां हंसत होते. त्यांच्या कसोटीला ती उतरली होती. यापुढें टाळाटाळी चालवणें क्रूरपणाचें झालें असतें. शंकरांच्या दृष्टीनें निर्जन आणि निवान्त असें स्थळ जवळ आलें होतें. पण हें अमर रहस्य ऐकणारा दुसरा कुणी जीव जवळ असला तर तो अमर व्हायचा अशी स्थिति असल्यामुळें तृतीय नेत्र उघडून त्यांनीं आजूबाजूची सर्व सृष्टि बेचिराख केली. आणि तो सारा प्रदेश पूर्णपणें निर्जीव झाला अशी खात्री करून घेतल्यानंतर आपल्या जटे-सारख्या दिसणाऱ्या तेथील सर्वोच्च शिखरावर त्यांनीं आपला त्रिशूळ फेंकून दिला. गिरव्या-प्रमाणें कोरीत कोरीत त्यानें त्या पर्वत-शृंगांत एक महान् गुंफा निर्माण केली. तेथें गजचर्म टाकून शंकर आसनस्थ झाले. थकून गेलेली उमा गुंफेच्या भिंतीचा आधार घेत रहस्यकथा ऐकण्यास सिद्ध झाली.

शंकर कथा सांगू लागले. उमा हुंकार देऊं लागली. कथा सांगतां सांगतांच ते स्वतः इतके रंगून गेले कीं स्थलकालाचें आणि देहावस्थेचें त्यांचें भान लोप पावलें. कथा पुरी झाली त्या वेळीं भानावर येऊन ते उमेला म्हणाले, “झालं ना तुझं समाधान ? आतां हांस पाहूं.” शिवजींचे हे उद्‌गार ऐकून उमा दचकून उठली. अर्ध्या कथेवरच तिचा डोळा लागला होता. ती म्हणाली, “मी इतकी थकून गेलें होतें कीं, गोष्ट अर्ध्यावर आली तेव्हां माझा डोळा लागला. किती मी अभागी !” यावर शंकर विस्मयचकित होऊन म्हणाले, “मग इतका वेळ हुंकार कोण देत होतें ? जवळपास कुणी सजीव प्राणी अस-ण्याचा संभव नव्हता. पण आपल्या गजचर्माला चिकटून एखादा जीव तर राहिला नाहीं अशी शंका येऊन त्यांनीं तें झटकलें तोंच त्यांतून एक निळें कबूतर उडालें.

अंड्याचें फुटलेलें कवच तेवढें जमिनीवर पडलें होतें. संतापानें त्रिशूल घेऊन शिवजी त्या कबूतराच्या मागें लागले. तोंच नारद तेथें प्रकट झाला व खदखदां हंसूं लागला. शिवजी चमकले, आणि म्हणाले, “नारदा, हंसतोस का ?” “कथा ऐकून अमर झालेल्या कबूतराला मारण्यासाठीं धांवण्याचा महा-महेश्वराचा भोळेपणा पाहिल्या नंतर आमच्या-सारख्या अज्ञ जनांनीं हंसूं नये तर काय करावें ? ”

शंकर आतां शांत झाले. त्यांच्या मस्तकींच्या चंद्राच्या शीतलतेनें, जटेंतून झिरपणारें पाणी थिजत थिजत त्याचें हिमलिंग बनलें. तें पाहून शिवजी म्हणाले, “कलियुगांत या लिंगाच्या आणि त्या कबुतराच्या रूपानें भक्तांना आम्हां उभयतांचें दर्शन घडेल.” आणि ते अदृश्य झाले.

असें हें अद्‌भुत हिमलिंग आणि तितकेंच असें अद्‌भुत कबूतर पहा-ण्याचा ध्यास कुणाला लागणार नाहीं ? हें लिंग, हें कबूतर, चंदनवाडी, शेषनाग, पंचतरणी अशीं या साऱ्या कथेमुळें शिवपार्वतीच्या पदस्पर्शानें पवित्र झालेलीं रमणीय स्थळें पहाण्याचा माझ्या मनानें ध्यास घेतला.



एकदां मी ओढ्यापुढे समुद्राचें वर्णन केलें. ओढ्याला वाटलें कीं मी कल्पनाशील गप्पीदास आहे.

आणि जेव्हां मी समुद्राला ओढ्याविषयीं सांगितलें तेव्हां त्याला वाटलें कीं मी कृपण निंदक आहे.




JOGESHWARI NAKA, POONA 2

अनुक्रमणिका




**सध्यां भारतांत चालू असलेली शिक्षणपद्धति आमूलाग्र बदलून आपण सुधारणा केल्या नाहींत तर उद्यां देशाचा कारभार चालविण्यास लायक माणसंच मिळणार नाहींत !**

डॉ. पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे, एम्. ए., पीएच्. डी.

### शिक्षण आणि राष्ट्राचें भवितव्य

राष्ट्राची किंवा समाजाची उन्नति–अवनति, तेथील संस्कृतीची प्रगति–परागति, ही कशावर अवलंबून आहे याविषयीं अनेक भिन्न मतें प्रचलित आहेत. देशांतील उत्पादनसाधनांचा विकास व त्यावरील समाजाचें स्वामित्व, देशाची भौगोलिक परिस्थिति, त्याची पूर्वपरंपरा, तेथील लोकांच्या अंगांतील उच्च किंवा हीन रक्त, त्या देशांतील थोर पुरुष इ. उन्नति–अवनतीचे अनेक घटक सांगितले जातात. आणि हीं सर्व कारणें प्रभावी आहेत यांत शंका नाहीं. एकांतिक विचारसरणीचा अवलंब करून त्यांतील एकच एक सर्व घडामोडींस निर्णायक आहे असें म्हणणें कोणालाहि पटणार नाहीं. पण यांतील प्रत्येक घटक अंशतः समाजाच्या स्थितीला जबाबदार आहे याविषयीं दुमत होईल असें वाटत नाहीं.

या अनेक घटकांत राष्ट्रांतील शिक्षणपद्धतीचा समावेश करतां येईल काय ? येथें अमुक शिक्षण पद्धति होती, शिक्षण क्षेत्रांत हें धोरण अवलंबिलें होतें, म्हणून या राष्ट्राचें भवितव्य असें झालें, असें म्हणतां येईल काय ? इंग्लंड–अमेरिकेंत व्यक्तिस्वातंत्र्यासाठीं प्राणार्पणहि करावें अशी लोकांची वृत्ति आहे आणि जर्मनींत व्यक्तिस्वातंत्र्याचें महत्त्व लोकांना कळत नाहीं; अत्यंत घोर अशी दण्डसत्ता ते सुखानें चालूं देतात. या राष्ट्रांची मनोवृत्ति इतकी भिन्न आहे. हिचा तेथील शिक्षणपद्धतीशीं कांहीं संबंध असेल काय ? शिक्षण हा एकमेव निर्णायक घटक आहे असें म्हणणें सयुक्तिक ठरणार नाहीं. पण तो एक प्रभावी घटक आहे, या मनोवृत्तीच्या मागें असलेल्या अनेक कारणांपैकीं तें एक महत्त्वाचें कारण आहे, असें म्हणतां येईल काय ? याचाच अर्थ असा कीं शिक्षण या साधनावर आपली श्रद्धा आहे काय ?

फ्रान्समध्यें १५४० पासून इग्नेशस लॉयला यानें स्थापन केलेल्या जेसुइट पंथाच्या लोकांचें शिक्षणक्षेत्रांत वर्चस्व होतें आणि त्यांनीं घालून दिलेल्या तत्त्वानुसार तीनशें वर्षें शिक्षण चालू होतें. यांनीं शिक्षणक्षेत्रांत अगदीं लष्करी शिस्त निर्माण केली आणि व्यक्तित्वविकास किंवा स्वयंस्फूर्ति यांचा अगदीं बीमोड करून टाकला. जर्मनींत १७१७ पासून फ्रेडरिक विल्यम यानें सक्तीचें शिक्षण सुरू केलें होतें आणि तेथून पुढें सर्व शिक्षणसंस्था नेहमीं सरकारी नियंत्रणाखालीं असत. ब्रिटनमध्यें शिक्षणसंस्था प्रथमें पासूनच अगदीं स्वतंत्र होत्या. तेथें त्यांचा विकास सरकारनें ठरवून दिलेल्या चाकोरीतून कधींच झाला नाहीं. त्या देशांतील इतर कारभार ज्याप्रमाणें लोकप्रेरित आहे तसाच हाहि कारभार लोकप्रेरित होता. या तीन देशांनीं आज अगदीं भिन्न भवितव्यें झालेलीं दिसतात. तेथें तीनशें वर्षें प्रचलित असलेल्या शिक्षणपद्धतीला याचें कितपत श्रेय देतां येईल ?

### बाघिणीच्या दुधाचा प्रभाव

हिंदुस्थानांतील गेल्या शंभर–दीडशें वर्षांच्या शिक्षणाकडे पाहिलें तर याचें कांहीं निश्चित उत्तर

अनुक्रमणिका

देतां येईल असें वाटतें. इंग्रज येयापूर्वी पांच-सहाशें वर्षें येथें कोणची शिक्षणपद्धति रूढ होती हें सर्वांस माहीतच आहे. सर्वसामान्य जनतेला येथें बौद्धिक शिक्षण मिळतच नसे. वरिष्ठ वर्ग व विशेषतः ब्राह्मण-वर्ग शिक्षण घेत असे. त्याचें स्वरूप इतकें तोकडें व संकुचित होतें कीं, शिक्षणपद्धति या गौरवास्पद नांवानें त्याचा उल्लेख करावा इतकेंहि त्याचें महत्त्व नव्हतें. रूपावळी, समास, अमरकोश, कांहीं वेदसूत्रें, रघु, कुमार, किरात अशीं कांहीं काव्यें येवढीच शिक्षणाची प्रगति होती. विशेष पांडित्य म्हणजे न्यायवेदान्तमीमांसा इ. शास्त्रांचें अध्ययन आणि त्यांत निर्माण झालेलें वादपटुत्व हेंच होतें. ब्रिटिशांचें राज्य येथें आलें व त्यानंतर सर्वांना 'वाघिणीचें दूध' मिळण्याची सोय झाली. त्याचा प्रभाव काय अनुभवास आला तें विशद करण्याची आवश्यकता नाहीं. या देशाचें स्वरूप गेल्या शंभर वर्षांत आमूलाग्र पालटून गेलेलें आपणास दिसतच आहे.

वर दिलेल्या अनेक देशांच्या उदारणांवरून शिक्षणपद्धति हा देशाचें भवितव्य ठविणारा एक प्रभावी घटक आहे याविषयीं कोणी वाद निर्माण करील असें वाटत नाहीं. समाजाला वळण लावण्याचें शिक्षण हें प्रभावी साधन आहे, राष्ट्राचे जे कर्णधार आहेत त्यांनीं अग्रस्थान देऊन ज्याचा विचार केला पाहिजे व उपयोग केला पाहिजे असें तें एक साधन आहे, हें वरील उदाहरणें पहातां अगदीं निर्विवाद आहे असें वाटतें आणि तसें असेल तर सध्यां आपण भारतीय त्याचा कोणत्या रीतीनें उपयोग करीत आहोंत हें पहाणें उद्बोधक ठरणार नाहीं काय?

दुर्दैवानें शिक्षणाच्या फलाचें मापन करण्यास नेमकें असें साधन नाहीं. एखादें धरण बांधून विद्युत्यंत्र चालू केलें कीं त्यांतून वीज किती निर्माण झाली हें मोजून दाखवितां येतें. एखादें शेत पेरलें तर त्यांतून धान्यनिर्मिती किती झाली तेंहि मोजतां येतें, पण अमुक शिक्षण दिलें तर त्याचा अमुक परिणाम झाला, अमुक फल मिळालें हें नेमकें मोजून दाखविणें फार कठिण आहे. तरी पण एकंदर समाजाच्या कर्तृत्वाशीं त्याचा दृढ संबंध आहे हें जर वर दाखविल्या-प्रमाणें आपण मान्य केलें तर त्याचेंहि मोजमाप करतां येण्याजोगें आहे असें ध्यानांत येईल.

स्वातंत्र्य मिळाल्याला आतां चार वर्षें झालीं. तेवढ्या काळांत या देशाचा कारभार कसा झाला, कसा चालू आहे याविषयीं सध्यां समालोचनें प्रसिद्ध होत आहेत. तीं चाळून पाहिलीं तर या देशांतील कर्तृत्वाविषयीं कोणाहि विचारी माणसाला चिंता वाटल्यावांचून राहाणार नाहीं. 'प्रॉव्हिन्शियल डेव्हलपमेंट प्रोग्रॅम' हें याविषयींचें डॉ. ग्यानचंद यांचें समालोचन आणि 'पब्लिक ॲड्मिनिस्ट्रेशन' यावरचा ए. डी. गोरवाला यांचा अभिप्राय या दोन समालोचनांवरून गेलीं तीस-चाळीस वर्षें या देशांत जी शिक्षणपद्धति रूढ आहे तिचें फल आपणांस काय मिळालें तें सहज समजून येईल.

## विकास-योजनेंत सुसूत्रता नाहीं

प्रांतोप्रांतीं ज्या विकासयोजना आंखल्या होत्या त्यांविषयीं ग्यानचंद लिहितात कीं, यांपैकीं एकाहि योजनेंत सुसूत्रता नाहीं. अंतिम हेतूची स्पष्टता व त्याअन्वयें कार्यक्रमाची आंखणी फार क्वचित् ठिकाणीं दिसते. आपल्याजवळ पैसा किती आहे, खर्च किती पेलणें शक्य आहे याचा विचार न करतांच योजनांना आरंभ झाला. त्यामुळें मागून पैसा पुरत नाहीं म्हणून कित्येक योजना तशाच सोडून द्याव्या लागल्या. आपण विजेसाठीं धरणें बांधीत आहोंत. तरी ही वीज निर्माण झाल्यावर तिचें काय करावयाचें हें कोणत्याच प्रांतांत ठरलेलें नाहीं. औद्योगिक विकास जेथें जास्त होण्याचा संभव तेथें त्यावर कमींत कमी खर्च झाला आणि पडीत जमिनी लागवडीस आणण्याची जेथें जास्त आवश्यकता होती तेथें तिच्याकडे पूर्ण दुर्लक्ष झालेलें आहे. आपल्यापुढें प्रश्न कोणते आहेत, आपलीं साधनें काय आहेत, आधीं निकड कशाची आहे याचा विचार करून हें कार्य चाललें आहे असें दिसत नाहीं. दूरदृष्टि, तत्परता, कळकळ, जबाबदारीची जाणीव यांचा मोठाच अभाव सर्वत्र दृष्टीस पडतो. जे अधिकारी या भिन्न योजना प्रत्यक्षांत आणीत आहेत, त्यांच्या ठायीं स्वयंप्रेरणा, व्यापक दृष्टि व सहकार्याची भावना या गुणांची उणीव आहे. भांडवल, यंत्रविशारद, तंत्रविशारद यांची उणीव आहेच. पण हें सर्व गृहीत धरूनहि जेवढें करणें शक्य होतें तेंहि केलेलें नाहीं.

भारताच्या राष्ट्रीय जीवनांतील कर्तृत्वाचा हा हिशेब आहे!

श्री. गोरवाला यांनीं येथील सार्वजनिक कार्यांतील नीतिमत्तेचा जो हिशेब दिला आहे तोहि असाच आहे. अगदीं सामान्य नोकरापासून थेट मंत्रिमंडळापर्यंत आपलें हें राज्ययंत्र अधोगामी, भ्रष्ट व कलंकित झालेलें आहे. आप्तइष्ट, भाऊबंद यांना आश्रयदान व अभयदान, वाटेल त्या कारभारांत हस्तक्षेप आणि प्रत्यक्ष अवदानांचा स्वीकार हे भ्रष्टतेचे सर्व प्रकार आपल्या कारभारांत जारी आहेत. सरळ मार्गानें, उघड्या हातानें आणि राजरोस व्यवहारानें आपलें काम कधींही होणें शक्य नाहीं असाच हिंदुस्थानभर नागरिकांचा समज झालेला आहे. पदोपदीं त्यांना अनुभव तसाच येतो. हें सर्व सांगून आपलें राज्ययंत्र असें आहे तोंपर्यंत कोणाच्याहि योजना यशस्वी होणें शक्य नाहीं असा आपला अभिप्राय गोरवाला यांनीं सांगून ठेवला आहे.

आपलें शील व आपलें कर्तृत्व यांचा या दोन समालोचनांतून दिसून येणारा नकाशा हा असा आहे. या दोन पंडितांनीं सर्वत्र हिंडून माहिती संकलित करून, प्रमाणें जमवून शेवटीं निर्णय दिला आहे. त्यांच्या श्रमाला महत्त्व आहेच, पण भारताच्या नागरिकांच्या डोळ्यांना हा नकाशा रोजच दिसत आहे. या पंडितांनीं शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करून लोकांच्या मताला पुष्टि दिली येवढेंच.

## कर्तव्यशून्यता आणि शीलभ्रष्टता

राष्ट्रीय जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत दिसून येणारी ही जी कर्तृव्यशून्यता व शीलभ्रष्टता तिचा आपल्या शिक्षणपद्धतीशीं संबंध असेल काय? आरंभीं जें विवेचन केलें आहे त्यावरून सर्वस्वीं नाहीं तरी अंशतः तरी या अधोगामित्वाला ती जबाबदार आहे हें मान्य केलेंच पाहिजे. नाहीं तर शिक्षणाचा मानवी जीवनाच्या घडाईत कसलाच संबंध नाहीं असें तरी म्हटलें पाहिजे. पण कोणताहि सुबुद्ध माणूस तसें म्हणेल असें वाटत नाहीं. तो चिंतामग्न होऊन आपल्या अध्ययन–अध्यापन व्यवसायाची तपासणी करूं लागेल. आणि तशी तपासणी करूं लागतांच त्याच्या असें ध्यानांत येईल कीं, आपल्या राष्ट्रीय जीवनाच्या इतर क्षेत्रांत जे दोष, जीं वैगुण्यें, ज्या उणीवा व जे प्रमाद दिसून येतात ते सर्व या शिक्षणक्षेत्रांतहि दिसून येतात. सर्व सामाजिक जीवनाचा मुळारंभ म्हणजे जें शिक्षण त्यालाहि यांतून मुक्त ठेवण्याची कसोशी कोणी केलेली नाहीं.

अंतिम हेतु, अंतिम साध्य याविषयाची अनिश्चितता हा फार मोठा दोष भारतीय राज्य-कारभारांत आहे असें वरील दोन्ही पंडितांचें मत आहे. शिक्षणक्षेत्रांतहि तेंच आहे. आपल्याला नेमकें काय घडवावयाचें आहे, या देशाचें भविष्यकाळचें चित्र कसें काढावयाचें आहे हेंच येथील सत्ताधारी लोकांचें निश्चित झालेलें नाहीं. त्यामुळें भिन्नभिन्न धोरणें वाता-


अनुक्रमणिका

वरणांत तरंगतांना दिसून येतात. साहित्य, विज्ञान, स्थापत्य यांतील उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत वावरणाऱ्या व त्यासाठीं सरकारचें साह्य मिळविण्याची खटपट करणाऱ्या लोकांच्या तुम्ही मुलाखती घ्या. ते सांगतील कीं, उच्च शिक्षणाचें सरकारला महत्त्व वाटत नाहीं असें त्यांना सांगण्यांत आलें आहे. सरकारचें सर्व लक्ष सध्यां प्राथमिक शिक्षणाकडे आहे, हें ऐकून आपणास अत्यंत विस्मय वाटेल. सरकार राष्ट्रीय विकासाच्या योजना भराभर आंखीत आहे, आणि उच्च शिक्षण घेतलेल्या अधिकाऱ्यांवांचून त्यांत एक पाऊल पुढें पडणार नाहीं. इंजिनियर, शास्त्रज्ञ, कारभारी, प्रवक्ते, गणिती, आंकडेशास्त्रज्ञ, हिशेबनीस यांच्यावांचून या क्षेत्रांत पान हलणार नाहीं. यांची संख्या अगदीं अपुरी आहे अशी केन्द्र सरकारची सारखी तक्रार आहे. परदेशांतून दर ठिकाणीं तज्ज्ञ आणावे लागत आहेत. तरी या देशांतील कांहीं प्रांतांतील शासनाचे सूत्रधार, आम्हांला उच्च शिक्षणाचें महत्त्व वाटत नाहीं, असें म्हणूं शकतात. हें आश्चर्य नव्हे काय? पण आतां हें आश्चर्य राहिलेलें नाहीं. सर्वत्र क्षेत्रांत हा प्रकार आहे. आपल्याला काय साधावयाचें आहे, काय घडवावयाचें आहे हें त्यांचें त्यांच्या मनाशींच ठरलेलें नाहीं. छिनी व हातोडा घेऊन दगडापाशीं बसलेल्या पाथरवटाच्या मनांत मूर्ति गणेशाची घडावयाची आहे कीं विष्णूची कीं दत्ताची हेंच जर ठरलेलें नसेल आणि हें ठरण्यापूर्वी तो छिनी चालवूं लागेल तर त्या दगडाची जी अवस्था होईल ती सध्यां आपल्या देशाची होत आहे.

**आधीं आर्थिक जीवन समृद्ध करा.**

वास्तविक या देशाचें आर्थिक जीवन समृद्ध करणें हें सरकारचें पहिलें कर्तव्य आहे. सरकार तसें बोलूनहि दाखवितें. पण मग त्यासाठीं उच्च शिक्षणावर सर्व शक्ति, धन, सामर्थ्य, कार्यक्षमता प्रथम खर्च केलें पाहिजे हें जें कोणालाहि मान्य होणारें धोरण तें मात्र सरकारला मान्य होत नाहीं! या बाबतींत आध्यात्मिक संस्कृतीचा अभिमान व ऐहिक पाश्चात्य विद्येचा कांहींसा तिरस्कार हाहि अनुभवास येतो. म्हणजे याहि बाबतींत अजून येथील भाग्यविधात्यांचीं मनें सुनिश्चित झालेलीं नाहींत. भारतीय संसदेचे एक काँग्रेसपक्षीय सदस्य टी. टी. कृष्णम्माचारी यांचें असें स्पष्ट मत आहे कीं, सरकारला–काँग्रेसपक्षाला–शास्त्रज्ञ पंडित, तज्ज्ञ यांच्याबद्दल दूरीभाव आहे. हें धोरण घातक ठरेल असें त्यांनीं बजावलें आहे. सेंट्रल बँकेच्या अधिकारपदावर अगदीं साधु पण निर्गुण निराकार माणसाला नेमण्यास काय होईल याचा विचार काँग्रेसनें करावा अशी त्यांची सूचना आहे. ('भारतज्योति' २६-११-५०) त्याच लेखांत कृष्णम्माचारी यांनीं अन्यत्र असें सांगितलें आहे कीं, १९४६ नंतर बहुतेक सर्व प्रांतांतील अधिकारी, मंत्री व पंतप्रधान यांच्याशीं अनेक वेळां चर्चा करण्याचा प्रसंग त्यांना आला. त्यांवरून त्यांच्या असें ध्यानांत आलें कीं, कांहीं अपवाद वजा केले तर या अधिकारीवर्गस्थ सज्जनांच्या मनांतु आपल्याला काय घडवावयाचें आहे, आपण आपल्या प्रांताचें भावी स्वरूप असें करणार आहोंत याविषयीं कांहींहि निश्चित कल्पना नव्हत्या. देशाच्या एकंदर विकासाची जी कहाणी तीच

शिक्षणाची ! या शिक्षणाचा हेतु कोणता, आपण ज्या योजना आंखीत आहोंत त्यांच्या दृष्टीनें हें आवश्यक आहे कीं नाहीं, आपल्याला आध्यात्मिक बल वाढवावयाचें आहे कीं आधिभौतिक, याविषयीं कांहींच निश्चित नसल्यामुळें सध्यां आपण समुद्रांत तारूं हाकारलें आहे एवढेंच निश्चित आहे. कोठें जावयाचें तें अजून ठरावयाचें आहे !

शास्त्र, साहित्य, गणीत, राजकारण. अर्थशास्त्र या विद्यांविषयींच अशी साशंक दृष्टि असल्यामुळें या विद्यांचें अर्जन करूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांबद्दल या देशांत अत्यंत चमत्कारिक अनास्था व ईर्ष्या निर्माण होत आहे असें वाटतें. दैन्य व दारिद्र्य यांनीं हा वर्ग नित्य गांजलेला आहे. अशा वेळीं राष्ट्रीय सरकार आल्याबरोबर पहिली गोष्ट म्हणजे अर्थार्जन करून विद्यार्जन करण्याची सोय निर्माण करून देणें ही होय असेंच कोणालाहि वाटलें असतें. त्या दृष्टीनें सकाळच्या किंवा रात्रींच्या वेळीं चालणाऱ्या विद्यापीठांची स्थापना तांतडीनें व्हावयास हवी होती. पण येथें तर सर्व विपरीत प्रकार दृष्टीस पडतो. सकाळच्या विद्यापीठांची असलेली सोय कांहीं ठिकाणीं नष्ट करण्यांत आली असून हजारों विद्यार्थ्यांच्या आकांक्षांवर अक्षरशः विरजण घालण्यांत आलें आहे. श्रीमंतांतला श्रीमंत असा अमेरिका देश. तेथें नोकरी करणाऱ्या विद्यार्थ्यांच्यासाठीं उन्हाळ्यांत वर्ग आहेत, रात्रीं वर्ग आहेत, फीच्या सवलती आहेत. सर्व सोयी आहेत. 'स्वतः कष्ट करून शिका' असा तेथल्या अधिकाऱ्यांचा संदेश आहे. आणि गरिबांतला गरीब हिंदुस्थान देश. तेथें 'तुम्हीं बापाच्या पैशावरच शिकलें पाहिजे.' असा संदेश मिळत आहे ! असलेल्या सोयी नष्ट करून उच्च शिक्षण अवघड, दुष्प्राप्य व महाग करून ठेवण्याची वृत्ति जेथें आहे तेथें इतर बाबतींत या विद्यार्थीवर्गाविषयीं किती जिव्हाळा असेल तें सहजच कळून येईल. या देशांत सध्यां विद्यार्थ्यांच्या जमावावर अगदीं सहजपणें लाठीमार, अश्रुधूर मार किंवा गोळीबार होऊं शकतो. वास्तविक सत्ता हातांत येतांच सरकारनें आपण होऊन प्रांतोप्रांतींच्या विद्यार्थ्यांच्या संघटना निर्माण करणें अवश्य होतें. यांतूनच पुढें अखिल राष्ट्रीय संघटना निर्माण झाली असती. पण विद्यार्थी-संघटना ही एक महाशक्ति आहे असें आतां सरकारचें मत राहिलेलें नाहीं. यामुळें या वर्गाविषयीं कोठेंहि जिव्हाळा राहिलेला नाहीं. त्यांच्यांत शिस्त नाहीं. ज्ञानलालसा नाहीं, गुरुजनाविषयीं आदर नाहीं, राष्ट्राच्या उत्कर्षाची तळमळ नाहीं—अशा उद्वेगानें शिव्या द्याव्या कीं आपली जबाबदारी संपली असेंच सर्वत्र धोरण आहे.

शिक्षणाच्या क्षेत्रांतील मूलभूत धोरणाविषयींचा व्यापक विचार सोडून आपण प्रत्यक्ष शिक्षणाच्या विद्यालयांत येऊन तेथें तपासणी केली तरी हाच गोंधळ आढळेल. येथेंहि आपण कोणती मूर्ति घडविणार आहोंत, तिचीं साधनें कोणतीं आहेत व त्या साधनांनीं आपल्या शिष्यांची ती मूर्ति घडत आहे कीं नाहीं याचा हिशेब घेऊन लोक वाटचाल करीत आहेत असें दिसत नाहीं. नाहीं तर येथें एक रानटीपणाचा प्रकार जो रूढ होऊन बसला आहे तो बसला नसता. निदान स्वराज्य आल्यावर तरी तो नाहींसा झाला असता.

## साध्यापेक्षां साधनावरच भर

सध्यां अध्यापनाचीं जीं विद्यालयें आहेत तेथें सर्व भर पद्धतीवर आहे, ज्ञानप्राप्तीवर नाहीं, विद्यार्थ्यांना त्या त्या विषयाचें ज्ञान किती मिळालें ही कसोटी समजण्याऐवजीं तें कोणत्या पद्धतीनें दिलें जातें ही अध्यापनाची कसोटी समजली जाते. बी. टी. च्या परीक्षेला पाठांच्या निरीक्षणासाठीं जे परीक्षक नेमलेले असतात त्यांत सर्व विषयांचे तज्ज्ञ असतात असें नाहीं. आणि मग ज्याला संस्कृतचा मुळींच व्यासंग नाहीं तो संस्कृतचा पाठ पहातो. सोय करतां येत नाहीं म्हणून हें घडत असेल असें कोणास वाटेल, पण तसें नाहीं. हें सर्व विचारपूर्वक घडतें. याला कांहीं हरकत नाहीं असेंच मत रूढ आहे. कारण कोणत्या पद्धतीनें शिकविलें जातें एवढेंच पहावयाचें असतें ! शिक्षणक्षेत्रांतील विपरीतपणाची ही पराकाष्ठा आहे हें कोणाच्याहि ध्यानांत येईल. ज्याला संस्कृत येत नाहीं तो संस्कृतच्या पाठाची पद्धति पहाणार म्हणजे काय करणार ? प्रश्न विचारले कीं नाहीं, विद्यार्थी हात वर करतात कीं नाहीं, फळा वापरला कीं नाहीं, इत्यादि चेष्टितें तो फक्त पाहूं शकेल. तीं चेष्टितें पाहून पाठाची परीक्षा करणें यापेक्षां जास्त रानटीपणा जगांत असूं शकेल असें मला वाटत नाहीं. पण तो रानटीपणा शास्त्र म्हणून रूढ आहे. विद्यार्थ्यांची अंतिम मूर्ति कशी घडवावयाची आहे, याचें ज्यानें चिंतन केलें आहे तो क्षणभर तरी ही पद्धति चालूं देईल काय ? पण तेंच ठरलेलें नाहीं, जें घडेल तें घडेल, असेंच जेथें धोरण आहे, तेथें ज्ञानप्राप्तीपेक्षां चेष्टितांना महत्त्व प्राप्त झालें तर नवल काय ?

## हास्यास्पद कर्मकांड

जुन्या काळच्या कर्मकांडाला आपण हंसत होतों, आणि अजूनहि हंसतों. पानाभोंवतीं पाणी फिरविणें, नाक धरणें, मान हलविणें, टिळे-माळा करणें हें सर्व कर्मकांड आहे. त्याला हंसण्याचें कारण असें कीं, त्याचा आणि अंतिम प्राप्तव्याचा कांहीं संबंध नाहीं असें आपणास वाटतें. एवढ्यामुळें हें कर्मकांड हास्यास्पद असेल तर सध्यांचें शिक्षण शतशः हास्यास्पद आहे. कारण त्यांत कर्मकांडावांचून कांहींच शिल्लक राहिलेलें नाहीं. आपण ज्या पद्धती अंगीकारीत आहोंत त्यांचें प्रत्यक्ष फल काय मिळत आहे हें पाहून त्याप्रमाणें त्या पद्धतींत सुधारणा करणें किंवा त्यांचा त्याग करणें, असें धोरण असलें तरच त्या व्यवस्थेंत जिवंतपणा आहे, असें म्हणतां येईल. एरवीं तें कर्मकांडच होय. 'डायरेक्ट मेथड' येथें अनेक वर्षें स्वीकारली गेली आहे. ज्या पश्चिमेंतून ती आली तेथें तिचा प्रयोग होऊन मातृभाषेखेरीज इतर भाषा अशा पद्धतीनें शिकविणें अत्यंत हानिकारक आहे असें ठरूनहि बरींच वर्षें झालीं. विद्वानांनीं, पंडितांनीं तिचा निषेध केला व शिक्षणक्षेत्रांतील लोकांनीं ती बंद केली पण आपण अजून तिला दृढपणें चिकटून आहोंत. विद्यार्थ्यांचें इंग्रजीचें ज्ञान शून्यावर येऊन ठेपलें आहे, तरी आपण अजून चिंतन करण्यास प्रारंभ केलेला नाहीं. बी. टी. च्या पद्धतींत विद्यार्थ्यांकडून 'काढून घेण्याचें' जें तत्त्व आहे त्याची अशीच स्थिति आहे. तें इतकें यांत्रिक, हानिकारक व हास्यास्पद झालें आहे कीं, अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ जॉन ड्यूई संतापून म्हणाले कीं, वाटेल तें करा, पण हें 'काढून घेणें' बंद करा. एक शिक्षक विद्यार्थ्याला शिकवीत असतां पुढील प्रश्नोत्तरें झालीं. अल्लाउद्दिनानें चितोडास काय घातला ?—वेढा. मग राण्यानें त्याला काय दिलें ?—तोंड. लढाईंत त्याचा काय उडाला ?—धुव्वा ! जुन्या कर्मकांडांतून याहून निराळें काय होतें ? उपडी असलेलीं पात्रें उताणीं करावीं, —केलीं. डावीकडून उजवीकडे पाणी फिरवावें, —फिरविलें. नाक धरावें,—धरलें. असा खाक्या सर्वत्र आहे. काढून घ्यावें-घेतलें; प्रश्न विचारावे —विचारले. इंग्रजी भाषा इंग्रजींतूनच शिकवावी— शिकविली ! या सर्वांचा आपल्या विद्यार्थ्यांवर परिणाम काय होत आहे याचा विचार करणें अवश्य आहे हें दोन दोन पिढ्यां आपल्या ध्यानांत येत नाहीं. धार्मिक कर्मकांडांत फल परलोकीं मिळावयाचें असतें. तें मिळालें कीं

नाहीं हें पहाण्याची सोय नसते. त्यामुळें त्यावर श्रद्धा ठेवणें हें एक वेळ क्षम्य ठरेल. पण ज्या शिक्षणपद्धतीचें फल इहलोकींच भोगावयाचें आहे तिचेंहि कर्मकांड करून टाकणें व त्यावरहि तशीच श्रद्धा ठेवणें हें कोणत्या युगाचें लक्षण ?

### पेलेनासें झालेलें ओझें

या कर्मकांडाप्रमाणेंच आणखी एक विचित्र दोष आपल्या शिक्षणक्षेत्रांत निर्माण होऊं पहात आहे. आपल्याजवळ पैसा किती आहे, नव्या सुधारणा करण्यास योग्य अशी माणसें किती आहेत याचा विचारहि न करतां ज्याप्रमाणें राष्ट्रीय नियोजन चालू आहे त्याचप्रमाणें शिक्षण-क्षेत्रांतहि कांहीं प्रकार चालू आहेत. आणि ग्यानचंद, गोरवाला यांसारखे पंडित इकडे दृष्टि वळवितील तर राष्ट्रीय नियोजनावर त्यांनीं जी टीका केली आहे तीच ते येथेंहि करतील. बी. टी. कॉलेजचे शिक्षण हेंच उदाहरण घ्या. शिक्षण शास्त्राचें सूक्ष्म अध्ययन करण्यासाठीं अशी एखादी संस्था स्थापून अगदीं निवडक अभ्यासू पंडितांना तेथें नेमून त्यांना वृत्ति देणें यापलीकडे या देशाला कांहींहि पेलणें शक्य नाहीं. पण आतां प्रत्येक शाळेला या पदवीनें विभूषित शिक्षक अवश्य होऊन बसले आहेत. आधींच दरिद्री असलेल्या शिक्षकवर्गावर यामुळें खर्चाचा असह्य भार पडला आहे. शाळांना हें ओझें पेलेनासें झालें आहे. आणि टेकीस आलेल्या विद्यार्थ्यांच्या पालकांना जीव नकोसा झाला आहे. शिक्षणशास्त्राचें अध्ययन प्रत्येक शिक्षकानें करणें आवश्यक आहे, हें मान्य केलें तरी आज हा शिक्षक समाजाला परवडेल काय व त्याच्यावांचून अगदीं अडेल काय, हा विचार करणें आवश्यक आहे. कारण प्रत्येकाला अन्न, पाणी व वस्त्र हें मिळणें जास्त आवश्यक असून त्यासंबंधींच्या योजना आपण भराभर रद्द करीत आहोंत. अशा स्थितींत ब्रिटनअमेरिकेंत निर्माण झालेल्या सुधारणा आपण स्वीकारणें म्हणजे राष्ट्राच्या खजिन्याचें व त्याबरोबरच तारतम्य बुद्धीचें दिवाळें जाहीर करण्यासारखें आहे. आज परीक्षा पद्धतीसंबंधीं जी ओरड चालू आहे तिच्याविषयीं अशीच भीति वाटते. या पद्धतींत अनेक दोष आहेत हें खरें आहे. पण तिच्याऐवजीं ज्या दुसऱ्या पद्धती सुचविल्या जात आहेत त्या इतक्या अवघड, खर्चाच्या व येथल्या परिस्थितीच्या विरोधीं दुष्कर आहेत कीं त्यांचा विचार करणेंसुद्धां अशक्य आहे. पण सध्यांच्या एकंदर जमान्यावरून पहातां खर्चाचा हिशेब, त्या नव्या पद्धतीचें फल, शक्याशक्यता यांचा विचारहि न करतां एक दिवस सध्यांची पद्धत रद्द केली जाईल व नवा गोंधळ सुरू होईल अशी भीति वाटते. प्रि. के. रा. कानिटकर यांनीं नुकतीच मुलांच्या स्वतंत्र अभ्यासास उत्तेजन मिळावें म्हणून एक नवी योजना सुचविली आहे. पण पद्धतींत थोडा बदल करतांच नकाशे, पुस्तकें, खुर्च्या, फळे व इतर साहित्य यांचा खर्च अनेक पटीनें वाढेल हें त्यांनींच सांगून ठेवलें आहे. आणि हें साहस आहे असें म्हणून उदार लोकांना तो प्रयोग करून पहाण्याची विनंति केली आहे. अर्थात् धनिकांनीं आपला पैसा खर्च करून नवे प्रयोग करून पहावे, त्याला कोणाचीच हरकत येण्याचें कारण नाहीं. येथें त्याचा उल्लेख एवढ्यासाठींच केला कीं, आपल्या सध्यांच्या स्थितींत कोणतीहि सुधारणा करणें याचा अर्थ शिक्षण महाग करून अप्रत्यक्षपणें त्याचा प्रसार कमी करण्यासारखें आहे हें ध्यानीं यावें. हा तरतम भाव आपल्या ध्यानीं येत नाहीं, हेंच अनेक अनर्थांचें कारण आहे. पुणें विद्यापीठाचे चालक सर्व पोस्ट इंटरमीजिएट शिक्षण पुण्यापासून पांच मैलांवर असलेल्या गणेशखिंडींत नेऊं पहातात, आणि ऑक्सफर्ड–केंब्रिज येथें निर्मिण्याचा घाट घालतात, हें याचें उत्तम उदाहरण आहे. केंब्रिजचा दोन तृतीयांश खर्च सध्यां तेथील सरकार चालवीत आहे. अनेक धनिक त्याच्या पाठीशीं उभे आहेत आणि त्या विद्यापीठाची परंपरा सहाशें वर्षांची आहे. यांतलें एकहि पुण्य पुण्याच्या पाठीशीं उभें नाहीं. तरी पण येत्या तीनचार वर्षांत पुण्यांत केंब्रिज निर्माण केलें जाईल यांत शंका नाहीं. आपल्या दारिद्र्यांत इतर सार्वत्रिक योजनांचें जें स्वरूप दडीस पडतें तेंच या केंब्रिजलाहि येईल.

### धनोत्पादक श्रम करण्याची सक्ति

आपल्या देशांतील कर्तृत्व व नीति यांचा आरंभीं दिलेला हिशेब आणि सध्यांची आपली दारिद्र्याची स्थिति यांचा विचार केला तर चीनमध्यें तेथील पुढाऱ्यांनीं अवलंबिलेलें धोरण येथें स्वीकारणें श्रेयस्कर होईल असें वाटतें. तेथें शाळा–कॉलेजांतील विद्यार्थ्यांना तेथें धनोत्पादक श्रम करण्याची सक्ति असते. दिवसाकांठीं दोन-तीन तास प्रत्येक विद्यार्थ्याला काम करावें लागतें. तेथील सैन्याविषयींसुद्धां हें धोरण आहे. प्रत्येक विभागाला कांहीं पडीक जमीन, एखादा कारखाना, एखादी खाण असें दिलेलें असतें. त्यांत श्रम करून त्या त्या विभागानें आपला खर्च भागवावयाचा असतो. लष्करी कार्यक्षमतेंत यानें कोणताहि उणेपणा येणार नाहीं असें अमेरिकन लष्करी तज्ज्ञांनीं मत दिलें आहे. हेंच धोरण विद्यापीठांसंबंधीं आहे. शाळेच्या इमारती बांधण्यापासून सर्व मोठी विद्यार्थी करतात. लष्कराप्रमाणें विद्यालयालाहि जमीन किंवा कारखाना दिलेला असतो. त्यांतून शक्य तो विद्यालयांचा खर्च भागवावयाचा असतो. एवढ्यानें सर्व खर्च भागणार नाहीं हें खरें. पण एक तर फार मोठा भार कमी होईल आणि राष्ट्राच्या योजनेस जे गुण अवश्य आहेत व ज्यांचा संपूर्ण अभाव आपल्या ठायीं आहे असें ग्यानचंद, गोरवाला इ. अभ्यासक सांगत आहेत त्यांची जोपासना करण्याची संधि मिळेल. तेथील शिक्षण सर्वांगीण होईल. त्यानें सहकार्य, जबाबदारी, योजकता या गुणांची जोपासना होईल व मुख्य म्हणजे धनोत्पादन व शिक्षण यांची सांगड घातल्यामुळें हा भार सुसह्य होईल.

वरील विवेचनावरून आपल्याकडे अखिल भारतांत सध्यां रूढ असलेल्या मूलोद्योग पद्धतीची वाचकांना आठवण होईल. तशी आठवण त्यांनीं होऊं देऊं नये अशी त्यांना नम्र प्रार्थना आहे. कारण आपल्या देशांत मूलोद्योग शिक्षणपद्धति चालू आहे ती आठवणसुद्धां अत्यंत कष्टदायक आहे. बौद्धिक प्रकर्ष, तात्त्विक चिकित्सा, बुद्धिनिष्ठा, शुद्ध ज्ञानाची



माझें घर मला म्हणतें, “ मला सोडून जाऊं नकोस. तुझा भूतकाळ येथेंच वसत नाहीं का ? ”

आणि रस्ता मला म्हणतो, “ चल, ये माझ्याबरोबर, कारण मी तुझा भविष्यकाळ आहे. ”

भक्ति यांविषयीं जो तिरस्कार गेल्या पंचवीस-तीस वर्षांत सर्वत्र पसरला आहे, त्याला अनुसरूनच ही मूलोद्योग पद्धति अंमलांत आलेली आहे असें दिसतें. याचे जे पाठ आज शाळांतून दिले जातात ते पाहिले व 'बेसिक शिक्षण व समवाय' या पुस्तकांत, या पद्धतीचे आदर्श पाठ दिले आहेत ते वाचले म्हणजे कोणाहि विचारवंताच्या मनांत भावी पिढ्यांच्या बौद्धिक संस्कारांविषयीं घोर चिंता निर्माण झाल्यावांचून रहाणार नाहीं. 'डायरेक्ट मेथड' व बी. टी.मधील 'काढून घेण्या'ची पद्धति यामुळेंच सध्यांच्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणांतून व्याख्या व नियम, यांचा संस्कार नष्ट झाला आहे; व्याकरण व भूमिति यांमुळें निर्माण होणारी सुबद्धता लुप्त झाली आहे; कोश हाताळण्याची संवय गेल्यामुळें शब्दांच्या अर्थच्छटांचें सूक्ष्म ज्ञान नाहींसें झालें आहे; पाठांतर नाहीं, शब्दज्ञान नाहीं, यामुळें भाषेचा मूळ पायाच ढांसळला आहे व कोणतेंहि सलग भाषण किंवा वाचन दहापंधरा मिनिटें ऐकावयास न मिळाल्यामुळें ज्ञानाच्या फुटीरपणापलीकडे त्यांच्या मनांत जुळणीच होत नाहींशी झाली आहे. यामुळें कॉलेजमध्यें शिकत असतांना आपल्यापुढें बसलेलीं मुलें हीं निर्गुण निराकार परब्रह्माचीं मूलरूपेंच आहेत कीं काय असें वाटूं लागतें. आतां यांत मूलोद्योग पद्धतीची भर पडून, राहिले साहिले बौद्धिक संस्कार नष्ट झाले म्हणजे त्यांचें परब्रह्माशीं तादात्म्यच होऊन, आध्यात्मिक उन्नति हें जें मूलोद्योग पद्धतीचें अंतिम ध्येय तें फारच लवकर साध्य होईल, अशी भीति वाटू लागते.

शेती, सूतकताई व सुतारकाम या तीन मूलोद्योगांच्या द्वारां विद्यार्थ्यांना शिक्षण द्यावयाचें असें या पद्धतींतलें मूल तत्त्व आहे. यामुळें शिक्षणाला जिवंतपणा येईल व सध्यांच्या केवळ तात्त्विक शिक्षणांतील दोष नाहींसे होतील अशी कल्पना आहे. पण या पद्धतीचे जे आदर्श पाठ दिलेले आहेत त्यांवरून तर्कनिष्ठ विचारसरणी, पूर्वज्ञान व नवें ज्ञान यांचा संबंध आणि कोणत्याहि विषयाचा एक ठरीव क्रम यामुळें होणारे बौद्धिक संस्कार होऊं न देणें येवढेंच फल यांतून मिळेल असें वाटतें. एका पाठांत सुताच्या तकलीवरून शिक्षक 'मोहन जो दरो'ची हकीकत सांगतात. आतां तकलीचा व मोहन जो दरोचा संबंध काय असा प्रश्न येईल. तो संबंध असा: सूत कातण्याची कला फार प्राचीन काळापासून आपल्याकडे माहीत आहे, हें प्राचीन अवशेषांवरून दिसतें. उदाहरणार्थ—मोहन जो दरो. एवढें म्हटल्यावर शिक्षकांनीं मोहन जो दरोची माहिती सांगावयाची. तेथली नगररचना समजावून सांगून समाजशास्त्राचें पाठ द्यावयाचे. तेथपर्यंत कोणत्या रस्त्यानें जावयाचे तें सांगून भूगोल शिकवावयाचा. दुसऱ्या एका पाठांत कापूस पिंजतांना तोंडाला फडकें कां बांधतात असा प्रश्न विचारून त्यावरून सर्व श्वसनशास्त्र व शरीर रचनाशास्त्र समजावून द्यावयाचें. सूत कोण कातते? रामा कातते. —अशा प्रश्नावरून भाषा, व्याकरण व वाक्यरचना शिकवावयाची. खरोखर तकली ही किती अजब चीज आहे!




## मुलांच्या बुद्धीचा विचका

हे जे संबंध जोडले आहेत ते अत्यंत आक्षेपार्ह आहेत. दोन वस्तूंचा संबंध जोडतांना त्यांत कांहीं तर्काचा, इतिहासाचा, कार्यकारणाचा धागा असावा लागतो. त्या दोन वस्तूंत कांहीं अंशीं तरी अविभाज्यता असावी लागते. तो संबंध व्यवच्छेदक असला तर जास्तच चांगलें. वरील पद्धतींत हे सर्व विचार धुळीस मिळविले आहेत. मुलांना असले विचित्र संबंध जोडण्याची संवय लागली तर त्यांच्या विचारशक्तीचें काय होईल याचा मूलोद्योग पद्धतीच्या पुरस्कर्त्यांनीं विचार करावा. शेती, तकली, पखाशी याचे यापेक्षां चांगले संबंध जोडून दाखविले तरी तें आक्षेपार्ह आहे. शिवाजीचें चरित्र सांगून झाल्यावर त्याच्या मृत्युमुळें जी परिस्थिति निर्माण झाली, ती सांगूनच संभाजीचा संबंध जोडला पाहिजे. असें केलें तरच इतिहास या शब्दाला अर्थ राहील. याच्यामध्यें कोणत्याहि कारणानें तकली किंवा पखाशी आणणें म्हणजे मुलांच्या बुद्धीचा विचका करण्यासारखें आहे. अगोदर भिन्न विषयांतील सर्व धागेदोरे शेती, तकली यांच्याशीं जोडणें अशक्य आहे. एके ठिकाणीं संगीत सत्यनारायणांत 'आत्मा' शब्द येतांच 'मम आत्मा हा गमला—' असें गाणें म्हणत. 'भीति' शब्द येतांच—'मूर्तिमंत भीति उभी—' असें म्हणत. आदर्श पाठांत जोडलेले संबंध यांसारखेच आहेत. दर ठिकाणी किंवा पुष्कळ ठिकाणीं शेती, तकली यांशीं संबंध जोडावयाचे म्हटलें तर हेंच होणार. आणि समजा, यापेक्षां जास्त चांगले संबंध एखाद्याला जोडतां आले तरी ते जोडणें आक्षेपार्ह आहे. बी.टी.च्या पद्धतींत जिज्ञासजागृतीचें जे तत्त्व आहे तें

अत्यंत शास्त्रशुद्ध आहे. शिक्षक तितके कष्ट करीत नाहींत म्हणून त्याचा विपर्यास होतो. पण मूलोद्योगांत मूळ तत्त्वच अत्यंत हानिकारक आहे.

## राष्ट्राचें पहिलें कर्तव्य

हें झालें मूलोद्योग पद्धतीनें विद्यार्थ्यांच्या मनावर होणाऱ्या संस्कारांविषयीं. पण मीं तिच्यावर उल्लेख केला तो धनोत्पादन व शिक्षण यांची सांगड घालण्याच्या तत्त्वासाठीं. तो हेतु तर सध्यांच्या रूढ पद्धतींत मुळींच साध्य होत नाहीं. शिक्षणाचा खर्च मात्र वाढतो आणि बौद्धिक तात्त्विक ज्ञानाच्या संस्काराला जो वेळ मिळावयाचा तो नाहींसा होतो. शिवाय विद्यार्थ्यांच्या उत्पन्नांतून शिक्षणाचा खर्च भागविण्याचा प्रयत्न करून शिक्षण स्वावलंबी बनवावें हें तत्त्व हरिपुरा काँग्रेसनें ठरावांतून वगळलें आहे, अशी माहिती 'बेसिक शिक्षण व समन्वय' या पुस्तकाच्या लेखकानेंच दिली आहे. तेव्हां मूलोद्योग पद्धतीनें नवें धन निर्माण होण्याचें लांबच राहून शिक्षणापायीं असलेलें धन वायां जाण्याचाच संभव आहे.

सध्यां भारतांत शिक्षणाच्या क्षेत्रांत प्रचलित असलेल्या अनेक पद्धति, तत्त्वें व विचार यांचा आपण विचार येथवर केला. तसें करतांना जीं मतें मांडलेलीं आहेत तीं कोणास पसंत पडणार नाहींत. पण महत्त्वाचा मुद्दा तो नाहीं. डॉ. ग्यानचंद, श्री. गोरवाला यांनीं आपल्या कर्तृत्वाचा व शीलाचा जो हिशेब दिला आहे त्यावरून आपली शिक्षणपद्धति देशांत कार्यक्षम माणसें निर्माण करण्यास असमर्थ ठरली आहे हा विचार आपण दृष्टिआड होऊं देतां कामा नये. म्हणून शिक्षणपद्धति बदलून आपण सुधारणा केल्या नाहींत तर देशाचा कारभार चालविण्यास लायक माणसेंच नाहींत अशी आपत्ति आपणावर कोसळणार आहे. या सुधारणा करतांना एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, आर्थिक उत्पादन वाढविणें हें जें सर्व राष्ट्राचें पहिलें कर्तव्य आहे तें ध्यानांत ठेवूनच आपण पुढें पाऊल टाकलें पाहिजे. आणि त्या दृष्टीनें विद्यार्थ्यांना स्वावलंबी होतां येईल अशी योजना आंखून शिक्षणाचा प्रसार करण्याचें धोरण ठेवणें आवश्यक आहे. निदान कॉलेजच्या शिक्षणांत. तरी हा उपक्रम सुरुवं कसा करतां येईल याचा विचार लोकांनीं केला पाहिजे. हजारों विद्यार्थ्यांचा एक मोठा प्रश्न यामुळें सुटेल व राष्ट्राला कर्ती माणसें मिळवून देणें हें जें शिक्षणाचें कार्य तें साध्य होईल.



## स्वप्नांचे अवशेष

एकांतीं हृदयीं कुजतें जें जें गाणें,
येतात प्रीतिचे अपुल्या त्यांत उखाणे,
जीवनिंच्या उत्कट संयोगित भावांचें
होईल कुणातरि रसवंतीचें लेणें.

दृक्क्षेपें शोधुनि शिलेंत अक्षर भाव
शिल्पकार रंगे घालित तीवर घाव,
उतरतां मनींचें प्रत्यक्षांत परोक्ष
किति येति पहाया मानव–निर्मित देव.

ग्रीष्मांतिल शोषुनि पहिली धार मृगाची
हो पुलकित काया थकल्या गन्धवतीची;
हिरवळतें, स्थिरतां पोटीं बीज जगाचें
षण्मासें चढते कांति मुखीं मातेची.

कवळून उराशीं स्वप्नांचे अवशेष
धुन्डिले तयानें अनवाणी परदेश;
तव चढतां चरणींतील तयांच्या ओठीं
जग डुललें परिसुनि वाणींतिल उन्मेष.

कचपाशीं मोकळा वाळवितां रवि-किरणीं
उरि स्फुरती विरती कंचुकींत आठवणी
होतेंच जायचें, तरि तें आज कशाला?
हृदयींचें कढलें शमती भाव मुस्क्यांनीं!

बांधुनी तयाची होतां तुंग हवेली
वाटलें तया नभ नमलें आलें खालीं;
जाहला मुकेदां अनपेक्षित भूकंप
चिरडला चिरंतन अहंकार पातालीं!

लाभेल कधींहि न हृदया तुजसि हवें जें
वाहसी कशा मग विफल जिवाचें ओझें
हा संचय देहीं अस्थि-मांस-रक्ताचा
मृत्तिका, न जेथें अक्षय प्रीति विराजे!

—प्रफुल्ल दत्त

त्या रात्रीं शैला शेखरला बिलगली तेव्हां तिच्या आवेगाला सीमा नव्हती.

# तुझी माझी प्रीत!

मधुविषयीं मनाला तसं वुजावीत असतांना,
त्याच्याशीं प्रत्यक्ष लगट करण्यापूर्वींच
तिनं आपल्या मनाला सावरलं
कारण—



एस. के. जोशी

उंबरठ्यावरचं माप उजव्या पायानं लाथाडून शैला शेखरबरोबर त्याच्या घरांत आली. लग्नाच्या त्या पहिल्या रात्रींच तिची आणि शेखरची त्याच्या वरच्या खोलींत झोंपण्याची व्यवस्था केली गेली होती. मंडळी गेल्यावर शेखर वरती आला. उजव्या हातानं बटन दाबल्यावर खोली प्रकाशानं उजळून गेली. समोरच्या पलंगावर गादी घालून ठेवली होती. "रम्य स्वप्नें" अशीं अक्षरें तांबड्या दोऱ्यानं भरलेल्या दोन उशा पांढऱ्या चादरीची शोभा वाढवत होत्या. शेखरनं मोठा दिवा विझवून पलंगाजवळील बारीक प्रकाशाचा दिवा लावला आणि गादीवर पडल्या पडल्या लग्नांत मिळालेलीं पुस्तकं चाळण्यास सुरवात केली.

घड्याळांत दहाचे टोले पडले. प्रत्येकजण निजण्याच्या तयारीला लागला. नवखी शैला अवघडून बसली होती. घड्याळ्याच्या ठोक्याबरोबर तिनं निःश्वास टाकला. अंथरुण घालणाऱ्या लोकांचे तिनं आभार मानले. मनांतून वरती शेखरकडे जाण्यास ती अधीर झाली होती. लग्नाच्या अगोदर तिनं त्याला पाहिलं होतं. लग्नांत ती त्याच्याजवळ बसली होती. पण शेजारीं भटजी होते. बाजूला तिचे आईबाप होते. पुढंमागं माणसं होतीं. त्यामुळें ती त्याच्याकडे भुरळल्या नजरेनं बघूं शकली नव्हती. कुणाचं लक्ष नाहीं असं पाहून ती त्याच्याकडे चोरून कटाक्ष टाकी, पण मुंडावळ्यांच्या त्या भाऱ्यांत तिला त्याचं तोंड नीटसं न्याहाळतां आलं नाहीं. त्यामुळं त्याच्याजवळ त्याला चिकटून उभं रहावं, त्याच्या भरदार छातीवर आपलं मस्तक टेकावं आणि 'आपल्या शेखरला' डोळे भरून पहावं असं तिला वाटत होतं. त्याच्या भेटीसाठीं ती हपापली होती. त्याच्या मिठीसाठीं ती आसावली होती. सकाळपासून ती वाट पहात होती ती या क्षणांचीच. पण दिवसभराच्या गडबडींत तिला तें शक्य नव्हतं. सकाळपासून आपल्या इच्छेला तिनं आवरलं होतं.

लज्जेनं वागणुकींत संयम राखला गेला होता. पण घड्याळांत दहाचे ठोके पडले, माणसं झोंपीं जाऊं लागलीं, गप्पा घालणं सुरू झालं आणि शैलेनं निःश्वास टाकला. इतका वेळ अवघडत बसलेल्या शैलाला आतां आपली सुटका होईल म्हणून हायसं वाटलं. मनांतली ओढ आतां पुरी होणार म्हणून ती समाधान पावली. "शैला, तूं आतां वर जा." हे शब्द ऐकायला तिचे कान वखवखले आणि ते शब्द आपल्या सासूकडून तिनं ऐकले. घड्याळाच्या शेवटच्या ठोक्याबरोबर तिनं पुन्हा एकदां निःश्वास टाकला.

पाण्यानें भरलेला चांदीचा-तांब्या आणि भांडं घेऊन शैला वर निघाली. जिना चढतांना तिची छाती धडधडत होती. अंग शहारून निघत होतं. घशाला कोरड पडली होती. कानांतून वाफा निघत होत्या. शेखरला बघायला डोळे अधीर झाले होते. ती वर आली तेव्हां पाय अडखळले. शेखर दृष्टीस पडला, काय करावं, कसं जावं म्हणून जीव घुटमळला; पण शेखरनं तिला पाहिलं नव्हतं. तो वाचत होता. ती हळूच आंत आली. टेबलावर तांब्या ठेवतांना भांड्याचा आवाज झाला. शेखरनं पुस्तक मिटलं. तो पलंगावर उठून बसला. शैला टेबलापाशींच लांब उभी होती. दोघं एकमेकाकडे पहात होतीं. तोंडं बंद होतीं. तोंडाचं काम डोळ्यांनीं सुरू केलं होतं. डोळे बोलत होते आणि हसत पण होते. शेखर म्हणाला,—पण तो काय म्हणाला हें तिला नीटसं कळलं नाहीं.

"शैला, ये ना."

तिनं मान खालीं घातली होती. पदराच्या टोकाशीं चाळा चालला होता. पायांच्या बोटांनीं जमीन उकरली जात होती. गालिच्यावरचा गुलाबी रंग तिच्या गालांवर उमटत होता. तिला वाटलं, शेखर आपल्याला बोलावतो आहे. त्याला जवळून पहाण्याची आपल्याला इच्छा आहे. आतां जवळही कोणी नाहीं. कुणाचं बन्धन नाहीं. कुणी अडवणार नाहीं. मग सकाळपासून लागलेली हुरहूर, ती रुखरुख आतां कुठें गेली?

ती जागची हलत नाहीं असं पाहून शेखर उठला. दार मिटून त्यानं कडी लावली. आणि मग टेबलाजवळ उभ्या असलेल्या आपल्या नववधूजवळ, लाजऱ्या नवरीजवळ, अबोल शैलेजवळ जाऊन तिला अगदीं खेटून तो उभा राहिला. ती दूर सरकली. थोडी लाजून. लटकी रागावून. तो पुन्हा जवळ गेला. त्यानं तिचा हात धरला. तिला बाहेर गॅलरींत नेलं आणि आपल्या बाहूपाशांत धरून तिची हनुवटी वर करून तो म्हणाला,—!

तिला आतां धीर आला. तोंडून शब्द बाहेर पडूं लागले. अंगाचा कंप कमी झाला. छातीवर डोकं टेकून ती उभी होती. समोर चंद्र होता. बाजूला जाईच्या फुलांचा वेल गॅलरीपर्यंत वर चढला होता. त्याच्या फुलांचा वास हवेंत भरून राहिला होता. मधूनच वाऱ्याची झुळूक येई आणि शैला शेखरला आणखी बिलगे. शेखरनें पुढे वांकून फुलांचे दोन गुच्छ काढले आणि तिच्या डोकींत खोवले. आधींच सुगंधित तेलानं न्हालेल्या त्या केसांत आणखीनच सुगंधाची भर पडली. शेखरनं हात धरून तिला आंत आणलं आणि आपल्या अगदीं जवळ घेऊन गादीवर लवंडतां लवंडतां डाव्या हातानं उशाशीं जळत असलेला तो बारीक दिवा मालवून टाकला.

सकाळीं ती जागी झाली तरी शेखर अजून निजला होता. पांघरूण बाजूला झालं होतं. पोटऱ्या आणि दंड उघडे पडले होते. त्याच्या त्या गोऱ्यापान अंगकांतीकडे शैला निरखून पाहूं लागली. बडोद्याला असतांना तिनें म्युझिअममध्यें दोन नग्न माणसांचे संगमरवरी पुतळे पाहिले होते. शेखरच्या त्या उघड्या पोटऱ्यांशीं आणि दंडाशीं ती त्यांची तुलना करूं लागली. त्याच्या गोऱ्यापान पिळदार पोटऱ्या आणि भरदार दंड तारुण्यानें रसरसलेले होते. एक हात त्यानं उशीसारखा डोक्याखालीं घेतला होता. त्यामुळें दंडाचा गोळा उठून दिसत होता. काळ्याभोर केसांच्या बटा कपाळावर आल्या होत्या. डोळे मिटल्यामुळें पापण्यांची रांग संथ होती. ओठ विडा खाल्ल्यासारखे लाल होते. आणि तारुण्यानं तरारलेलं आणि आरोग्यानं संपुष्ट असलेलं शेखरचं तें पोलादी शरीर अगदीं जवळून ती पहात होती. तिच्या मनांत संकोच नव्हता. भीति नव्हती. लज्जा नव्हती. ती एकटी होती. दाराला कडी होती. शेखरसुद्धां झोंपला होता. आणि चित्रकृतींतच आढळणारं तें सौंदर्य ती डोळ्यानी पहात होती. शेखर जागा असता तर!...तर तसं तिला पहाता आलं नसतं. डोळे लाजले असते. अंगाला कंप सुटला असता. दृष्टि भिरभिर फिरली असती. नजरेनं तसं बिनविरोध पहाणं टाळलं असतं. कटाक्षांचे चोरून हल्ले झाले असते. म्हणजे सगळं चोरून आणि लाजून. पण आतां शेखर झोंपला होता. आणि तसं पाहणं शक्य होतं. ज्या क्षणाला ती आसावली होती, ज्यासाठीं अधीर झाली होती तो क्षण हा होता असं तिला वाटलं. ती त्याच्या अगदीं जवळ गेली. तिनं त्याला निरखुन पाहिलं. समाधान होईपर्यंत अगदीं जवळून पाहिलं. डोळ्यांनीं पिऊन कांठोकांठ हृदयांत सांठवावा. इतका शेखर तिला सुंदर वाटला. तिला अभिमान वाटला. आपल्या भाग्याचा स्वतःच तिनं हेवा केला. त्याच्या तोंडाजवळ ती वांकली. तिला वाटलं, अगदीं नाजुकपणानं ह्या मिटल्या अधरांतून अमृत प्यावं. ती बावरली. उगीचच हंसली. कोणी नसतांना लाजली. उगीचच नजर इकडे तिकडे फिरली. आणि समोरच्या आरशांत तिला तिच्या प्रतिबिंबानं चिडवलं. खिजवलं. डिंवचलं. मग ती दूर झाली. आरशावरची पडदा तिनं झरकन ओढून घेतला. पुन्हा जवळ आली. "घेऊं का नको," ह्या संभ्रमांत तिनं अगदीं अलगदपणानं आपले ओठ त्याच्या ओठांवर टेकवले आणि ती झटकन दूर झाली. शेखर उठेल आणि आपल्याला पकडील कीं काय अशी तिला भीति वाटली. आरशावरचा पडदा दूर करून मग त्यांत पाहून ती हंसली. आणि आपल्याच गालावर टिचकी मारून मनाशींच पुटपुटली, 'चल, चावट कुठली.' मग ती पुनः एकदां मनापासून हंसली. शेखरजवळ येऊन तिनें त्याचं पांघरूण गळ्यापर्यंत ओढून लावलं आणि "अच्छा, जाते हं" असं म्हणून अलगद हातांनीं कडी काढून ती खालीं निघून गेली.

शेखर ऑफिसमध्यें गेला होता. दुपारीं ती त्याच्या खोलींत एकटीच होती. शेखरची खोली तिनं आवरली. ती सायकल, तें अलगूज, तीं पुस्तकं, तो कॅमेरा. तिन सगळं व्यवस्थित लावलं. त्या गोष्टीपासून तिला शेखरच्या आवडीनिवडी कळल्या. तिनें त्याचे कपडे व्यवस्थित ठेवले. सगळी खोली झकपक करून टाकली. मग ती एक पुस्तक वाचत बसली. वाचणं होत नव्हतं. लक्ष लागत नव्हतं. पुस्तक मिटलं गेलं. रात्रीचे ते गोड क्षण डोळ्यांपुढं येऊं लागले. मग ती हंसली. लाजली. आपल्यांतसुद्धां बदल झालाय् असं तिला वाटलं.

स्वतःकडे जेव्हां तिनं पाहिलं तेव्हां हातांत हिरवा चुडा तिला दिसला. गळ्यांत काळी पोत आणि मंगळसूत्र दिसलं. अंगाला हळदीचा पिवळेपणा अजून कायम असलेला दिसला. आधींच गौर आणि तकतकीत असणार अंग हळदीनं अधिकच तजेल झालेलं दिसलं. वक्षस्थळांचा उभारपणा तिला आज जास्त जाणवला. स्वतःचें गाल उगीचच लाल वाटले. डोळे उगीचच हंसत आहेत असं वाटलं. शैला अगदीं खूष होती. काल रात्रीं तिच्या गालांवर शेखरच्या दातांनीं केलेल्या गोड व्रणावर ती खूष होती. जराशानं

कसला तरी विचार करत ती उठली तेव्हां तिचा पदर अगदीं सहजगत्या खालीं ओघळला. काल रात्रीं शेखरनें तिच्याशीं लगट केली तेव्हांहि असा सहजगत्याच तो ओघळला होता. तिला तें आठवलं. किती गोड आणि सुखकारक! त्या आठवणींनीं मनाशीं चाळा करत तिनं दुपार घालवली आणि संध्याकाळीं शेखरची वाट पहात ती दारांत उभी राहिली.

दारांत वाट पहात उभं राहणं आणि तो आल्यावर त्याचं हंसत मुखानं स्वागत करणं हा शैलेचा मग एक नियाचाच कार्यक्रम होऊन बसला. तो घरांत असला म्हणजे तिचा वेळ भरकन जाई. पण तो घरांत नसला, ऑफिसमधें गेला असला म्हणजे दुपार काढणं तिला अवघड वाटे. दुपारीं सासूबाई वाडगं-निवडणं करीत त्याला ती हातभार लावी, पण त्या जेव्हां अंमळ आडव्या होत तेव्हां शैलेचा वेळ जातां जात नसे. घरांत सासूसासरा ह्यांशिवाय कोणीच नव्हतं. त्यामुळे लग्न होऊन माणसं जेव्हां आपापल्या घरीं गेलीं तेव्हां तिला एवढं मोठं घर खायला उठलं. पहिले कांहीं दिवस तिनं वाचनांत, शिवणकामांत, विणकामांत घालवले होते. पण आतां कांहीं कांहीं करायचं शिल्लक राहिलं नव्हतं. सबंध घर नटलं होतं. खिडक्यांना पडदे लागले होते. दारावर तोरणं लटकत होतीं. शेखरकरितां विणलेला स्वेटर खुंटीवर टांगलेला होता. रेडिओवर काकाकुवा भरलेला रुमाल लपेटला होता. त्यामुळं आतां कांहीं करायचं राहिलं नव्हतं. सहा महिने तिनं असे काढले. आणि मग एक दिवस शेखरला तिनं विचारलं,—

"शेखर, मला एक विचारायचंय्"

"बोलिये, जनाब!"

"मला दुपारीं करमत नाहीं."

"कां?"

"घरांत कोणी नाहीं म्हणून—"

"तिसऱ्या मनुष्याची इतक्यांतच घाई झालीय् वाटतं!"

"असं रे काय!"

लटक्या रागांत शैलानं शेखरला एक धपाटा मारला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शेखरनं शैलेचं म्हणणं वडिलांपुढं मांडलं. त्यांना पण तें पटलं. शैलेची अडचण त्यांना खरी वाटली. त्यांनीं विरोध केला नाहीं. संमति दिली. आईनं थोडा विरोध केला, "आपल्याला काय जरूर आहे? आपल्या घरांत कोणी असं केलं नाहीं—" म्हणून तक्रार केली. पण शेवटीं सार्वमतानें शैलेला नोकरी करण्याची परवानगी मिळाली.

महिनाभरांतच शैलेचं नोकरीचं जमलं आणि आतां शेखरबरोबर ती रोज कामावर जाऊं लागली. शेखर आणि ती निघतांना बरोबर बाहेर पडत. स्टेशनवर आल्यावर ती मुलींच्या घोळक्यांत जाई आणि शेखर आपल्या ठराविक कंपूत जाऊन मिसळे. मग सिगारेटचीं पाकिटं बाहेर निघत. कांड्या पेटवल्या जात. सिगारेट पिण्याविषयीं आग्रह होई. धुराचे फवारे निघत. चेष्टा–विनोदाला पूर येई. शेजारीं असलेल्या मुलींकडे चोरून नजरा वळत, गाडीला उशीर झाला का म्हणून दृष्टि घड्याळाकडे जाई. आणि धाड्धाड् करीत गाडी स्टेशनमधें शिरली कीं मग आंत घुसण्यासाठीं सगळ्यांचीं एकच धांदल उडे.

मुंबईला ती गाडी जेव्हां येई तेव्हां त्या मोठ्या घड्याळांत ९–५० वाजलेले असत. ती गाडी थांबल्याबरोबर माणसं भराभर बाहेर पडत. त्या गर्दीतून, भराभर पांगणाऱ्या त्या माणसांच्या लोंढ्यातून वाट काढत शैला संकेतस्थळीं शेखरची वाट पहात उभी राही. त्या वेळीं तिच्यासमोरून असंख्य माणसं जात.

ह्या सर्व लोकांकडे ती न्याहाळून पाही. विविध प्रकारचे पोषाख, केशरचना आणि नटणंमुरडणं ह्यांचं चालतंबोलतं प्रदर्शन पाहतांनां तिला एक प्रकारची गंमत वाटे. त्यांत तिला निरनिराळी कापडं पहायला मिळत; तऱ्हेतऱ्हेचे पोलक्यांचे प्रकार ती पाहून घेई. आणि मग त्या गर्दीतून शेखर येतांना दिसला कीं आजुबाजूला असलेल्या लोकांशीं ती त्याची तुलना करी. तो जवळ आला कीं तिचे डोळे खुदकन् हंसत आणि तोंडांतून शब्द बाहेर पडत "किती उशीर !"

त्याच्याबरोबर अशारीतीनं हंसत खेळत ऑफिसमध्यें जाणं, दुपारीं एखाद्या चांगल्याशा हॉटेलमध्यें खाणं आणि संध्याकाळीं दमून भागून परत फिरणं हा तिचा एक नित्याचा कार्यक्रमच होऊन बसला होता. ह्या कार्यक्रमांत दुसऱ्यांशीं शेखरची तुलना करण्याचं तिला एक नवीनच व्यसन जडलं होतं. आतां, 'दिवस कसा जाईल' ही विवंचना राहिली नव्हती, तिचे दिवस भराभर जात होते. एका रविवारीं शेखरबरोबर ती गप्पा मारीत बसली असतां तिचं लक्ष कॅलेंडरकडे गेलं आणि तिला कळलं कीं आपल्याला नोकरी लागून आज सहा महिने झाले आहेत.

वेळ कसा जाईल, दिवस कसे जातील ही विवंचना तिला आतां राहिली नव्हती; तरी एक निराळीच ओढ, रुखरुख, हुरहूर तिला अलिकडे त्रास देऊं लागली होती. शेखरविषयींची तिची ओढ कमी होऊं लागली होती. त्याच्या भेटीसाठीं वाटणारी ती पहिली ओढ आणि मिठीसाठीं आसुसलेली पहिली आसक्ति आतां राहिली नव्हती. तो तिला जवळ घेत होता तें अगदीं पहिल्यासारखंच ! पण तिच्या जवळ जाण्यांत जीव नव्हता, आवेग नव्हता. तिला स्वतःला तें जाणवलं होतं. "असं कां व्हावं," असा तिनं स्वतःला प्रश्नहि विचारला होता. पण लग्न होऊन आता बरेच दिवस झाले आहेत. त्यामुळें असं झालं असेल, त्यामुळं ती ओढ आतां ओसरली असेल एवढंच तिला वाटलं. पण त्या वाटण्यावर तिचा स्वतःचाच विश्वास नव्हता.

शेखरच्या सहवासांतले पहिले दिवस तिला आठवले. लग्नाच्या पहिल्या दिवशींच त्याला न्याहळून पहावं, त्याला खेटून त्याच्याजवळ उभं रहावं असं तिला जें वाटत होतं तें आठवलं. ती ओढ, त्याला पहाण्याची ती आसक्ति, त्या मिठींत जाण्याची ती रुखरुख, मनाला लागलेली ती गोड गोड हुरहूर, आतां कुठं गेली याबद्दल ती स्वतःलाच विचारत होती.

आणि एक दिवस तिचं तिलाच कळलं कीं ऑफिसमध्यें टोकाला बसणाऱ्या त्या मधू भिडेनं आपल्याला जिंकलं आहे. आपलं कांहीं तरी चोरून नेलं आहे. आपल्यावर कांहीं तरी मोहिनी घातली आहे. अगदीं सहजगत्या आणि नकळत. कामाच्या निमित्तानं तो जवळ आला कीं आपल्याला कसंसंच होतं. तो बोलूं लागला कीं तें ऐकावंसं वाटतं. तो पहात असला कीं नजर त्याच्यावरनं ढरत नाहीं, आणि उगीचच लाजल्या सारखं होतं. पायांनीं बोटं चाळवाचाळव करतात आणि हात अकारण पदर सावरतात.

शेखरविषयींची ओढ, त्याला पहाण्याची आसक्ति, त्याच्या मिठींत जाण्याची रुखरुख, त्याच्याविषयींची मनाची हुरहूर—हें सारं कांहीं आतां मधू भिडेनं घेतलं आहे, घेऊं पहातो आहे असं तिला वाटलं. ती ओढ अनिवार होती, ती आसक्ति अटळ होती आणि ती रुखरुख तापदायक होती. सुखभंजक होती. डोळ्यांना शेखरपेक्षां मधू चांगला दिसत होता. कानाला त्याचे शब्द भुरळ पाडीत होते. आणि शेखरच्या उघड आलिंगनापेक्षां कामाचे कागद देतांघेतांना होणारे मधूचे चोरटे स्पर्शच तिला आतां जास्त हवेसे वाटत होते.

शेखरच्या नांवानं आपण कुंकूं लावलं आहे, त्याच्या निमित्तानं गळ्यांत मंगळसूत्र बांधलं आहे, एका शुभमुहूर्तावर त्याच्या त्या पवित्र स्मृतीसाठीं हातांत हा चुडा भरला आहे, तेव्हां ही ओढ थांबली पाहिजे, ही हुरहूर नाहींशी झाली पाहिजे, म्हणून ती मनाला बजावत होती, आणि मधू भिडेशीं बोलण्याचं टाळत होती, "शेखरहि कांहीं वाईट नाहीं," म्हणून मनाला सावरीत सद्विचारानं, पूर्व संस्कारानं आणि निश्चयाच्या चाबकाच्या फटकाऱ्यानं मन ताळ्यावर आणण्याची पराकाष्टा करीत होती. पण डोळ्यांनीं, कानांनीं, जिभेनं—साऱ्यांनीं बंड पुकारलं होतं. मधू भिडेशीं असहकार त्यांना पसंत नव्हता. मनानं जरी हें बरं नाहीं, आपण विवाहित आहोंत असं कितीतरी वेळा त्यांना बजावलं तरी डोळे मधू भिडेला पहायचं टाळीत नव्हते. कानांना त्याचे शब्द अजूनहि भुरळ पाडत होते. आणि ती चाहटळ जीभ मधू भिडेबरोबर गुलगुल गोष्टी करायला वारंवार तडफडत होती. आणि प्रवाहांत पडलेल्या वस्तूप्रमाणं मन शेखरकडून मधूकडे वहात आहे हें ती डोळे मिटून पहात होती.

मनांत असूनहि शैला तें टाळूं शकत नव्हती. आणि म्हणून सुखांत असूनहि ती दुःखी होती. आपलं घराणं, प्रतिष्ठा, शेखरचं उत्कट प्रेम यांचा मोठेपणा मनाला ती समजावून देत होती. पण मधूशीं मानसिक व्यभिचार तिनं चालवला होता. अगदीं सहजगत्या आणि नकळत ! तो तिच्या स्वप्नांत येत होता, तिला भेटत होता, तिच्याशीं फाजील चेष्टा करत होता, निरनिराळे खेळ तिच्याशीं खेळत होता. आणि शैला जागी होई तेव्हां तिला कळे कीं हें सारं फसवं आहे, नाश करणारं आहे, लग्न संस्थेला धक्का देणारं आहे. ही ओढ थांबविली पाहिजे, ही हुरहूर मिटविली पाहिजे.

त्या दिवशीं—शनिवारीं—ऑफिस सुटल्यावर ती शेखरच्या ऑफीसमधें गेली. तिनें आणि शेखरनं आज एक सिनेमा पहायचं ठरवलं होतं. ती गेली तेव्हां शेखर आपल्या टेबलावर काम करीत बसला होता आणि कामाच्या निमित्तानं शेजारची एक मुलगी त्याच्या टेबलावर वांकली होती. ऑफिस सुटल्यामुळें जवळ कोणीच नव्हतं. सर्व खुर्च्या रिकाम्या होत्या, टेबलें आवरलीं गेलीं होतीं आणि शिपाई खिडक्या लावत होते. शैला येणार म्हणून शेखर मुद्दामच वाट पहात बसला होता.

शैलानं त्या मुलीला तसं पाहिलं आणि मत्सरानं तिचं मन एकदम जळफळलं. आपल्या शेखरवर ही घाला घालीत आहे, त्याला आपल्यापासून दूर नेत आहे, आपल्या संसारांत विष कालवत आहे,—नाहीं नाहीं तें तिला वाटत होतं. मनांतला राग मनांत ठेवून पण ओठांवर हंसूं आणून ती शेखरजवळ आली आणि त्यानं ओढलेल्या जवळच्या खुर्चीवर बसली.

शैला जवळ आली तेव्हां त्या मुलीनं आपला ओघळलेला पदर नीट सावरला, शेपटा मागें टाकला आणि ती सरळ उभी राहिली. शैलेकडे पाहून तिनं हास्य केलं आणि औपचारिक 'नमस्ते' केला. शैला जेव्हां पहिल्यांदां शेखरच्या ऑफिसमधें आली होती तेव्हां शेखरनं सुलभेचा आणि तिचा परिचय करून दिला होता. पण पहिल्याच भेटींत शैलेला सुलभा आवडली नव्हती. तिचे डोळे तिला मिस्कील वाटले होते. आपल्यापेक्षां जास्त सुंदर असणाऱ्या त्या स्त्रीचा तिनं स्वाभाविकपणं हेवा केला होता. आणि आज शेखरला एकटं गाठून त्याच्या त्या टेबलावर वांकून खेटून उभी असलेल्या सुलभेला पाहिलं तेव्हां शैलाच्या त्या पहिल्या हेव्यांत मत्सराची आणखी एक ठिणगी पडली.

शेखरनं फायली बांधून टेबल आवरण्यास सुरुवात केली तेव्हां शैला सुलभेकडे पहात होती. गाजरासारखं लाल असलेलं तिचं गोरेपण तिला







स्वतःपेक्षां अधिक मोहक वाटलं. गालावर असलेला तीळ, आणि हंसतांना पडणारी मोहक खळी ही तिची धनदौलत आपल्यापाशीं नाहीं हें तिला समजलं. तिची नेसण्याची पद्धत तिला अधिक सरस वाटली. जॉर्जेट पातळामुळं तिचे नितंब आणि उरोज धष्टपुष्ट वाटत आहेत—का त्या धष्ट-पुष्टपणामुळं जॉर्जेटच्या पातळाला शोभा आली आहे हें तिला समजेनासं झालं. शैलेला आपल्या सौंदर्याविषयीं फार घमेंड होती, अभिमान होता. पण आपल्या अभिमानाला हिनं डिंवचलं आहे, घमेंड पार मोडून टाकली आहे, असं तिला वाटलं आणि त्यामुळं शेखर जितक्या लवकर बाहेर पडेल आणि ह्या महामायेपासून आपण दोघं जितक्या लवकर दूर जाऊं तितकं बरं असं तिला झालं.

शेखरनं टेबल आवरलं आणि शैलेबरोबर तो जेव्हां बाहेर पडला तेव्हां सुलभा पण त्यांच्याबरोबर होती. ही पण आपल्याबरोबर सिनेमाला येतेय् कीं काय ? शेखरनं हिला पण बरोबर घ्यायचं ठरवलं आहे कीं काय ? हिचं पण तिकीट काढलं आहे की काय ! अंधारांत शेखर...आणि पुढच्या विचारांनीं ती अगदीं अस्वस्थ झाली. पण बाहेरून ती सुलभेशीं बोलत होती. हंसत होती. बस स्टँड आल्यावर सुलभा रांगेत उभी राहिली आणि शेखरला आणि शैलेला तिनें जेव्हां "बाय बाय !" केला तेव्हां शैलेला धीर आला.

सिनेमाकडे शैलाचं लक्ष नव्हतं. तिच्या मनांत येत होतं, सुलभाला शेखर आवडतो का ? ती त्याच्यावर प्रेम करते का ? आजच्यासारखंच ती त्याला एकांतवासांत पकडते का ? आणि शेखरलासुद्धां सुलभा आवडत असेल तर ? आणि कां आवडूं नये ? ती आपल्यापेक्षां सुंदर नाहीं का ? आणि शेखर तिच्यावर भुलला तर ? तर......

डोळे पडद्यावरचीं हलतीं चित्रं पहात होते. शेखरच्या बोलण्यावर ओठ नुसतं "हूं हूं" करत होते. पण मन अस्वस्थ होतं. सिनेमा संपत आला होता. नायिका टेबलावर वांकली होती आणि समोर बसलेल्या नायकानं दोन्ही हातांनीं तिचीं कानशिलं पकडून तिच्या त्या वांकण्याचा फायदा घेऊन आपले ओठ तिच्या ओठांवर टेकवले होते. प्रेक्षक अगदी खूप झाले होते. पुढच्या रांगेतल्या लोकांकडून टाळ्यांचा आणि चित्कारांचा एकच गलका झाला होता. आणि शेखरनं ह्याच वेळीं तिला अगदी एक नाजुक चिमटा काढला.

शैलेला तो चिमटा सुखकर वाटला नाहीं. कारण त्या नायिकेसारखीच सुलभा टेबलावर वांकलेली तिनं पाहिली होती. तिला वाटलं, शेखरनं असा पांचटपणा तिच्याशीं केला नसेल कशावरून ? आणि कां करूं नये त्यानं ? संधि कोण दवडील ? मधू भिडेशी आपण नाहीं कां संधी साधून लगट करीत ? शेखरपेक्षां तो सुंदर आहे तसं आपल्यापेक्षां सुलभा पण सुरेख आहे, मोहक आहे, भुरळ पाडणारी आहे.

सिनेमा सुटल्यावर ती जेव्हां घरीं आली तेव्हां तिला शेखर जास्तच सुरेख वाटला. शेखरकडे नसलेल्या गोष्टी तिला जशा मधू भिडेकडे आढ-ळल्या तशाच मधूकडे नसलेल्या गोष्टी तिला आज शेखरकडे प्रथमच आढ-ळल्या आणि सुलभेकडे नसलेल्या कांहीं गोष्टी आपणाकडे आहेत आणि शेखर त्याच्यावर खूप आहे, असाहि आज तिला नव्यानं साक्षात्कार झाला. आणि मग तिला वाटलं, खरंच इतर मुलींपेक्षां आपण सुंदर आहोंत, आपल्यापेक्षां सुलभा सुन्दर आहे आणि सुलभेपेक्षां दुसरी एखादी सुंदर मुलगी नसेल कशावरून ? इतर मुलींपेक्षां प्रथम आपल्याला शेखर सुंदर वाटला, त्याच्यापेक्षां मधू भिडे सुंदर आढळला आणि त्याच्यापेक्षांहि दुसरा मुलगा सुंदर नसेल कशावरून ? मग मी जशी मधूवर भाळलें तसा शेखर सुलभेवर भाळला तर ? तर......आपला हा चिमुकला संसार उधळला जाईल, बाळं निराधार होतील, अनेक समस्या जन्माला येतील आणि मग आपल्याला शेखरपासून जें बाळ होईल तें......

शैला जेव्हां झांकापाक आटपून वर आली तेव्हां शेखर गॅलरींत उभा राहून अलगुज वाजवीत होता. चांदण्यांत त्याची गौर कांती न्हाऊन निघत होती. जाईजुईच्या फुलांचा वास हवेंत दरवळला होता. वाऱ्याची सौम्य झुळूक अंगाशीं लगट करून जात होती आणि आधींच धुंद असलेल्या वातावरणांत शेखरच्या 'तुझी माझी प्रीत जुळे' ह्या बांसरीच्या मंजुळ बोलानं अधिकच धुंद करून टाकलं होतं.

शेखर आळवून आळवून गाणं वाजवीत होता. शैलाला वाटलं, शेखर मधूएवढा सुंदर नसेल, पण वातावरण धुंद करून टाकणारं सुंदर अलगुज कुठं मधूला वाजवता येत आहे ? शेखरची टेनिस खेळण्याची धमक कुठें त्याच्यांत आहे ? सायकल चालवण्याचं शेखरचं तें कसब कुठें त्याच्याजवळ आहे ? त्यानं नुसतं तें टायपिंग मशिन चालवावं. शैलेला शेखरचा फार अभिमान वाटला. त्याच्याजवळ जाऊन ती म्हणाली, "शेखर, मी चुकलें, मला क्षमा कर !" पण शेखरला तें ऐकूं गेलं नाहीं. तो अलगुज वाजवण्यांत रंगून गेला होता. तो पुन्हा पुन्हा वाजवत होता—"तुझी माझी प्रीत जुळे—" शैलानं मधूवर, शेखरच्या मागं, स्वतः मधूलासुद्धां नकळत, प्रेम केलं होतं. त्याच्याशी मानसिक व्यभिचार केला होता. तसं शेखरनं सुलभेवर प्रेम केलं नव्हतं, तो शैलेचाच होता, तिच्यावर फिदा होता, एकनिष्ठ होता.

त्या रात्रीं ती जेव्हां शेखरला बिलगली तेव्हां तिच्या आवेगाला सीमा नव्हती. मधूविषयीं मनाला बजावीत असतांना, त्याच्याशीं प्रत्यक्ष लगट करण्यापूर्वीच ती सावरली गेली आणि त्याला सुलभा कारणीभूत झाली ह्याचं तिला नवल वाटलं. तिनं मनांतल्या मनांत सुलभेचे आभार मानले.

दुसऱ्या दिवशीं ती ऑफिसमध्यें आली तेव्हां मधू भिडे तिला मुळीं पाहूं शकला नाहीं. त्याचे बोल तिला मधुर वाटले नाहींत. त्याचा सहवास तिला हवासा वाटला नाहीं. त्याच्याकडे पाहाण्यासाठीं डोळे तरतरले नाहींत. मन त्याच्या सहवासासाठीं धडपडलं नाहीं. उलट मधू भिडेच्या केसाळ शरीराचा आणि त्याच्या डोळ्यांचा आज तिला तिटकारा आला. पांच केव्हां वाजतात, ऑफिस केव्हां सुटतं आणि आपण शेखरला केव्हां भेटतों ह्याचीच हुरहूर, ओढ तिला आतां लागून राहिली.












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






जगाच्या प्रारंभ-काळांत पहिलें मंजुळ गाणें
पक्ष्यांनीं म्हटलें,
पहिलें प्रेम पक्ष्यांनीं केलें आणि पहिलें
घरटेंहि पक्ष्यांनींच बांधलें,
मानवानें नव्हे!

निसर्गानें फुलांना सौंदर्य नि सुगंध दिला;

पक्ष्यांना गाण्याची गोड लकेर सोडण्याचें साधन दिलें;

चतुष्पाद प्राण्यांना संहाराची अजस्र शक्ति दिली;

अन् फुलपांखरांना नेत्रसंतोषी रंगराजी बहाल केली.

— निसर्गाच्या या विविध साधनांच्या खैरातीमागें कसला हेतु असूं शकतो? सामान्य माणूस या विचित्र दृश्यांचा सहसा विचार करीत नाहीं. आणि म्हणून त्यांना 'फुलांचे प्रणय' व 'फुलांचीं लग्नं' होतात हें सांगितलं तर पटणार नाहीं. पक्ष्यांमध्यें वात्स्यायनाचें सर्वच्या सर्व कामसूत्र मुखोद्गत असल्याचें आढळतें. चतुष्पाद प्राण्यांनीं एकपत्नीव्रत, द्विभार्याबंदी, बहुभार्यापद्धति, फार काय घटस्फोटासारखे मानवी कायदे आपल्या संसारात रूढ केलेले आढळतें. मानवाप्रमाणें सर्व सचेतन प्राण्यांवर एक सक्ति निसर्गानें लादली आहे. ती सक्तीच निसर्गाचें खरेंखुरें विश्वसूत्र आहे. प्रेमाशिवाय, प्रणयाशिवाय आणि प्रजेशिवाय निसर्गांत कुणालाहि स्थान लाभत नाहीं; कांहीं तरी निर्माण करा, वंशाचा दिवा तेवत ठेवा नाहीं तर वंशासह पृथ्वीतलावरून नष्ट व्हा — हाच शाप नि उश्शाप निसर्गानें दिला आहे. हेंच निसर्गाचें विश्वसूत्र आहे. या सूत्रावरच पशु, पक्षी, प्राणी, कृमिकीटक नि माणसें हीं परंपरेनें जगत आलीं आहेत.

अशा या प्रणयी विश्वाचा आम्ही कधीं विचारच करीत नाहीं. फुलांच्या लग्नासाठीं किती भव्य नि दिव्य लताकुंज निर्माण केलेले असतात! अल्लड तरुणीच्या शैलीलेंत मानवाला प्रेमाचा अथांग सागर असल्याचा भास होतो. परंतु पक्षी आपल्या वल्लभरमणीच्या मीलनासाठीं केवढी आरास, केवढी मिरास करतात! साध्या मीलनास्तव त्यांच्यांत संगीताच्या मैफली होतात महाकाव्याचे स्रोत वाहूं लागतात! रविवर्म्याची चित्रकला फिकी पाडणारीं दिव्य दृश्यें तीं निर्माण करतात! डोळे असून आम्ही 'नित्याचें' हें 'दिव्यमंगल' पहात नाहीं.

राणीच्या बागेंत शंभर वेळां आपण जातों. पशुप्राण्यांना निसर्गानें कुठल्या स्वरूपांत प्रणयी जीवन दिलें याचा कुणी कधीं ओझरता तरी विचार केला आहे का? या मूक प्राण्यांतहि 'रमणी'-साठीं सुंदोपसुंदी युद्धें होतात. बावलाप्रकरणा-सारखे भयंकर खून होतात. मनपसंत वरासाठीं रमणी 'स्वयंवर' पुकारते. अन् फार काय, तसा वर न मिळाला तर ती संन्यासी बनून उभें आयुष्य संभोगसुखापासून दूर रहाते. दररोज नवी नवरी शोधणारे पुरुषहि त्यांच्यांत आहेत. प्रथम-पत्नीशीं प्रतारणा करून दुसरीला मोहजालांत पकडणारेहि फकडरात त्यांच्यांत आहेत.

पशुप्राण्यांच्या या प्रणयजीवनांत चुंबनाचे विविध प्रकार आहेत, शंगारक्रीडेचीं अनेक आसनें आहेत. सुगंधमोहिनीचें शास्त्र आहे, नेत्रकटाक्षांचें अस्त्र आहे, अप्सरा-किन्नरींचें नृत्य आहे. मदनाची मादकता आहे, रतीची रंजकता आहे. त्यांच्यांत कुमारिकेचें कौमार्य

र मा कां त

पडतें तुसेंच कार्तेचें प्रणयचंचल चित्तहि मादळतें. त्यांच्यांतील मातृप्रेमाला मानव कसलीहि उपमा देण्यास समर्थ नाहीं. एकाद्या माकडीचें पिल्लूं कुणी बळजबरीनें हरण केलें तर ती अपत्यलाभासाठीं प्राणांतिक उपोषण करून प्राणत्याग केल्याशिवाय रहात नाहीं. हें अपत्य-प्रेम मानवांत तरी इतक्या उज्ज्वल स्वरूपांत सांपडूं शकत नाहीं. मूक मातेच्या त्यागाची सर मानवाला कधींहि येणार नाहीं. कांहीं प्राण्यांतील मातेचें हें दिव्यत्व जसें इतरत्र दिसत नाहीं तद्वतच रमणीचें क्रूरत्वहि इतरत्र उपलब्ध होत नाहीं. प्रणयासाठीं खून करणाऱ्या मानवी स्त्रिया याहि सचेतन सृष्टींत असतात. घराच्या कोपऱ्यांत तंतुमय जाळें निर्माण करून प्रणयीची आरास करणारा कोळी (Spider) तुम्हीं कधीं पाहिलात् कीं ? त्याचा प्रणय जितका गुंगविणारा आहे तितकाच अंगावर रोमांच उभे करणारा आहे. आकारानें मोठी असणारी मादी असते व लहान आकाराचा नर कोळी असतो. दोघेहि आपल्या देहरसानें अति सुंदर अशीं जाळीं विणतात. जीवनाचा वसंतऋतु येईपर्यंत तीं दोघेंहि भिन्न भिन्न जाळ्यांत रहातात. नराचें तारुण्य उतास येऊं लागलें कीं तो अगदीं अस्वस्थ बनतो. रोमिओ-ज्युलिएट व लैला-मजनूंचे सर्व प्रेमप्रकार त्याला आपोआप अवगत होतात. तो स्वतःचें जाळें सोडून बाहेर पडतो. पुनश्च या जाळ्यांत आपण येणार नाहीं याबद्दल त्याला खात्री असते. स्थितप्रज्ञाच्या गंभीरतेनें व हताश प्रेमिकाच्या दृष्टीनें तो या जाळ्यावर अखेरची नजर टाकतो. पानापानांतून, फुलाफुलांतून बेहोष होऊन रमणीचा शोध करतो. त्याला रेशमापेक्षांहि मऊ, चंद्र-किरणापेक्षांहि चकचकीत अशा रसरंगी जाळ्यांत 'रमणी ' आढळते. क्षणभर तो थांबतो. तिच्या जाळ्याच्या तंतूला जोडून तो स्वयंरसानें एक नवा धागा तयार करून दूरवर लटकवतो. प्रणयांत प्राण जाण्याचा प्रसंग आला तर पळून जाण्यासाठीं तो ही सारी खबरदारी घेतो.

प्रीतिचा मी भिकारी
आलों आज तुझ्या दारीं ।

अशा अर्थाचे आलाप छेडीत तो तिच्या जाळ्याजवळ येतो. जाळ्यांतील छटेल रमणी क्षणांत अल्लडतेनें त्याजकडे येते. क्षणांत नकारी नखऱ्यानें दुसऱ्या टोकाला जाते. पुनश्च येते व एकाच स्पर्शानें वल्लभाला वश करूं पहाते. नर प्रेमानें जसा वेडा होतो तसाच मरणाच्या भीतीनें गर्भगळित झालेला असतो. प्रेम कीं मरण ? ही समस्या त्याचेपुढें असते. तो धीट बनतो. थोडासा चंचुप्रवेश करतो. मादी जवळ येते. आपल्या अणकुचिदार अंगानें त्याला गोंजारते. आपल्या जाळ्यांत पकडून ठेवलेलें भक्ष्य ' मिष्टान्न ' म्हणून वल्लभाला देते. हा खेळ तासन् तास चालत असतो. अखेर, नराचा उल्हास व उमेद उतास येतात. त्याला धीर धरवत नाहीं. तो नि ती ! नेत्राला नेत्र भिडतात. अन् दुसऱ्या क्षणीं खेळ खलास ! हाय ! हाय ! तीच प्रणयरंगानें रंगलेली मादी विद्युल्लतेसारखा झटका देऊन नराला खालीं पाडते. नर पळण्याचा प्रयत्न करतो. परंतु त्याच्या सर्व चोरवाटा मादीनें बंद केलेल्या असतात. ती त्यावर झडप घालते, व डोळ्यांचीं पातें लवतें न लवतें तोंच वल्लभाच्या देहाचे शतशः तुकडे करून त्यांचा क्षणार्धांत चट्टामट्टा करून टाकते. कोळ्याचें प्रणयी जीवन म्हणजे—

क्षण एक पुरे प्रेमाचा
वर्षाव पडो मरणाचा—

या महशूर सूक्तीची साक्ष देणारें अमर जीवन आहे. नवा जीव जुन्या जीवांतून जन्मास येतो. निसर्गाचा किती आश्चर्यकारक हा चमत्कार आहे?

कृमिकिटकांत प्रणय आहे, पण 'प्रेम' नाहीं. याचा अर्थ प्रजासंभवानंतर नर आणि मादी जगलीं वांचलीं तर तीं स्वतःचें शतें जसें विसरतात तद्वतच अपत्यांनाहि विसरतात. ही गोष्ट पक्ष्यांची नाहीं. उलट पक्षी अगदीं हुबेहूब मानवासारखें परस्परांवर प्रेम करतात. अपत्याचें लालनपालन करतात. त्यांचें प्रेम अखंडकाल टिकतें. जगाच्या प्रारंभकालांत पहिलें मंजुळ गाणें पक्ष्यांनीं म्हटलें. पहिलें प्रेम पक्ष्यांनीं केलें. पहिला आनंद पक्ष्यांनीं निर्माण केला. पक्ष्यांनीं मानवी जीवनाला व कलेला भूषविलें आहे. अनंत रंगांचीं, अनंत सुस्वरांचीं, अनंत लास्याचीं, दृश्यें पक्ष्यांनीं मानवाला दाखवलीं आहेत. फार काय, जगांत पहिलें घरटें बांधणारा प्राणी पक्षी आहे. मानव खास नाहीं. इंद्रधनुष्यांत न दिसणारे अनंत रंग पक्ष्यांच्या ठिकाणीं दिसतात. नेत्रांना वेड लावणारी सौंदर्यशोभा पक्षी प्रकट करतात. पोपटाचा हिरवा रंग, मोराचा भव्य पिसारा, कोकिळेचा मंजुळ कंठ, कबूतरांची डौलदार चाल, राजहंसाची गौरता, चंडोलाची भरारी—अनंत पक्षी अनंत आकर्षक रूपानें वावरतात. प्रेम नि प्रणयावर महाकाव्यें निर्माण करतात. स्त्री क्षणिक काळची कांता आहे, पण ती अनंत काळची माता आहे हें पक्ष्यांची मादी सदैव सिद्ध करूं शकते. पण मानवाप्रमाणें नरपक्षी हा छिचोर व स्वैराचारी असतो. उष्ण प्रदेशांतील नर-मादी एकपत्नीकत्वाचे पुरस्कर्ते असल्याचें आढळतें. स्वैरवादी पक्ष्यांना कौटुंबिक ओढ नसते. येवढेंच नव्हे तर संभोग केल्यावर शय्यासोबतिणीचें व मुलांचें काय झालें याची तो थोडीदेखील दखलगिरी घेत नाहीं. नर प्रणयसृष्टींत कमालीचा उडाणटप्पूपणा करतो. स्वतःच्या सुखभोगासाठीं मादीला अंडीं उबवूं देण्याचा अवसर देत नाहीं. फार काय, कधीं कधीं अंडीं फोडून टाकतो! हे स्वैराचारी पक्षी अत्यंत विद्वेषी असतात. मादीवर नजर ठेवणाऱ्या दुसऱ्या पक्ष्याला कामद्वेषानें जर्जर करून जिवानिशीं ठार करतात. कोंबडा, मोर, कबूतर हीं सर्व या उडाणटप्पू उत्साहाचीं आहेत. एकपत्नीव्रताचे पक्षी मा[illegible] शीलशैलीला लाजविणारे असतात. घरटें बांधणें, अंडीं घातल्यावर मादीचें रक्षण करणें, तिला नि पिल्लांना खावयास आणून देणें, हीं कामें करतात. फार काय या गोड संसारांत पतीची ताटातूट झाली तर पत्नी अखंडकाल वैधव्य पाळते. वैधव्यधारी चिमणीचें चरित्र पंचपतिव्रतेइतकेंच पवित्र असतें. पण कबूतराचें जीवन खरोखर काव्यमय आहे. कबूतरांत प्रणय क्रिडा आहे, आलिंगन आहे, चुंबन आहे, दंत व अधरखंडन आहे. जणूं वात्स्यायनाचें कामसूत्र वाचूनच हीं जोडपीं प्रेमक्रीडा तर करीत नाहीं ना, असें वाटतें.

पिंजर पक्ष्यांची एक जात आहे. हे पक्षी गाणें गाऊन मादीच्या कामभावना उद्दीपित करतात. तें गोड गाणें ऐकून मादी कामातुर होते. अशा क्षणीं नराला तिच्यापासून विभक्त केलें तर प्रेमभंगानें ती खरोखरीच प्राणत्याग करते. प्रेमाची महती पक्षाला कळावी नि मानवाला—? मानव प्रेमापेक्षां प्रणय नि प्रणयापेक्षां प्रलय करण्याकडे अधिक झुकतो!

स्त्री अथवा पुरुष वयांत आल्याखेरीज प्रणय करूं शकत नाहीं. तद्वतच पशुपक्ष्यांची गोष्ट आहे. हत्ती वयानें १६ किंवा १८ वर्षांचा झाल्याखेरीज त्याला कामभावना होत नाहीं. उंट चौथ्या वर्षापासून तरुण बनतो. घोडा वयाचे पांचवे किंवा सहावे वर्षी प्रेमाच्या फंदांत पडतो. गाढव—गरीबबिचाऱ्याला वयाच्या सहाव्या वर्षापर्यंत प्रेमाचा गंधहि नसतो. पोळ मात्र तिसऱ्या वर्षापासून गाईमागें लागतो. सिंह, वाघ, अस्वल, लांडगा दुसऱ्या वर्षापासून 'बापगिरी' करूं लागतात. हरीण १८ व्या महिन्यापासून, शेळी, मेंढ्या, नि डुकरें पहिल्या वर्षीच भरपूर पोराबाळांचा संसार थाटतात. गांवडुक्कर तर जन्मल्यापासून सव्वा महिन्यांत बाप बनतो. डुकराचें एक जोडपें एका वर्षांत १००० अपत्यांची वंशावळ बनवूं शकतें.

—वन्य पशूंचें जीवन अत्यंत मनोवेधक आहे. रानगाई नि हरणें यांचे कळप तुम्ही पाहिलेत का? तीं पळूं लागलीं कीं सौंदर्याचे झोतच्या झोत पळताहेत असा भास होतो. या वन्य नरांना कामभावना जागृत झाली कीं तें मोठमोठ्यानें ओरडतात. त्यांचा गळा आंतून सुजतो. अंग सळसळतें. झाड दिसलें कीं त्यावर ते टक्कर मारतात. मादी पुढें नि नर मागें—मैलच्या मैल पळत असतात. मध्येंच दुसरा नर आला तर दोन नरांचें तुंबळ द्वंद्वयुद्ध होतें. मरेपर्यंत ही लढत चालते. विजयी जो मादीला वरतो. आपल्या खुरांनीं दोन नर परस्परांवर इतका प्रचंड मार करतात कीं कधीं कधीं त्या द्वंद्वांत दोघेहि मरून पडतात. हरिणी दूर बघते. अतिकामातुर झाल्यास दोघांना तसेंच लढत सोडून ती तिसऱ्याकडे वळते. स्त्रिया तरुण हरणापेक्षां वृद्ध हरिण अधिक आवडतो. तीन आठवडे हा कामकाल हरिणांच्या ठिकाणीं असतो. तीन आठवडे ते झोंपत नाहींत. कामकाल संपताच नर इतका हताश होतो कीं, पुढील १० महिने तो मादीकडे ढुंकून पहात नाहीं. पुढील वर्षी नाभींतून कस्तुरीचा गंध दरवळूं लागला कीं, पुनश्च त्यांचें प्रणयी जीवन जोमानें धाऊं लागतें.

—निसर्गांत प्रजावर्धनासाठीं अशा अनंत प्रकारांनीं धडपड चालू आहे. त्यांच्या प्रणयांत नवे जीव जन्मतात, जुने जीव नष्ट होतात. पशु असो, पक्षी असो, जलचर असो, भूचर असो—सर्वांच्या संसारांत 'नवरानवरीचा सुंदर खेळ' अनंत काल चालत आहे व अनंतकाल तो तसाच चालत राहील. प्रणयानें निसर्गाला अनंत नि अमर केलें आहे!

दोन बाहुल्या

जणुं एकाच
प्रतिमेची दुसरी
प्रतिमा



कृत्रीम संवाद आणि कृत्रीम अभिनयपरंपरा ओलांडून पुढं पडलेलं 'पाऊल' म्हणजेच, हा—




गजानन जागीरदार

नटानं आपल्या अभिनयाविषयीं कांहीहि लिहिणं अत्यंत अवघड आहे. एकाद्या चित्रकाराला, तूं इथं या तुझ्या चित्रांत हिरवा रंग का घेतला आहेस आणि या बाजूला पिवळ्या रंगाचा कुंचला कां वापरला आहेस, हें सांगणं जितकं कठीण आहे तितकंच हेंहि कठीण आहे. जास्तींत जास्त तो चित्रकार एवढंच सांगू शकेल कीं, या माझ्या चित्राची मनानं रूपरेखा आंखतांना अमुक अमुक रंग निवडले आणि म्हणून तेच रंग मीं या पॅलेटवरनं उचलले. बस, याहून कांहीं अधिक सांगतां येणार नाहीं. एका विशिष्ट शैलीच्या चित्रांत कांहीं विशिष्ट रंगच कां खुलून दिसतात याचं एक ठरलेलं शास्त्र अथवा तंत्र आहे, तसंच अभिनयाविषयींहि म्हणतां येईल.

परंतु अभिनयाकडे शास्त्र म्हणून कुणी पाहिलेलें आहे असें वाटत नाहीं. आजच्या पुरतं एवढंच म्हणतां येईल कीं, भावनादर्शन-स्वभावदर्शन आणि व्यक्तिदर्शन या तिहींच्या संयोगानं अभिनयकला जन्म घेते. कित्येकांना वाटतं, ही कला कांहीं तशी कष्टसाध्य नाहीं. करुण रस निर्माण करतांना नट प्रथम त्या शोकप्रसंगाशीं तद्रूप होतो आणि मग आपोआप त्याच्या तोंडून पाठ केलेले संवाद बाहेर पडूं लागतात ! पण हें खरं नाहीं. खोटं आहे तें. प्रेक्षकांच्या मनावर अचूक असा संकल्पित परिणाम व्हावा म्हणून प्रत्येक नट आधीं स्वतःच्या अभिनयाचा एक आराखडा, एक तंत्र ठरवीत असतो. आणि मग त्याबरहुकूम अभिनयाचं एक एक पाऊल टाकीत असतो. तुमच्या शेजारीं असलेल्या व्यक्तीची भूमिका वठवायची असेल तर तो करतो तसे हातवारे आणि हावभाव करून भागणार नाहीं; कारण त्याची ती नक्कल ठरेल, भूमिका नव्हे. तें साधण्यासाठीं त्याचे हातवारे, हावभाव यांच्याच जोडीला त्याचं व्यक्तिमत्त्व, त्याच्या मनाची ठेवण, इत्यादि महत्त्वाच्या गोष्टींकडेहि नटानं लक्ष पुरविणं आवश्यक आहे. कोणी म्हटलं आहे कीं, व्यक्तिमत्त्वाचं नाटक, बाजूला सारून भूमिकेशीं तद्रूप होऊन काम करणाऱ्या नटाला मी कधींच श्रद्धा करणार नाहीं !

सहजता हा निसर्गाचा धर्म आहे. नैसर्गिक, स्वाभाविक किंवा सहजिक अभिनयांत मानवमात्राच्या प्रकृतींचं प्रतिबिंब पाहायला मिळतं तें त्यामुळंच. कृत्रीम हावभाव आणि कृत्रिम संवादशैली यांना भर देणारी जुनी अभिनयपरंपरा ओलांडून पुढं पडलेलं पाऊल म्हणजेच ही सहजिकता. या साहजिकतेच्या प्रमाणांतच अभिनयाचं श्रेष्ठ वा कनिष्ठ मूल्य सांठविलेलं आहे. पण नवा प्रश्न येतो तो असा कीं, फक्त ही साहजिकता... कां अभिनयाची उच्च पायरी ठरणार आहे

अनुक्रमणिका

या अभिनयांत केवळ सहजतेहून अधिक कलात्मक पण वास्तववादी दुसरी कुठचीच छटा असूं शकणार नाहीं का?

यापूर्वी आम्हाला असें वाटे कीं, टसटशीत दावभाव आणि ठणठणीत संवाद ज्याला जमत नाहींत तो नट कसचा? म्हणूनच कीं काय नटाला वेळोवेळीं टाळ्यांचा कडकडाट मिळवितां येतील अशा धर्तीचीं नाटकं रचलीं जात. पण तो काळ आतां जुना झाला आहे. वेगळ्या पद्धतीनं आज नाटकं लिहिलीं जात आहेत. आणि स्वाभाविक पद्धतीनें अभिनय करणारे नटहि दिवसेंदिवस पुढें येत आहेत, अधिक लोकप्रिय होत आहेत. ही प्रेक्षकांची जी अभिरुचि बदलली, वाढली, याचं श्रेय बव्हंशीं पाश्चात्य चित्रपटाला द्यायला हवें. आधुनिक लेखकदेखील या बदललेल्या अभिरुचीला जबाबदार आहेत असंहि म्हणायला कांहीं अंशीं हरकत नाहीं.

स्वाभाविकतेच्या बाजूनं इतकें लिहून झाल्यावर आता मी स्वाभाविकतेहून श्रेष्ठ अशी अभिनयाची एक जात सांगणार आहे. संकल्पित परिणाम साधण्याच्या उद्देशानं केलेल्या अभिनयांतील साहजिकतेचा मीं मघांशीं उल्लेख केला. त्यावरच दोन शब्द अधिक सांगावेसे वाटतात. या अभिनयांतील साहजिकतेला एक ठराविक मर्यादा आहे. त्या मर्यादेची रेघ ओलांडणारी साहजिकता नाट्याच्या दृष्टीनें परिणामशून्य ठरते, असें माझें ठाम मत आहे. कारण नट जो अभिनय करतो तो स्वतःचें नव्हे तर प्रेक्षकांचे मनोरंजन करण्यासाटीं हा महत्त्वाचा मुद्दा आहे. नाट्यप्रसंगातील उत्कटतेनं प्रेक्षकाचं मन हलवून सोडणं हा अभिनयाचा मूळ उद्देश. आपलं मन दुःखानं आटोकाट भरून आलं आहे आणि आपल्या डोळ्यांतून घळघळां अश्रू—खरे अश्रू वाहताहेत--एवढ्यानंच भागणार नाहीं. ही आपल्या दुःखाची जाणीव तितक्याच तीव्रतेनं प्रेक्षकांनाहि व्हायला पाहिजे आणि त्या जाणिवेंतून आपल्या आधीं प्रेक्षकांच्या डोळ्यांतून अश्रू ओघळले पाहिजेत. हें घडलें तरच अभिनयाला अर्थ येईल. एरवीं नाहीं. पण हें जमण्यासाठीं नटाला आपल्या स्वतःच्या व्यक्तित्वाचा त्या वेळीं विसर पडायला हवा, आणि अभिनय करणारा मी, प्रथम कलावंत आहें, याची जाणीव तुटतां कामा नये. अमुक एक भूमिका करतांना त्या भूमिकेशीं समरस होईपर्यंतचा कलावंत आणि त्या भूमिकेशीं समरस झाल्यानंतरचा कलावंत या दोहोंत अति सूक्ष्म असा भेद आहे.

स्वाभाविकाची बैठक न सोडतां अनूक नि अर्थपूर्ण अभिनयाच्या द्वारें नट स्वतः करीत असलेल्या भूमिकेच्या मनांतलें वादळ प्रेक्षकांच्या मनांत उठवितो, आपल्याला होणारी संवेदना प्रेक्षकांच्या मनांत ओतून देतो. अभिनयकलेंत दडलेलें हें एक श्रेष्ठ प्रतीचें सामर्थ्य आहे. याचेंच एक समर्पक उदाहरण म्हणून 'शेजारी' या बोलपटांतल्या एका प्रसंगाकडे मी बोट दाखवीन. 'शेजारी' हा बोलपट तुमच्या स्मरणांत असेल तर त्यांतला हा, मी सांगणार आहे तो प्रसंग तुम्ही आपल्या मनःचक्षूंपुढें आणा. मिर्झा, आणि ठाकूर हे शेजारी. त्यांच्यातील भांडण अत्यंत विकोपाला जातं. तेव्हां मिर्झा, जुना, जवळचा दोस्त म्हणून ज्याच्याकडे आजवर पाहिलं त्या ठाकुराचा शेजार सोडून जायला निघतो. मैत्रीचं स्वप्न भंगून जातं. नुसतं मनच नव्हे तर मिर्झाचा आत्मादेखील त्या असह्य वेदनेनें घायाळ होतो आणि आतां यापुढे इथं राहण्यांत काडीमात्र अर्थ नाहीं अशा वैतागानं तो आपलं घर आवरू लागतो. हा शेजार सोडायचा असा निर्णय मिर्झाच्या मनानं एकदां घेतला, तो आतां बदलणं अशक्य, इथपासून तों तें घर सोडून प्रत्यक्ष निघेपर्यंतचा प्रसंग—पण जवळ जवळ दहा मिनिटांच्या या प्रसंगांत आपल्याला फक्त एकच वाक्य ऐकायला मिळतं तें प्रसंगाची सुरुवात होते तेव्हां. मिर्झा आपल्या मुलाला हांक मारून ओरडतो,

"नईम, गाड्या आण, सामान भर, इथनं जायचं !"

---

नईम,

---

गाड्या सामान जायचं !

---

आण, भर, इथनं

---

या एका वाक्यानंतर नितान्त दुःखानं भरलेली आणि प्रेक्षकांचं हृदय अक्षरशः विदीर्ण करणारीं दृश्यें एकामागून एक सरकूं लागतात. मिर्झाच्या घरांतलं सामान बाहेर काढलं जात आहे, स्नेहपूर्ण सहवासांत आतां अचानक अंतर पडत आहे हें पाहून काळीज डोळ्यांत आणून शेजी एकमेकांकडे पहात आहेत, जिवाभावाच्या तिडिकीनं एकमेकांच्या कमरेभोंवतीं पडलेले पण आतां जरबेनं विस्कटून पडणारे त्या चिमण्या मुलांचे घट्ट विळखे सुटत आहेत, व्यथित गळ्यानं ओरडणाऱ्या बकऱ्या, मान उंचावून फडफडाट करणाऱ्या त्या कोंबड्या—सारं स्थिरचर, जणूं एका अविभक्त दुःखानं हंबरडा फोडीत आहे—! अशा करुणोत्कट परिस्थितींत, इतकीं वर्षं मनानं एक जीवन जगणाऱ्या शेजाऱ्यानं आपल्या काळजावर लाथ हाणावी—या आघातानं मिर्झाची तीट काठी मोडून कोसळायला हवी होती ! त्याच्या तोंडून केविलवाणे उद्गार निघायला हवे होते,—

"नईम, गाड्या आण, सामान भर, इथनं जायचं !"

---

---

गाड्या आण, सामान भर

---

नईम, , , इथनं जायचं !

---

मानवी स्वाभाविकतेला धरून चित्रित करायचा तर हेंच व्हायला हवें होतें. पण दिग्दर्शकाला या उत्कट प्रसंगांतून वेगळं साधायचं होतं आणि या अशा प्रसंगांत दडलेलं जबरदस्त






अनुक्रमणिका






सामर्थ्य या दोहोंची पुरेपूर कल्पना होती. शेजारींतला तो प्रसंग पुन्हा एकदां आठवून पहा— जणूं घायाळ झालेल्या वाघाची अनंत वेदनेनं फोडलेली आरोळीच अशी, "नईम!" ही मिर्झाची हांक अजून तुमच्या कानांस घुमल्यावाचून राहाणार नाहीं. म्हणूनच अस्वाभाविकतेचा यत्किंचित् देखील संपर्क न होतां नाट्यांतली परिणामकारकता साधणं, हें जिवंत अभिनयाचं लक्षण आहे, तें ध्येय आहे असं मघाशीं मीं जें म्हणालों तें यासाठींच. कालपरवांपर्यंत तुम्ही पाहिलेल्या सर्व महान् कलाकृती आठवून त्यांना अभिनयाचा हा निकष लावून पहा, म्हणजे एका अविकल्प कलात्मक आनंदाच्या जाणीवेनं तुमचं मन थरारल्यावांचून राहणार नाहीं.

नाट्योत्कर्ष बिंदु साधण्यासाठीं संवादांतला चढउतार अथवा अभिनयाचा आवेग याबरोबरच तिसरी एक गोष्ट, त्याहून नसली तरी तितकीच महत्त्वाची आहे. आणि ती म्हणजे, संवादाच्या वेळीं घेतलेले अपूर्णविराम (Pauses) रामशास्त्री या बोलपटांतलें एक उदाहरण सांगतों. आपल्या हातून घडलेल्या अघोर पापाबद्दल कांहीं प्रायश्चित्त आहे का, असा राघोबादादा प्रश्न करतात तेव्हां शास्त्रीबुवा म्हणतात, 'होय!' आणि पुढं त्यांच्या तोंडून कांहींच निघत नाहीं—एक शब्दहि बाहेर पडत नाहीं. ते बोलत नाहींत! त्यांच्या त्या अर्थपूर्ण विरामांत कमालीचा आवेग दडलेला आहे असें प्रत्ययाला येतें. प्रेक्षकांच्या मनांत न्यायदानाविषयींच्या आशाअपेक्षांचं भयंकर आंदोलन सुरू होतं. प्रेक्षक अधीर होतो. त्याला वाटतं, आतां रामशास्त्री नमणार, वांकणार कीं मोडणार? सत्याचा हा वाली, सत्याचा हा कणखर पाठीराखा पेशव्यांच्या राजकीय भवितव्याला तडा पडूं नये म्हणून खुनी राघोबाच्या अमानुष गुन्ह्याकडे मुद्दाम डोळेझांक तर करणार नाहीं ना? मग शास्त्रीबुवा फक्त, 'होय' हा एकच शब्द बोलून स्तब्ध कां राहिले? त्या अनपेक्षित विरामामुळें प्रेक्षकांच्या मनाचा कोंडमारा होतो. प्रेक्षकांना ते निःशब्द क्षण कमालीचे असह्य वाटूं लागतात! आणि तो अपूर्ण विराम संपतो. रामशास्त्र्यांची तेजस्वी वाणी शांत, धीरोदत्त गांभीर्यानं एकच वाक्य उच्चारते. महाराष्ट्राच्या इतिहासांत अमरपद मिळविलेलें तें हेंच वाक्य—"शास्त्रांत या गुन्ह्याला देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं!"

अशीं किती तरी उदाहरणं देतां येतील, कीं जिथं लेखकानं संकल्पिलेल्या परिणामपूर्ण संवादाला नटानं आपल्या अभिनयकौशल्यानं मूर्त स्वरूप दिलं आहे.

थोडक्यांत, उत्कृष्ट अभिनय म्हणजे केवळ स्वाभाविक अभिनयच नाहीं, तर त्याहून तो कांहींसा आगळा आणि अधिक आहे.

अनुभव खरा! पण तो माझ्या कुंडीला पेरुत नव्हता!

# हापूसचा आंबा



रघुवीर सामंत

माझ्या चिमुकल्या जगांतला हा एक अत्यंत कसोटीचा प्रयत्न होता! पण किती विलक्षण! किती चमत्कारिक!

काकूंच्या नातीसह त्यांची सून घेऊन बऱ्याच दिवसांनीं मी त्यांच्याकडे गेलों होतों भेटायला.

तसं म्हाताऱ्या माणसांचं कौतुक विचारायला नकोच! त्या चिमणीबरोबर त्यांनीं माझंहि कौतुक केलं, "तूं पण लहानपणीं जणू असाच दिसायचास!"

गप्पा करतां करतां हळुवार हातांनीं थोपटून त्यांनीं तिला झोंपवलं. ट्रंकेंतली ठेवणींतली आपल्या हातची जुनी गोधडी काढली; तिच्या चौघडीवर एका कोपऱ्यांत तिला निजवून, त्यांनीं आपल्या इरकली लुगड्याची घडी तिला पांघरली. नि अगदीं वात्सल्यपूर्ण शब्दांत त्या पुटपुटल्या, "हुं हुंऽऽ! कशी बघ बघतां झोंपली बघ गीऽ गुणाची पोर..."

भिंतीला टेकून ऐसपैस पाय पसरून काकू बोलत होत्या. माझा चहाफराळ चालला होता.

इतक्यांत जिन्याखालून एक ठसकी ललकारी आमच्या कानांवर पडली, "आहां का हो काकूऽ, घरांत?"

काकू बसल्याबसल्या क्षेवढ्यानें दचकल्या!

कोण? म्हणून मीं केलेल्या पृच्छेकडे साफ दुर्लक्ष करून त्या ताडकन् जागच्या उठल्या, स्वस्थ झोंपलेल्या त्या छोकरीची मोटली त्यांनीं पटकन् उचलली. लगबगीनें आंतल्या अंधेऱ्या सामानाच्या खोलींत जाऊन तिथें तिला ठेवून परतल्या. दार ओढून घेऊन पुन्हा पूर्ववत् आपल्या जागेवर बसल्या नि मग कानोसा घेतल्यासारखं करून त्या म्हणाल्या, "होऽ होऽ... याऽ होऽ वर! बोलण्याच्या नादांत ऐकूंच आलं नाहीं बघा! आमचा पुतण्या नि सूनबाई आलीं आहेत ना?"

त्यांची ती लटपट, तें नाटक, तें घाईत खोटं बोलणं सारें समोर बघून मी तर विस्मितच झालों; भांबावून नि स्तब्ध









समाधानी स्मितरेषा यांचा निरिच्छमात्र नाच कमिलाफ काकूंच्या चेहेऱ्यावर होऊन गेला.

तोंच एक मध्यम वयाच्या बाई त्यांच्या समोर 'बसायला' प्रविष्ट झाल्या. अर्थात् मी उठलों नि बाहेर गेलों.

"चिमणी नातहि असेल तुमची बरोबर आलेली? आहे कुठं ती चिमुरडी??" त्या बसतां बसतां चौफेर दृष्टि फरवत म्हणाल्या, "मोठी गोड गोड पोर आहे म्हणे ती...बघूं तरी—"

"कसली गोड?. डोक्याचा ही मला मोठा कांदा, फेंपटं नकटं नाक, कोंजे किलकिले डोळे...अहो, बोळसंसुद्धां नाहीं घेतलंन् अजून पोरीनं!... हल्लींच्या या आया जशी पाप्याचीं पितरं...तशा त्यांच्या पोरी...दुसरं काय?...आल्यापासून बघा...सारखी आपली रडतेय्...घर डोक्यावर घेतलंन्!...तेव्हां आबाजीला म्हटलं, 'जा बाबा, जरा वाऱ्यावर तरी फिरवून आण तें ध्यान...'

काकूंचा उत्तरादाखल तोंडाचा पट्टा चाललेला ऐकूं येत होता खरा, पण [illegible] जात होतं, 'जर का याच वेळीं त्या अंधाऱ्या खोलींतून त्यांच्या झोंपलेल्या नातीनें हुंकार देऊन विचारलं कीं, ही हो कसली माझी बदनामी आजीऽ, मी आपली निमूट झोंपलेंय तरी?...'

—तरं?

—तर काकूंच्या घरीं बायकाबायकांचं पानपतच व्हायचं!

—

त्या साऱ्या प्रकरणाचा काकूंच्या बाजूचा उलगडा रात्रीं जेवतांना झाला. मी त्यावर कांहीं कुत्सित बोललों; खो खो हंसलों. तेव्हां काकूंचा पारा चढला.

त्या रागारागानें माझ्यावर ओरडल्या, "नका रे सांगूं तुम्ही कांहीं, हल्लींची नायू नायू तें शिकलेलीं धर्मभ्रष्ट पोरं!...आमच्या करण्यावर म्हणून तुमचा विश्वास नसायचाच!! नसे ना का मेलाऽ!...पण हें काय?... खोटीं नाटकं केलीं म्हणे...कां नको करूं नाटकं? का बोलूं नको खोटं? माझी मत मला काय वर नाहीं आलेली, समजलास?...आपल्याला अक्कल नाहीं त्यांत बोलूं नये माणसानें. त्या वयेची नुसती दृष्टि पडली असती पोरीवर तरी कोणता मेला हाःहाःकार उडला असता, कोण जाणे!...आळीं- तल्या साऱ्या पोराबाळांच्या आयांना याचा चांगला अनुभव आहे, म्हटलं... पण मग मी म्हणतें... करायचंय् काय असल्या गोष्टींशीं तुम्हाला? नाहीं ना तुमचा विश्वास? नसूं दे...द्या सोडून!...खोट्याचं पाप असलं तर आमच्या कपाळीं!...नि गोधडींत मोटली केली म्हणून याची पोर जशी काय गुसमटलीच अगदीं!...मोठ्ठाऽ काळजीचा आला!...तुम्हाला रे कोणी वाढवलं? का आकाशांतून पडलांत नि धरणीनें सांभाळलं?...अरे शिकलेल्या गाढवाऽ... मांजरीचे दांत तिच्या पिल्लांना नाहीं बरं कधीं बाधत..."

सुशिक्षित असल्या तरी काकूंच्या आज्ञाधारक सूनबाई त्यांच्या जातीच्या [illegible]!...त्या वादांतून राजिनामा देऊन मी आपला निमूट बाजूला झालों.

—

आयुष्यांत योगायोग मात्र विलक्षण असतात एवढं खरं! दोन अडीच वर्षांनीं एके दिवशीं मला त्या साऱ्या प्रकाराची चमत्कारिक पद्धतीनें फिरून आठवण व्हायची होती.

[illegible] आमची चिमणी वाढली होती. उंच नि भरीव अंग, मानेवर [illegible] पिंगे कुरळे केस, कपाळाला कुंकवाची नारीकशी टिकली, कानांतले हलते डूल, डोळ्यांतलं काजळ, अंगांतला तांबड्या पांढऱ्या पट्ट्यांचा तंग गंजिफ्राक, पायांतली रबरी बंदांची तंग चड्डी—अशा एकूण थाटांत ती घरभर दुडदुडूं लागली कीं आमच्याच काय कोणाच्याहि हृदयाला वात्सल्याचं भरतं यावं! तिच्या तोंडांतहि पोपट राहायला आला होता. असामान्य स्पष्ट उच्चार नि चौकस चौफेर पृच्छा. मोठ्या माणसांसारखं एकांत एक गुंतवून, हात ढुंगणावर रुळवून—अगदीं आपल्याच ढंगदार तोऱ्यांतलं तिचं बोलणं चालणं—बावरणं—बसणं—उठणं. कोणालाहि मोहवण्या- सारखंच असायचं तें सारं!

त्या दिवशीं तर ती डोक्यावरून न्हाली होती. ते उन्हाळ्याचे दिवस. नुसती चड्डीच चढवून ती उघडीबंब घरांत दुडदुडत होती. एखाद्या मोठ्या मुलीसारखी कुंकवाची मोठी वाटोळी टिकली, त्याखालीं काजळाचा बारका पूर्ण विराम...बिन तेलाचे नुसते फणीनें मागें फिरविलेले भुरभुरे सोनेरी केस, कानांत लुडबूड करणारे तांबडे चकचकते डूल...

सकाळपासून तिच्या मनसोक्त मस्तीला तर अगदीं ऊतच आला होता! 'अशी मस्ती करूं नये!' म्हणून एकदां मी म्हणालों त्यावर त्या आजीबाईनें विचारलें "करूं नये!...कां हो करूं नये मस्ती?" तिचा प्रश्न गहन वाटल्यामुळें मी तो वादविवाद सुरुवातीलाच थांबवून तिलाच मस्ती करायला मोकळं सोडून स्वतःची सोडवणूक करून घेतली होती!—

शिरस्त्याप्रमाणें दुसरी उन्हाळी अंघोळ करतां करतां ब्लॉकचा बाहेरचा दरवाजा वाजण्याचा—उघडण्याचा आवाज कानांवर पडला. तिची बडबड गडबड एकदम थांबली!

कोणी तरी आलं असावं या कल्पनेनें मी स्नान संपवून बाहेर पडतों तों मोठं गमतीदार दृश्य माझ्या दृष्टीस पडलं.

माझे स्नेही खुर्चीवर बसले होते नि त्यांच्यासमोर, पाठीवर हात घेऊन ती बया संथपणें एखाद्या मोठ्या माणसाचा आव आणून, कांहीं तरी त्यांच्याशीं बोलण्यांत गढून गेली होती. धोतर नेसतां कपडे चढवीत बाहेर डोकावून मीं एकदम पुकारलं, "हल्लो ऽ...काय चाललंय्!"

"भयंकर खमंग आहे बरं का तुमची पोर!" माझे स्नेहीच मला स्पष्टी- करण करते झाले, "आल्याबरोबर बसायला खुर्ची, वाऱ्याला पंखा, वाचा- यला मासिक, बोलायला स्वतः, घरीं न्यायला तुमचं पुस्तक...तुमच्या गैर- हजेरींत तुमच्या प्रतिनिधीनें माझी अगदीं अगत्यपूर्ण व्यवस्था नि बरदास्त राखलीन्!...तुम्ही आला नसतां तरी चाललं असतं आमचं!—"

तेवढ्यांत तिच्या आईनें चहाचे दोन कप पुढें आणले.

"अरेऽ, हेंच तर सांगणार होतों मी इतक्यांत तुला." मी हंसत सौ. ला म्हणालों.

"पण हें आहे ना तुमच्याआधीं घरांतलं सर्वांत मोठं माणूस!... तिनंच सांगितलंन् मला!" आईचं हृदय कौतुकलं.

पण मग त्याच वेळीं, तिच्या हातांतला एक कप घेऊन 'काकां'पुढें करण्यासाठीं जेव्हां दोन चिमुकले हात एकदम लुडबूड करूं लागले तेव्हां क्षणापूर्वी कौतुकणाऱ्या मातोश्री तिच्यावर ओरडल्या, "अगऽ... अगऽ...थांब म्हणतें ना?...हो बाजूला... मोठी आली."

"सांडलं तर भाजेल ना?... म्हणून होऽ..." क्षणकाळ हिरमुसला झालेला बाळचेहरा पालटण्यासाठीं, कप हातीं घेतां घेतां आमच्या मित्रवर्यांनीं व्हाइट वॉशिंग केलं.

त्यानंतर मग...आमची आपसांतली [पान १५६ वर पहा]





अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## हपुसचा आंबा

[पान १५०वरून चालू] गप्पा—तिनं रिकामे कप आंत नेऊन ठेवले, सुपारीचा करंडा बाहेर आणून दिला...

अखेर तसल्या 'आंतबाहेर'मधून ती आपल्या पितळी भांड्यांच्या घरकुल संसारांत नि आम्ही आमच्या राजकारण–समाजकारणाच्या जगाच्या संसारांत केव्हां दंग झालों तें कोणाला समजलंसुद्धां नाहीं!

बऱ्याच वेळानें, मी कपडे चढवून बाहेर पडणारसं दिसतांच मात्र तिनें मला मोठ्यानें हांक मारली नि आंतल्या खोलींतूनच विचारलं, "मला हपूसचे आंबे आणणार होतां ना तुम्ही आज?"

आश्चर्य होऊन मी हंसत हंसत आंत गेलों तेव्हां त्याच अनादिसिद्ध पोषाखांत कॉटवर बसून, एका दांडीवर दोन्ही पाय टाकून टाकल्या वांकडं तिरकं पडून ती पुढेमागें झोके घेत होती. मोकळ्या केसांच्या झिंज्या मनेवर लोंबत होत्या नि खोलीशी डोकं करून माझ्याकडे उलट्या डोळ्यांनीं पाहात ती झोके घेत लडिवाळपणें तालबद्ध बडबडत होती, "आंऽबा, आंऽबा—हपूसचा आंबा!"

दाराकडे वळलेल्या माझ्या स्नेह्यांनीं तें बाहेरून ऐकलं. ते परत फिरले. त्यांनींहि आंत डोकावून पाहिलं.

तिच्या गोऱ्या चेहेऱ्यावर गोड रक्तिमा पसरत होता. कुंकवाची टिकली नि निळसर डोळे प्रकाशांत चमचमत होते नि पूर्वीसारख्या हालचाली करत ती लाडिकपणें पुटपुटत होती, "आंबा...आंबा—हपूसचा आंबा!!"

तिकडे पाहतां पाहतां माझे मित्र क्षणकाळ चमकल्यासारखे झाले...पण मग, लागलीच ते मनमुराद मोठ्यानें हंसलेहि.

चटकन् पुढें होऊन त्यांनीं तिच्या गालाला स्पर्श केला व स्मित करीत ते म्हणाले, "अग, पण हो ऽ..तुला ग कशाला आंबा?...स्वतः तूंच आहेस कीं एक हपूसचा आंबा!"

त्यावर प्रथम आम्ही तिघं अभावितपणें हंसलों नि त्याच्या पाठोपाठ ती उनाड पोरहि मोठ्यानें खदखदत व माना वेळावीत म्हणाली, "आंबा...आंबा...मी हपूसचा आंबा!"

ट्राम–बस–गाडी...तीनचार तास...तीनचार ठिकाणीं सेवकाईनें फिरलों. घरची जराशीही आठवण नव्हती माझ्या त्या वेळच्या स्वैर मनाला. अखेर बऱ्याच उशीरा घरीं परतलों.

पण दारांतून आंत शिरलों तों काय आश्चर्य—कॉटवर बिछाना—बिछान्यावर पोर—घडी तिच्या डोक्यावर—आई तिच्या शेजारीं—घरांत अगदीं सामसूम.

तो सारावू ट्रान्फर सीन पाहून केवढ्यानें तरी दचकलों मी! गोंधळल्या मनानें जवळ गेलों. गालाला लावलेला हात भाजला. तिचा डोळा लागला होता. मंद श्वासोच्छ्वासानें अंगावरची चादर वरखालीं होत होती.

तिच्या आईला मीं डोळ्यानेंच विचारलं, "म्हणजे? हें काय?" "काय कीं बाईऽ! उन्हाळा ना?..." ती चिंताक्रांत चेहेऱ्यानें हळूच पुटपुटली, "आज पुन्हा न्हालीय् त्यांत!..नको म्हटलं तरी दिवसभराचा तो सगळा धिंगाणा—तिन्ही सांजेला भरला...!"

माझ्या काळजांत चर्र झालं.

तसाच उठून आमच्या डॉक्टरना टॅक्सींत टाकून आणलं.

कडक उन्हाळ्याचा तो परिणाम टरला. गोळ्या, पुड्या, चाटणं, डोस तसाच त्यांच्याबरोबर जाऊन घेऊन आलों.

निरनिराळी निदान–चिकित्सा आणि औषधी पर्याय करूनहि चार दिवस झाले तरी ताप चाराखालीं उतरेना. मनांत सारखी रुखरुख वाटूं लागली. कांद्याचा नायटा होतो कीं काय आतां?—

आम्हीं दोघांनीं सारखं तिच्या उशाशीं बसून निःश्वास टाकावेत, तिनं अर्धवट ग्लानींत नि अर्धवट शुद्धींत कधीं कधीं कांहीं कांहीं बोलावं, आम्ही तें ऐकावं, तिची समजूत घालावी, एकमेकांकडे पहावं नि पुन्हा निःश्वास टाकावेत—

असे तासामागून तास रेंगाळत होते.

त्या दिवशीं तिन्हीसांजेला मात्र काय माझ्या मनांत एकाएकीं आलं, कोण जाणे!

मी पटकन् उठलों. चपला पायांत चढवल्या नि दाराची कडी उघडूं लागलों.

माझ्यामागें दोन अर्थपूर्ण उत्सुक डोळे लागले होते. त्यांना मीं हळूच उत्तर दिलं, "हा आलोंच बघ नाक्यावरून—मला दिवसभर काकूंची आठवण होतेय्—"

ती कांहीं बोलण्यापूर्वींच मी झपाझप नाक्यावर जाऊन पोहोंचलो होतों.

फळवाल्यांच्या निरनिराळ्या फळांच्या पाट्या दिव्यांच्या झगझगाटांत प्रकाशत होत्या. त्यांतल्या एका आंब्याच्या टोपलीनें माझं लक्ष वेधून

घेतलं. जवळ जाऊन त्यांतल्या त्यांत निवडून मी एक मोठ्यांतला मोठा आंबा उचलला; रुपयाची नोट पुढं करून त्यानं परत केलेले तीनचार आणे निमूट खिशांत घातले नि घरीं परतलों.

अजून ती ग्लानींतच होती; जवळ उभा राहून मूकपणें पाहात तो आंबा मीं तिच्या आईच्या हातांत दिला. मी काय करत होतों तें त्याक्षणीं माझं मलाच स्पष्ट होत नव्हतं.

सौ. क्षणकाळच साश्चर्य पहात होती. पण लगलीच तिनं तो हातीं घेऊन आपल्या लेकीच्या अंगावरून हळुवारपणें तीनदां फिरवला व अलगद उचलून माझ्या हातीं परत दिला.

एक शब्दही न बोलतां मी पुन्हा बाहेर पडलों व झपाझप पावलं टाकत ट्रामच्या फांट्यांवर आलों.

बरेच दिवे गेले होते. अंधुक उजेड होता. तुरळक गजबज गडबड होती. माझं मन एकाच कल्पनेनं भारलं होतं. भरलं होतं. थरारलं होतं—

सौ. नें परतवलेला तो हापूसचा आंबा हातांतच होता. त्या वेळीं मनांत येत होतं तें मनाशींच बोलत होतों—केवढा योगायोग हा...काकूंचा विश्वास...माझी चलबिचल...आजच्या माझ्या चिमुकल्या जगांतला कसोटीचाच प्रसंग आहे...सर्व चांगलं व्हावं हीच आमची उत्कट इच्छा...पण...हा मनांतला गोंधळ...माझे मित्र तसे प्रेमळ नि सद्हेतुप्रेरित आहेत. तरी पण त्यांची मुलं...त्यांची तुलना...मानवी मन त्यांतल्या नकळतच्या सुप्त पण प्रखर अशा इच्छा–आकांक्षा–अभावित असूया...मत्सर...ज्याच्या त्यालाहि त्या कळत नसतील! त्या दिवशींचा तो प्रसंग, ती वरगुती घटना...त्या वेळचें त्याचे ते बोचणारे उद्गार 'हापूसचा आंबा' ...ती त्या वेळची त्यांची तीव्र आनुभवलेली हटी—ती—कदाचित् त्यांची ती त्या वेळच्या हटींतली—हट्ट—इडापिडा टळो नि माझ्या चेटकं—अशा सान्यांचंच चांगलं होवो!"

निमूटपणें तो हापूसचा आंबा मीं त्यांच भर रस्त्यांत टाकला नि भराभर पावलीं घरतलीं.

सौ. दारांतच उभी राहून माझ्या परतण्याकडे डोळे लावून होती दोघांची मुग्धपणेंच दृष्टभेट झाली तेव्हां दोघांनाहि जणूं हीच संच वाटत होतं. हुरहुर कमी झाली होती.

यानंतर पुढलं सांगितलं कोणाला तर कपोलकल्पितच वाटेल तें—

—पण त्याच रात्रींची गोष्ट...बाराच्या सुमाराला तिला इतका दरदरून घाम सुटला कीं, एकामागून एक चार चादरी ओल्याचिंब झाल्या...

सकाळीं तिचा ताप साफ उतरला. दुपारीं ती हुशार झाली. संध्याकाळीं गप्पागोष्टी करूं लागली नि कांहीं वेळानें हंसतां खेळतां आपल्या बोलण्यावरून बोलणं चाललं असतां जणूं आपल्याच तंद्रींत रंगून म्हणाली, "आई ऽ आई ऽ...हापूसचा आंबा! कुठं ग आहे, आई. हापूसचा आंबा?"

त्या तिन्ही सांजेच्या वेळीं तिची आई स्वयंपाक करत चुलीपाशीं बसली होती. तिचे ते अभावित शब्द फिरून कानांवर पडतांच ती चमकली. समोरच्या बरणींतून तिनें दोनचार मिठाचे खडे उचलले. ती लगबगीनें पुढें आली. आपल्या पोरीच्या अंगावरून ते ओवाळून तिनें चुलींत भिरकावले व कांहीं पुटपुटून मग तिला अर्धवट रागांत म्हणाली, "पुरे ग बाई माझे आई—तुझा तो हापूसचा आंबा! मिळाला तेव्हा पुरला नाहीं वाटतं?"

त्यावरून मला दोनतीन वर्षांपूर्वीच्या प्रसंगींची ती काकूंची बडबड आठवली, तें नाटक दिसूं लागलें. ती बडबड कानांवर पुन्हा आदळूं लागली—

नोंच समोरच्या शेगडीचं काळं आपल्या बोटानें काढून सौ. नें आपल्या पोरीच्या कपाळावर एक मोठा थोरला फरफाटा ओढला!

त्या वेळीं ती लाघवी पोर एकदम खुदकन् हंसली. तिची आईहि हंसली...त्या दोघींच्या डोळ्यांतला प्रेमळ भाव मलाहि हंसवीत होता...पण तरी हसतां हसतां मी गंभीरहि झालों! कारण तो सारा प्रत्यक्ष अनुभवच तसा चमत्कारिक होता. अनुभव खरा, पण बुद्धीला तो पेलत नव्हता...मन इकडे हेलकावे खात होतं...





अनुक्रमणिका











## भर दुपार

भर दुपार, भर दुपार —
इमारतीची पाठ तापली
खिडकी डोळे मिटून बसली
कुठें निवारा बघे साउली
बसेच धरुनी दार !
भर दुपार, भर दुपार !
—फरशीवर लोळतात ताई
न्द रेडिओ ऐकूं येई
ाब्द मनावर सरकत जाई
'गंगाकिनार हो गंगाकिनार'
भर दुपार, भर दुपार !
—काव काव कुणि करितो धीट
नेई उचलुनि उरलें शीत
पिंजऱ्यांतला हिरवा पोपट
दे न मुळीं हुंकार
भर दुपार, भर दुपार !
—रस्ता डांबर जाळित बसतो
चौकीमधिं पोलीस पेंगतो
पंखा माडीवरून ववतो
छटेल फार, छटेल फार
भर दुपार, भर दुपार !
—ग्रंथ चाले दिवसाच्या मनीं
हळूच केव्हां हंसतो मधुनी
मायुक संध्या दिसवं नयनीं
विकल लागुनी पार !
भर दुपार, भर दुपार !

— वि. म. कुळकर्णी



जुना विस्कळित कायदा आपल्या गरजा भागवूं शकत नाहीं. म्हणून जुन्या स्मृति बदलल्या पाहिजेत आणि नव्या स्मृतींचें स्वागत केलें पाहिजे!

हिंदु कायदा आणि समाजसुधारणा यांचा संबंध फार प्राचीन आहे. विवाहसंस्थेसंबंधीं नियम घालून देणाऱ्या श्वेतकेतूला या बाबतींत अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. कायदा समाजधारणेकरितां असतो. 'धारणाद्धर्मः' अशी धर्माची व्याख्या एके ठिकाणीं केलेली आहे. संस्कृतांत धर्म या शब्दाचा अर्थ कायदा असाहि होतो. प्राचीन आर्यांनीं ही कल्पना स्वीकारली असल्यामुळें, ज्या ज्या वेळेस समाजाचें हित आणि समाजाला मार्गदर्शन करणारा कायदा यांत विसंगति निर्माण झाली त्या त्या वेळेस कायद्यांत इष्ट तो बदल केला गेला. संस्कृत वाङ्मयांतील निरनिराळ्या स्मृती व निबंधग्रंथ, समाज गतिमान् असल्यामुळे कायद्यालाहि गतिमान व्हावें कसें लागतें याबद्दल खात्री देतात. पुष्कळ वेळां कायदा समाजाच्या पुढें जाऊन सुधारणा घडवून आणतो. ज्या समाजांत कायदा ईश्वरप्रणीत आहे अशी समजूत असेल त्या समाजांत कायद्यामध्यें फरक घडवून आणणें सहज शक्य नसतें. ईश्वरप्रणीत कायद्यांत मानवानें बदल करणें म्हणजे पावित्र्यविडम्बन होय अशी समजूत आहे. परंतु पण हिंदु कायद्यांत ऐतिहासिक कालीं ज्याप्रमाणें स्मृतींनी आणि निबंधग्रंथांनीं फरक घडवून आणले त्याचप्रमाणें रूढी किंवा सदाचार यांच्या आधारावरही पुष्कळ फरक करण्यांत आले. स्मृति या श्रुतींवर आधारलेल्या आहेत अशी कल्पना असल्यामुळें स्मृतींनाहि पावित्र्याचा मान मिळाला आहे. पण 'सदाचार' किंवा रूढी यांनाहि जेव्हां कायद्याचे 'उगमस्थानें' समजण्याचा मान मिळतो तेव्हां त्याचा अर्थ ईश्वरप्रणीत कायद्यांत सदाचाराचा आश्रय घेऊन [illegible] सुधारणा घडवून आणण्याचा हक्क मानवाला आहे, असा होतो. हिंदु कायद्यांत पुष्कळ बदल रूढीच्या आधारावर केलेले आहेत याप्रमाणें नवीन स्मृतींचा किंवा नवीन रूढींचा व आवश्यक असल्यास दोन्हींचाहि आधार घेऊन हिंदु समाजानें हिंदु कायद्यांत आवश्यक त्या सुधारणा केल्या व समाजाला वर्धिष्णु आणि बलिष्ठ केलें.

## ब्रिटिश राजसत्ता आणि हिंदु कायदा

हिंदु कायद्यांतील ही गतिमानता व प्रगमनशीलता ब्रिटिश राज्यसत्तेच्या आगमनामुळें कुंठित झाली. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी स्वतःच्या फायद्याकरितां, हिंदु कायद्याचा व धर्माचा निकट संबंध असल्यामुळें जुन्या स्मृतिप्रणीत कायद्यांत हस्तक्षेप करण्याचें नाकारलें. या वृत्तीमुळें कायदा आणि समाजसुधारणा यांचे जे अन्योन्य संबंध होते ते तुटले. नवीन समाजाचें नियमन जुना कायदा करूं लागला [illegible] विसंगती निर्माण झाली. हिंदु कायद्यासंबंधीं निर्णय देतांना इंग्लीश न्यायाधीशांना शास्त्री आणि पंडित यांची मदत मिळत असे. या शास्त्री-पंडितांनीं सांगितलेला अर्थ सर्वदाच बरोबर होता असें नव्हतें. पुष्कळ वेळां सांप्रदायिक अभिमानामुळें तो अर्थ बरोबर नसे. त्यामुळें त्या अर्थावर आधारलेले निर्णय हिंदुधर्मशास्त्रांशीं पुष्कळ वेळां विसंगत असत. सन १८६८ सालीं शास्त्री-पंडित यांची मदत मिळविण्याची प्रथा बंद करण्यात आली. त्यामुळें धर्मशास्त्राचा अर्थ फक्त भाषांतरावरूनच ठरविण्यांत आला. हीं भाषांतरेंहि सदोष असत. सन १८७२ मध्यें प्रिव्ही कौन्सिलानें एका खटल्यांत (कलेक्टर ऑफ मदुरा वि. मोटु रामलिंगम्) असे उद्गार काढले कीं, हिंदु काय-

प्रा० त्र्यंबक कृष्ण टोपे, एम्. ए., एलएल्. बी.

ग्रांतील एखादें तत्त्व जुन्या स्मृतींत आढळून येतें कीं नाहीं हा महत्त्वाचा प्रश्न नसून त्या तत्त्वाचा स्वीकार त्या संप्रदायांत ('स्कूल' मध्यें) झाला कीं नाहीं याबद्दल प्रामुख्यानें विचार केला पाहिजे. यामुळें जुन्या स्मृतींतील तत्त्वेंहि हिंदु कायद्याचा अर्थ लावतांना तीटशी स्वीकारलीं गेलीं नाहींत. याचा परिणाम त्या कायद्यामध्यें अनिश्चिति आणि घोटाळा निर्माण करण्यांत झाला. रूढीमुळें कायद्यांत जी प्रगति व्हावयाची तीसुद्धां फार मंद गतीनें होऊं लागली. कारण कोणती रूढी स्वीकारावयाची याबद्दल साक्षीच्या कायद्यांत कांहीं नियम आहेत. त्या नियमांच्या चौकटींत बसेल असलीच रूढी मान्य होऊं लागली. शिवाय साक्षीच्या कायद्याचे नियम पाळून न्यायालयांत रूढी सिद्ध करणें फार कठीण काम आहे. यामुळें रूढीचा आश्रय घेऊन येणारी गतिमानता जवळ जवळ अशक्यच झाली. शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रूढीमुळें होणारी प्रगति सर्वदा स्वीकारणीय असतेच असें नव्हे. कारण कित्येक रूढी भूतकाळांतील पूर्वग्रहावर आधारलेल्या असतात. विसाव्या शतकांत विज्ञानाच्या प्रगतीमुळें जीवनमूल्यें बदललेलीं आहेत. जीवनविषयक प्रश्नांचें स्वरूप आतां जागतिक झालें आहे. यामुळें आपल्या समाजाला लागणारा कायदा केवळ पूर्वपरंपरा व रूढी यांवर आधारला तर आधुनिक जगतांत आपण फार मागें पडूं व आपल्या राष्ट्राची प्रगति कुंठित होईल. म्हणूनच स्मृतिप्रणीत कायदा किंवा रूढीमान्य कायदा यांनीं आपले प्रश्न आजच्या काळांत सुटणार नाहींत याबद्दल आपण पूर्णतया खात्री करून घेतली पाहिजे. इस्लामच्या जुन्या तत्त्वावर आधारलेला कायदा तुर्कस्ताननें टाकून दिला व नवीन कायद्याचा स्वीकार केला. यामुळेंच तुर्कस्तान युरोपीय राष्ट्रांत मानाचें स्थान मिळवूं शकला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

### महत्त्वाचा खुणेचा दगड

भारतांत मात्र स्मृतिप्रणीत हिंदु कायदा पाळण्याचें ईस्ट इंडिया कंपनी व नंतर ब्रिटिश सरकारनें स्वीकारलें. यामुळें कायद्यांतील गतिमानता नष्ट झाली. पूर्वीच्या स्मृतिकारांनी गरजेनुसार केलेले कायदे १९ व्या व २० व्या शतकांतील हिंदुसमाजाला लागू करण्यांत आले, फक्त कांहीं बाबतींत मात्र फरक करण्यांत आला. इंग्रजी शिक्षणाच्या प्रसारानें इंग्लंडमधील न्यायाचीं तत्त्वें सुशिक्षित लोकांना समजूं लागलीं व आपल्या समाजांतील कांहीं चालीरीतींविषयीं त्यांच्या मनांत घृणा उत्पन्न झाली. सतीसारखी क्रूर व अमानुष चाल हिंदु समाजाला लांछनास्पद आहे याची कठोर जाणीव राजा राममोहन राय यांसारख्या सुधारकांना झाली व त्यांनीं त्या चालीविरुद्ध यशस्वी चळवळ केली आणि १८२९ सालीं कायद्यानें त्या चालीला प्रतिबंध केला. ब्रिटिशांच्या अमदानींतील कायद्याच्या जोरावर समाजसुधारणा करण्याचा हा फार महत्त्वाचा असा खुणेचा दगड आहे. हिंदु समाजावरील एक कलंक नाहींसा झाला. १८३२ सालीं मिलनें हिंदु कायद्याची संहिता (कोड) तयार करावी अशी सूचना केली व त्याप्रमाणें पार्लमेंटनें एक कमिटी नेमली. त्या कमिटीनें एक रॉयल कमिशन नेमावें अशी सूचना केली. लॉर्ड मेकाले यांच्याकडे कायद्याचें संहितीकरणाचें काम देण्यांत आलें. पण तें काम १८५५ सालीं सोडून देण्यांत आलें. इंग्लंडकडून हा प्रयत्न जरी सोडून देण्यांत आला तरी हिंदु समाजसुधारकांचे प्रयत्न मात्र चालू होते. हिंदुसमाजांतील दुसरा कलंक म्हणजे हिंदु विधवांना मिळणारी निर्दय वागणूक. यामुळें पुष्कळ विधवा आत्महत्त्या करीत असत. त्यांना पुनर्विवाहाचा मार्ग मोकळा करून त्यांचें जीवन सुसह्य करण्याची परवानगी १८५६ च्या कायद्यानें दिली, यानंतर विधिमंडळानें पुष्कळ कायदे पास केले व हिंदु समाजांत सुधारणा घडवून आणली. अशा कायद्यांची संख्या १७ पेक्षां जास्त आहे. त्यांत प्रांतिक कायदे मंडळानें पास केलेल्या कायद्यांचा अंतर्भाव केलेला नाहीं. शेवटचा कायदा १९४९ सालीं पास करण्यांत आला व आंतर्जातीय विवाहाला मान्यता देण्यांत आली. समाजसुधारणांच्या प्रत्येक प्रयत्नाच्या वेळेस सनातनी विचारांच्या लोकांनीं विरोध केला व सुधारणांमुळें हिंदुधर्मावर मोठें संकट येणार आहे असा युक्तिवाद केला. या कायद्यामुळें प्रगति झाली हें खरें, पण ती सर्वांगीण प्रगति नव्हती. मुंबई राज्यापुरताच विचार केला तर असें दिसून येतें कीं आम्ही या बाबतींत थोडीशी जादा प्रगति केली आहे. द्विभार्या प्रतिबंधक कायदा, घटस्फोटाचा कायदा, हरिजनांना सार्वजनिक ठिकाणीं समानतेची वागणूक मिळविण्याचा हक्क व मंदिरप्रवेशाचा हक्क मिळवून देणारे कायदे या सर्वांचा विचार केला तर मुंबई विधिमंडळानें समाजसुधारणेच्या बाबतींत स्पृहणीय कामगिरी केली असें दिसून येतें. मुंबई राज्यांतील हायकोर्टानेंहि हिंदु कायद्यांत सुधारणा घडवून आणण्यास, व पास झालेल्या कायद्यांचा सुधारणानुकूल अर्थ लावण्यास हातभार लावला आहे. या बाबतींत बरेंचसें श्रेय मुंबई हायकोर्टाचे सुधारणाप्रिय व स्वतंत्रप्रज्ञ न्यायाधीश न्यायमूर्ति गजेंद्रगडकर यांना आहे. अमेरिकेच्या सुप्रीम कोर्टाच्या इतिहासांत न्यायमूर्ति ऑलिव्हर वेंडेल होम्स यांनीं जी चिरस्मरणीय कामगिरी केली व कायद्याचा अर्थ लावितांना सुधारणा घडवून आणली, त्याच प्रकारचें कार्य न्यायमूर्ति गजेंद्रगडकर हे करीत आहेत. त्यांनीं १९४८ सालीं एका खटल्यांत सगोत्र विवाहाला अनुकूल अशी जर रूढी असेल तर तसला विवाह कायदेशीर आहे, असा निकाल दिला व निकालपत्रांत सगोत्र विवाहाला कायदेशीरपणा देण्याकरितां विधिमंडळानें कायदा पास करावा, असें विधान केलें. त्याप्रमाणे १९४६ साली हिंदी विधिमंडळानें सगोत्र विवाहाला मान्यता देणारा कायदा पास केला.

### राज्यघटना आणि समाजसुधारणा

हिंदुसमाजांतील सुधारणेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची कामगिरी घटनेंतील १७ व्या कलमानें केली आहे. अस्पृश्यतेचा कलंक कायद्यानें नाहींसा झाला आहे. अस्पृश्यतेंतून उद्भवणारे दोष कोणावरही लादणें हा गुन्हा समजला जाणार आहे. याच राज्यघटनेंत स्त्रियांना पुरुषांइतकेच अधिकार दिलेले आहेत व सर्वांना कायद्यापुढें समान वागणूक मिळेल असेंही आश्वासन दिले आहे. घटनेंतील या कलमांच्या तत्त्वांचा विचार केला तर आजचा हिंदु कायदा संपूर्णतया बदलणें आवश्यक झालें आहे; पण दुर्दैवाची गोष्ट म्हणजे याच घटनेचा आधार घेऊन समाजसुधारणेचे विरोधक आपलें कार्य पुढें चालवीत आहेत. मुंबई राज्यांतील 'द्विभार्या-प्रतिबंधक कायदा' घटनेंतील मूलभूत हक्कांशीं विसंगत असल्यामुळें त्याच्या कायदेशीरपणाबद्दल संशय निर्माण करण्यांत आला. विरोधकांनीं राज्यघटनेंतील १४ वें व १५ वें कलम यांचा आधार घेऊन 'द्विभार्या प्रतिबंधक कायदा' राज्यघटनेशीं विसंगत आहे असा दावा मांडला. या युक्तिवादाला कायदेशीर उत्तर हायकोर्टानें आपल्या निकालपत्रांत दिलें आहे. (पहा : बॉम्बे लॉ रिपोर्टर, १५ सप्टेंबर १९५२ पान ७८१). या निकालपत्रांत न्यायमूर्ति गजेंद्रगडकर यांनीं धर्मशास्त्राचा आधार घेऊन पूर्वीसुद्धां एकपत्नीत्व शिष्टसंमत होतें असें दाखविलें आहे. आपस्तम्ब

धर्मसूत्रांत एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "जो आपल्या निरपराधी पत्नीला निष्कारण टाकतो त्यानें गाढवाचें कातडें—केस बाहेरच्या बाजूनें दिसतील असें—पांघरून रोज सात घरीं भिक्षा मागावी. असा कार्यक्रम सहा महिने करावा." त्याच निकालपत्रांत न्यायमूर्ति गजेंद्रगडकर यांनीं हिंदूंचे धार्मिक आचार व विचार यांसंबंधीं विवेचन करून, समाजसुधारणेच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे उद्गार काढले आहेत. न्यायमूर्ति आपल्या निकालपत्रांत म्हणतात, **"माझ्या मतें द्विभार्याप्रतिबंधक कायद्यानें, राज्यविधिमंडळानें हिंदुधर्म किंवा आचार यांवर अतिक्रमण केलें आहे या मुद्यांत कांहीं अर्थ नाहीं. पण जरी राज्यविधिमंडळानें हिंदुधर्म किंवा आचार यावर अतिक्रमण केलें हा दावा मान्य केला तरी समाजसुधारणा आणि समाजहित यांकरितां जर विधिमंडळ कायदा करीत असेल तर विधिमंडळाला तसलें अतिक्रमण करण्याचा अधिकार आहे."** (पान ७९२)

न्यायमूर्ति गजेंद्रगडकर यांचे हे उद्गार फार अर्थपूर्ण व महत्त्वाचे आहेत. भारतांतील एका महत्त्वाच्या उच्च न्यायालयांतील धर्मशास्त्रज्ञ व व्यासंगी कायदेपंडितांनीं समाजसुधारणा आणि कायदा याबद्दल जे उद्गार काढले आहेत ते प्रत्येकानें लक्षांत ठेविले पाहिजेत. समाजसुधारणेचे सनातनी विरोधक धर्मशास्त्राची ढाल पुढें करतात. विरोधकांचा दुसरा वर्ग शिक्षितांचा आहे. तो राज्यघटनेचा आधार घेऊन, हिंदुसमाजसुधारणा कायद्यानें करावी या प्रवृत्तीला विरोध करीत आहे. त्यांना योग्य उत्तर मुंबई हायकोर्टाचें वरील निकालपत्र देतें.

**हिंदुकोड आणि राज्यघटना**

आपल्या राज्यघटनेंत सामाजिक समता अंतर्भूत करण्यांत आली आहे. त्याचप्रमाणें स्त्री-पुरुषांना समान संधि आणि हक्क, सार्वजनिक जीवनांत जातिभेदरहित व्यवस्था वगैरे गोष्टींसंबंधीं मूलभूत हक्क दिले आहेत. ही राज्यघटना आपण सर्वांनीं आनंदानें स्वीकारली पाहिजे. त्या घटनेला अनुकूल असा समाज निर्माण करणारा कायदा अत्यंत आवश्यक आहे. प्रस्तुतचा हिंदु कायदा सामाजिक विषमतेवर आधारलेला आहे. शूद्रांना कांहीं बाबतींत कमी अधिकार आहेत तर स्त्रियांना पुरुषांइतके संपत्तीवर अधिकार नाहींत. प्रस्तुतचा कायदा दत्तकाच्या बाबतींत जातिभेद मान्य करतो. शिवाय भारतांतील निरनिराळ्या भागांतील हिंदूंना एकच कायदा लागू नसून वेगवेगळे कायदे लागू आहेत. असल्या प्रकारचा हिंदु कायदा आपणांस पाहिजे तसली समाजरचना निर्माण करूं शकणार नाहीं. हा कायदा बदलणें आवश्यक आहे. तसा प्रयत्न आज हिंदु कोड करीत आहे.

(१) आजच्या हिंदु कायद्यांत दत्तकासंबंधीं जे नियम आहेत, ते व्यवहार व धर्मशास्त्र यांच्याशीं विसंगत आहेत. दत्तकाचें वय किती असावें यासंबंधीं कांहीं नियम नाहींत. २० वर्षांचा हिंदु ९० वर्षांच्या म्हाताऱ्यास दत्तक घेऊं शकतो. ये त्या मुलाचें लग्न झालेलें असलें व त्याला मुलें असलीं तरी कांहीं [illegible] नाहीं. [illegible] दत्तक हा त्याच जातींतला असला पाहिजे असाहि [illegible] नियम आहे. हिंदु कोडांत दत्तकाचें वय १५ पेक्षां जास्त असतां कामा नये, दत्तक कोणत्याहि जातींतील असला तरी चालेल व दत्तक पिता नाहीं दत्तक घेतांना स्वतःच्या पत्नीची संमति घेतली पाहिजे अशी व्यवस्था केली आहे.

(२) विवाहाचे दोन प्रकार हिंदु कोडांत मान्य केले आहेत. एक धार्मिक व दुसरा 'सिव्हिल.' धार्मिक विवाह, सप्तपदीसारखे संस्कार आवश्यक असल्यास, ते संस्कार पूर्ण झाल्यानंतरच तो कायदेशीर समजला जाईल. सिव्हिल विवाह रजिस्ट्रारपुढें व्हावयाचा आहे. विवाहाच्या बाबतींत जातिभेद नाहींसा केला आहे. वधूचें वय कमींत कमी १५ व वराचे १८ असलें पाहिजे. एकपत्नीत्वाची पद्धति सर्व हिंदूंवर करण्यांत आली आहे, त्याचप्रमाणें घटस्फोटाचे अधिकारहि देण्यांत आले आहेत. एकपत्नीत्व आणि घटस्फोट यासंबंधीं कायदे मुंबई राज्यांत सध्या चालू आहेत. विवाहाच्या क्षेत्रांतून जातिभेदाचें उच्चाटन १९४९ च्या २१ व्या कायद्यानें अगोदरच केलें आहे. जातीच्या आचारावर घटस्फोट देण्याची प्रथा हिंदु कोडानें अमान्य केली आहे. कारण त्यामुळें पंचांच्या लहरीवर घटस्फोट मिळणें वा न मिळणें अवलंबून असे. घटस्फोट मिळण्याकरितां जीं कारणें दिलीं आहेत त्यांचा विचार केला तर असल्या कायद्यामुळें अमेरिकेसारखी परिस्थिति आपल्या देशांत होईल ही भीति अनाठायीं आहे हें स्पष्ट होईल. विवाहाच्या बाबतींतील 'सापिंड्याची' माहिति त्यांत सविस्तरपणें दिली आहे.

(३) आजच्या हिंदु कायद्यांत स्त्रियांना संपत्तीसंबंधीं फारच मर्यादित हक्क आहेत. हिंदु विधवेला जर मुलगा नसेल तर पतीच्या मालमत्तेची व्यवस्था करण्याचा तिला हक्क आहे. पण ती मालमत्ता विकण्याचा हक्क मात्र तिला मर्यादित स्वरूपाचा आहे. मुलींचे लग्न, मुलांचें शिक्षण, मालमत्तेचें संरक्षण वगैरे बाबीकरितांच तिला मालमत्ता विकता येते किंवा गहाण ठेवितां येते. जगांतील कोणत्याहि कायद्यांत असल्या प्रकारचें बंधन स्त्रियांच्या मालमत्तेवर नाहीं. मिताक्षरा या ग्रंथाचा कर्ता विज्ञानेश्वर यालाहि हीं बंधनें मान्य नव्हतीं. आपल्या राज्यघटनेंत स्त्रियांना पुरुषांइतकेच हक्क देण्यांत आले आहेत म्हणून हिंदु कोडांत या मर्यादित हक्कांना स्थान नाहीं. स्त्रियांना संपत्तिविषयक संपूर्ण हक्क मिळणार आहे. स्त्रियांच्यासंबंधीं दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे मुलीला मुलाबरोबर किंवा तिच्या आईबरोबर वारसा हक्क नाहीं. फक्त जर मुलगा किंवा विधवा नसेल तरच तिला वडिलांची संपत्ति मिळते व त्या संपत्तीमध्येसुद्धां मुंबई सोडून इतर ठिकाणीं तिचा मर्यादित हक्क असतो. इतर सर्व कायदेपद्धतींत मुलीला वारसा हिस्सा मिळण्याची सोय केलेली आहे. आजचा हिंदु कायदाच या बाबतींत मागासलेला आहे. कोडांत मुलीला वारसा हक्क मिळावा अशी तरतूद केलेली आहे. (तिचा हिस्सा मुलाच्या हिश्याच्या निम्मे असावा, असाही नियम घातला आहे.) या बाबतींत देखील कोडाला धर्मशास्त्राचा पाठिंबा आहे.

(४) हिंदु कोडासंबंधीं सर्वांत वादग्रस्त भाग म्हणजे एकत्र कुटुंबपद्धतीसंबंधीं सुचविलेली योजना होय. आजच्या हिंदु कायद्याला दोन प्रकारची कुटुंबपद्धती मान्य आहे. बंगालमध्यें 'दायभाग' पद्धती व भारताच्या इतर भागांत 'मिताक्षरा' पद्धती अशा दोन चालू आहेत. दायभाग पद्धतींत सर्व मालमत्तेवर बापाचा हक्क असतो. वडिलोपार्जित व स्वसंपादित मालमत्ता असा त्यांत भेद बापाच्या हक्काच्या दृष्टीनें केलेला नाहीं. बाप जिवंत असतांना मुलाचा त्या संपत्तीवर मुळींच अधिकार नसतो. बापाच्या मृत्यूनंतर वारसा-क्रमानें (Succession) ती संपत्ति मुलाकडे जाते. याच्या उलट 'मिताक्षरा' पद्धतींत जर एखाद्या हिंदूजवळ वडिलोपार्जित मालमत्ता असली, तर त्या मालमत्तेंत त्याचा पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र यांना जन्मतःच हक्क मिळतो. त्यामुळें त्या मालमत्तेचा उपयोग करण्याच्या अधिकारावर पुष्कळ निर्बंध आहेत. फक्त कांहीं बाबतींतच बापाला व कांहीं बाबतींत एकत्र कुटुंब पद्धतीच्या 'कर्त्याला' ती मालमत्ता विकण्याचा किंवा गहाण टाकण्याचा अधिकार आहे. या निर्बंधामुळें मालमत्तेची देवघेव फार कठीण झाली आहे. मिताक्षरा कुटुंबपद्धतींतील दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे एखादा सहभागीदार मरण पावला तर त्या एकत्र कुटुंबाच्या मालमत्तेंतील त्याचा हिस्सा त्याची पत्नी किंवा मुलगा (नातू आणि पणतू) यांपैकीं कोणी नसेल तर, त्याच्या इतर सहभागीदाराला शेषाधिकारानें (Survivorship) मिळतो. त्याची मुलगी असली तरी तिला मिळत नाहीं. हिंदु कोडांत या दोन पद्धतींतील भेद नाहींसा केला आहे व सर्व भारताला दायभाग कुटुंबपद्धतीसारखी पद्धत लागू करण्याची योजना केली आहे. यासंबंधीं एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हिंदु कोडानें एकत्र कुटुंबपद्धती नाहींशी करण्याचा प्रयत्न केला नाहीं तर एकत्र कुटुंब पद्धतीच्या मालमत्तेवर आघात केलेला आहे. शिवाय धर्मशास्त्रांच्या आधारावर मिताक्षरा एकत्र कुटुंबपद्धतीचें समर्थन करणें पुष्कळच कठीण आहे. या बाबतींत न्यायमूर्ति गजेंद्रगडकर यांनीं खालील उद्गार काढले आहेत : "It is therefore necessary to remind the students of Hindu law that too much and unqualified insistence on the Mitakshara doctrine by birth and survivorship is not justified having regard to all texts of Hindu law" (p. 40. The Hindu Code Bill, by justice Gajendragadkar).

### अशी ही नवी स्मृति

हिंदु कोडांत याशिवाय इतर बाबींसंबंधीं योजना आहेत. पण त्या सामान्यस्वरूपाच्या असून प्रस्तुतच्या कायद्यांत त्यामुळें फार फरक होणार नाहीं. हिंदु कोडांतील प्रमुख योजनांना धर्मशास्त्राचा आधार आहे असें सिद्ध करतां येतें. पण कोडाचें समर्थन करण्याच्या अनेक मार्गांपैकीं एक मार्ग आहे. कोडाची आवश्यकता आपल्या जीवनांतील नवीन प्रमेयांमुळें वाटूं लागली आहे. जुना विस्कळित कायदा आपल्या गरजा भागवूं शकत नाहीं. म्हणून जुन्या स्मृती बदलल्या पाहिजेत. जुनी वर्णव्यवस्था, जातिभेद यांना मूठमाती देण्याची आवश्यकता आजच्या काळांत निर्माण झाली आहे. राज्यघटनेशीं सुसंगत असा हिंदुसमाज निर्माण झाला तरच राज्यघटना देशाला बलिष्ठ करूं शकेल; अन्यथा नाहीं. तसला समाज निर्माण करण्याचें सामर्थ्य आजच्या हिंदु कायद्यांत नाहीं. इतकेंच नव्हे तर तसल्या समाजाच्या निर्मितींत आजचा हिंदु कायदा अडथळेच निर्माण करील. नवीन कोड धर्मशास्त्राशीं विसंगत असलें तरी आवश्यक म्हणून मान्य केलेंच पाहिजे. पण प्रस्तुतचें हिंदु कोड बहुंशीं धर्मशास्त्राशीं सुसंगतच आहे. तें जितकें क्रांतिकारक पाहिजे तितकें नाहीं अशीच त्यासंबंधीं कांहीं सुधारणावाद्यांची तक्रार आहे. त्या तक्रारीचा विचार न करतां आपणाला प्रस्तुतच्या हिंदु कोडासंबंधीं एवढें तरी नक्की म्हणतां येईल कीं, धर्मशास्त्राशीं बहुंशीं सुसंगत, बुद्धिवादावर आधारलेली, आधुनिक हिंदु समाजाच्या गरजा पुरविणारी व राज्यघटनेशीं सुसंगत असा हिंदु समाज निर्माण करणारी अशी ही नवी स्मृति आहे. या स्मृतीकरितां अनुकूल प्रचार फक्त महाराष्ट्रांतच झालेला आहे व त्या बाबतींत पुष्कळसें श्रेय लोणावळ्याच्या धर्मनिर्णय मंडळालाच आहे. सर्व भारतांत असा प्रकार व्हावयास पाहिजे. तो जर झाला असता तर ही नवी स्मृति पार्लमेंटनें स्वीकारली असती. पण आज सुधारणावाद्यांचा पराभव झालेला दिसतो. तरी पण ही माघार आहे; पलायन नव्हे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. भावी पार्लमेंट या नव्या स्मृतीचें स्वागत करील व हिंदु समाज बलवान् होण्याचा मार्ग मोकळा होईल अशी आशा बाळगण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं.

अधर्मध्वंसिनी न्याय्या समाजैक्यविवर्धिनी ।
सर्वोदयाय संनद्धा स्मृतिर्नव्या विराजते ॥








## सारे पार्वलावरले ओंठ आसूं !

( पान ३८ वरून चालू ) विचारानें केला होता. आतां अण्णा बांधल्या ... करणार होते, त्यांत भावना होती, त्यांत खुळेपणा होता.

घड्याळ विकून अक्काला बांगड्या देणें ही गोष्ट ... प्रेमळ आईलाहि रुचली नसती.

परंतु अण्णा आज वेडे झाले होते.

आपल्या दूर जाणाऱ्या लाडक्या लेकीला त्यांना कांहीं तरी खुळेपणानें द्यावेसें वाटत होतें. प्रेमाच्या प्रपंचांत खुळेपणानें वागणेंच जास्त गंमतीचें असतें.

... लग्नांत तिच्या अंगावर घातलें त्यांत व्यापार होता... त्यांत सौदा होता... अपेक्षा ... नसलें सोन्यासारखें स्थळ मिळावयला आपण तेवढा खर्च करणेंच ...

... तो खर्च... ...जाऊ दे.

अण्णा सराफाच्या दुकानांतून बाहेर पडले. लाल कागदांत बांधलेल्या ... डाव्या हातानें ते आपल्या खिशांत ठेवूं लागले तेव्हां पुन्हा एकदां त्यांचें लक्ष आपल्या मनगटाकडे गेलें...

...आणि मग ते हंसले.

... जिन्यांतच त्यांना बंडू भेटला. या वेळेला खरें पाहतां तो शाळेंत असावयाचा.

"काय रे बंडू ?" ते म्हणाले.

बंडूनें त्यांच्या बोलण्यांतला भावार्थ ओळखला.

अण्णा हंसले.

"अक्का काय करते आहे ?" त्यांनीं विचारलें.

"ताई, अक्का, आई, पांडू पत्ते खेळत बसलीं आहेत सारीं," बंडूनें माहिती दिली.

साडेपांचला येणारे अण्णा आतांच तीनला परत आलेले पाहून अक्काच्या आईला आश्चर्य वाटलें नाहीं. पत्ते जमा करीत तिनें ... आपल्या पतीकडे ... मुद्रेनें पाहिलें.

कोट आणि टोपी काढून ठेवीत ठेवीत अण्णा स्वतःशींच उद्गारल्या-सारखें बोलले, "काय ... हा... हा... हा आपणाला हे बदलतं हवामान कांहीं बुवा मानवत. आज ऑफिसांत जातांनाच कणकण वाटत होती."

गुंडाळलेल्या वळकटीवर डोकें ठेवून ते पसरले. जवळच अक्का ऐसपैस बसली होती. ... आपलें अंग आवरून घेतलें.

"... अक्का !" अण्णा तिला म्हणाले. ती कांहींच बोलली नाहीं.

"आज मुलें शाळेंत गेलीं नाहींत वाटतं ?" अण्णांनीं ताईकडे आणि पांडूकडे पहात विचारलें.

"... व मुलं आहेत तीं." मुलांची आई अण्णांनी खिजवीत गर्भित अर्थानें म्हणाली.

तिला कळून चुकलें होतें कीं अवेळीं ... आलेल्या ... प्रमाणेंच हे हि खोटें ... सुंगीत परत आले आहेत.

"पत्ते ... बंद केले ?" अण्णांनीं विचारलें.

"... ! मुलांची आई म्हणाली, ... उगीच ... खेळत होतों— वेळ जात नव्हता म्हणून."

अण्णा हंसले.

"बंडू कुठें गेला ?"... त्यांनीं विचारलें.

"आमचे खाऊचे—" ताई ... पहात होती.

"... साठवलेले सात रुपये—" पांडू सांगूं लागला.

"... नींच ठरवलं आहे कीं त्या पैशांचं अक्काला कांहीं आणून द्यायचं. ... गेला आहे तो आणावयाला." आईनें ... दिला.

"... मी ... म्हणत होतें पण ऐकत नाहींत, अण्णा," अक्का म्हणाली.

"आणताहेत तर आणूं देत, अग नाहीं कां म्हणतेस ?" अण्णा अक्काला म्हणाले.

एवढ्यांत बंड्या वर आला. तो धांपा टाकीतच आला. येतांना त्यानें करंडयाची पेटी बरोबर आणली होती.

"सहा रुपये, चौदा आणे पडले. दोन आणे ... त्याचं पेपरमिंट आणलें आहे अक्काला."

बंड्या अक्काच्या पुढ्यांत आपली ... ठेवीत म्हणाला.

"आवडली ?" पांडूनें विचारलें.

"पेपरमिंट कुठें आहे ?" धाकट्या ताईनें बंड्याला विचारलें.

"तें तुझ्यासाठीं नाहीं म्हटलं. अक्काला आणलं आहे." बंड्या खिशांतील पुडी अक्काच्या हातांत देत म्हणाला.

"आमचे पण दोन पैसे होते म्हटलं ?" धाकटी ताई त्या पुडीकडे पहात डोळे मोठमोठे करीत आणि गालाचे फुगे फुगवीत म्हणाली.

"अग, पण अक्का दूर जाणार आहे. शिवाय घेतलं दान, दिलं दान पुढच्या वर्षी मुसलमान..." बंड्या ताईकडे पहात म्हणाला.

मग ताई रडूं लागली.

मग अक्कानें तिला आपल्या जवळ घेतलें. आणि तिचें तोंड गोड केलें.

" चहा टाकूं का ? " आईनें विचारलें. अण्णा अक्काकडे डोळे भरून पहात उभे होते.

" हें पहा—ऐकलंस का ? आज अक्कालाच चहा करूं दे. " अण्णांनीं सुचविलें.

आई पुन्हा कावरीबावरी झाली. अण्णांच्या या बोलण्यानें मुलगी दूर जाणार आहे याची जाणीव तिला पुन्हा करून दिली.

" काय—करतेस का चहा ? " अण्णांनीं अक्काला विचारलें.

" इश्श ! करतें कीं. " अक्का जागची उठत म्हणाली. ती स्वैंपाकघरांत गेल्यावर मुलंहि तिच्या मागोमाग तिला बिलगावयाला गेलीं—नव्हे, बिलगतच गेलीं.

अण्णांनीं मुलीच्या आईकडे पाहिलें. आईनें मुलीच्या वडिलांकडे पाहिलें. दोघांच्याहि डोळ्यांत दुःख सैरावैरा धांवत होतें.

दोघांनाहि हें कळत होतें आणि दोघेही हें न कळल्यासारखें दाखवीत होतीं.

" अक्काला सासर छान मिळालें आहे, नाहीं ? " अण्णा बोलले.

" छान मिळालें. " आईनें उत्तर दिलें.

" मी एकटाच स्टेशनवर जाईन पोंचवावयाला. " अण्णा म्हणाले.

" एकटेच जा. " आई म्हणाली.

मग अण्णा कांहीं बोलले नाहींत.

त्यांना ठाऊक झालें कीं त्या घटकेला आसपास कोणी नसतें तर प्रचंड दुःखावर उपाय करून घेण्यासाठीं ती आपल्याला येऊन बिलगली असती. आणि त्यांना ठाऊक झालें होतें कीं आपणाला ती अशी बिलगली असती तर अक्काची आठवण करीत आपणहि उघड उघड रडूं लागलों असतों.

एका हळुवार वातावरणांत मुलीच्या आईवडिलांचीं मनें त्या वेळेला वावरत होतीं.

आपल्या डोळ्यांतून पाणी सांडलें तर ही रडूं लागेल असें अण्णांना वाटत होतें. एवढ्यांत हातांत चहाचे दोन कप घेऊन अक्का तेथें आली.

" तुझाहि कप इकडेच आण ना. " अण्णा म्हणाले.

" मी तिकडेच मुलांबरोबर घेतें. " अक्का म्हणाली.

" अच्छा ! अच्छा ! " अण्णा वरवर हसत म्हणाले.

मग अक्का चिमणीसारखी भुर्रकन् उडून आंत गेली.

" चहा छान केला आहे, नाहीं ? " अण्णा म्हणाले.

" छान केला आहे. " आई म्हणाली.

" स्वैंपाकसुद्धां ती छान करते. " अण्णा म्हणाले.

" स्वैंपाकसुद्धां ती छान करते. " आई म्हणाली.

नेहमींपेक्षां वेगळ्या रीतीनें आई बोलत होती. कांहीं तरी चमत्कारिक वाटलें म्हणून अण्णांनीं तिच्याकडे पाहिलें.

आईनें मान खालीं घातली होती.

आपली कावरीबावरी झालेली मुद्रा आपल्या पतीला दिसूं नये म्हणून त्या काळजी घेत होत्या. आणि त्यांनीं तसें केलें तें फार बरें केलें असेंच त्या क्षणानंतर अण्णांना वाटूं लागलें.

एवढ्यांत स्वैंपाकघरांत गेलेली बालसेना परत तेथें आली.

" आज संध्याकाळीं आपल्याला सिनेमाला जावयाचें आहे सान्यांना. बरं का रे ? " अण्णा म्हणाले.

" आतां पुन्हा आज सिनेमाची कांहीं जरुरी होती का अण्णा ? " अक्का म्हणाली.





## हिरकणी

वेणुगुंफेपरी हिचा — [illegible] नाजुक सरळे
पालवीची लवलव — तसे कुन्तल कुरळे

तशी कटींत झुकते — रानांतून चालताना
शील उगाच घालते — मजेमध्यें बोलताना

चोळी केशरी रेशमी — घट्ट दंडांत रुतली
साडी हिरवी लफ्फ्याची — घोळे पावलोपावलीं

हिच्या गौर मुखावर — निळेशार गोंदवण
आणि कसा कोण जाणे — हिच्या ओठापाशीं वण

तुरळक भुंवयांत — डोळे तरल विघारी
त्यांच्या अडाणीपणांत — कांहीं वेगळी हुषारी

घरीं मोठा कुणबावा — बारा खंडीची शेतकी
इथें लव्हाळे वनांत — हिंडे गव्हाळ केतकी

हिच्या वासावर येती — लुब्ध भुजंग लंपट
कधीं त्यांना मेजवानी — कधीं [illegible] !

—वसंत [illegible]



जेव्हां दोन स्त्रिया बोलत असतात तेव्हां त्यांचें बोलणें [illegible] असतें. जेव्हां एक स्त्री बोलूं [illegible] तेव्हां मात्र ती आमलें जीवन[illegible] करते.

घरांत काम होतें म्हणून आई कांहीं सिनेमाला जाणार नव्हता.

सिनेमांत अण्णा अक्काला आपल्याजवळ घेऊन बसणार होते.

खेळ ६॥ ला सुरू होणार होता. आणि अण्णा मुलांना घेऊन घरांतून सुमारे पाऊण तास आधींच बाहेर पडले होते. आपल्या घराच्या मागच्या बाजूनें ते चालले होते. रस्त्याच्या डाव्या बाजूला पर्वती दिसत होती. चालतां चालतां अण्णा मुलांना घेऊन पर्वतीच्या रस्त्याकडे वळले. थोडीं वेळ गेल्यावर

"अण्णा, कशाला तो भिकार सिनेमा? आपण लंगडीच खेळूं या कीं इथं" छोटी ताई म्हणाली.

"हो हो खरंच आपण लंगडी खेळूं या अक्का." बंडू उद्गारला.

"अण्णा पण खेळतील आपल्या बरोबर. नाहीं का अण्णा?"

"खरंच?" अक्काचं तोंड एका विलक्षण आनंदानं उजळून निघालं.

"खेळूं" अण्णा आपल्या अंगांतील कोट-टोपी काढून ठेवीत धोतराचा काचा घालीत म्हणाले.

अक्कानें 'इश्श' म्हणत आपल्याहि कमरेचा पदर खोंवून घेतला. ताईनेंहि मग परकराचा बंद घट्ट केला. पांडूच्या आणि बंडूच्या हाफपॅन्टचे हे अधिक नाम आवळलेले होते. तेव्हां त्यांच्या बाबतींत प्रश्न नव्हता.

आणि मग डाव सुरू झाला. सरते शेवटीं अण्णांच्यावर राज्य आलें. आणि अखेरपर्यंत अण्णांच्या हाताला अक्का लागली नाहीं.

●

वेळ कसा साळुंकीसारखा उडून गेला.

जेवणें झालीं. थोडें बोलणें झालें. उष्टेंखरकटें करून स्वैपाकघरांतून आई बाहेर आली. तिचें लक्ष घड्याळाकडे गेलें.

"टांगा आणायला जायला हवं आतां." आई म्हणाली.

"अजून तास आहे की!" अण्णा म्हणाले.

"मला वाटतें हें घरांतलें घड्याळ अर्धा तास पुढें आहे. तुमच्या हातांतल्या घड्याळांत पहा बरं किती वाजले आहेत." आई म्हणाली.

"अगं, बरोबर आहे. मी सकाळीं जातांना हें घड्याळ माझ्या घड्याळाप्रमाणें लावून गेलों होतों." अण्णांनीं उत्तर दिलें.

"इश्श! एवढा आळस कसला? मी पहातें." आपल्या पतीच्या हाताकडे पहात मुलांची आई म्हणाली.

"आज घड्याळ ऑफिसमध्येंच विसरून आलों." अण्णा तिसरीकडे पहात म्हणाले.

पण अक्काची आई अर्थगर्भ हंसली.

संध्याकाळीं अण्णा अक्कासाठीं फुलांची वेणी आणावयास गेले होते तेव्हां......

घड्याळाच्या विक्रीची पावती आणि सोन्याच्या बांगड्यांची पावती— दोन्हीहि त्यांनीं वाचल्या होत्या.

परंतु तें रहस्य त्या घटकेला त्यांनीं फोडलें नाहीं. आणखी पांच मिनिटें गेलीं.

मग अण्णा जड पावलांनीं टांगा आणावयासाठीं घराबाहेर पडले. कांहीं वेळानें ते टांगा घेऊन परत आले.

●

मग आईला नमस्कार करण्यासाठीं अक्का खालीं वाकली.

"उदण्ड आयुष्यमान् भव." आई म्हणाली. हें म्हणत असतांनाच तिनें आपलीं दाही बोटें आपल्या दोन्ही कानशिलांवर दाबून मोडलीं.

मग अण्णांना नमस्कार करावयासाठीं अक्का खालीं वाकली.

"आयुष्यमान भव..." अण्णा हसत हंसत म्हणाले. मग अक्काला तिच्या भावंडांनीं आपल्या कोमल हातांचा विळखा दिला.

तो विळखा अक्काला तोडतां येणें शक्य नव्हतं. "आता निजा बरं तुम्ही..." अण्णा खोटें खोटें रागावत मुलांना म्हणाले.

परंतु मुलें अक्काला कांहीं सोडीनात.

मग अक्कानें पंढ्याला दोन्ही हातानीं कुरवाळलें.

आणि कांहीं वेळानें अक्का त्या घराचा जिना उतरून खालीं आली तेव्हां भावंडांच्या आसवांच्या कांचांच्या विलोरी तुकड्यांना तुडवितांना आपल्या नाजूक पायांना भेगा पडल्या आहेत असें तिला वाटलें.

कांहीं वेळानें त्या दोघांना—कन्येला आणि पित्याला घेऊन टांगा स्टेशनच्या दिशेनें धांवूं लागला.

"अक्का!" अण्णा तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाले. त्यांचा स्वर कातर होता.

"अण्णा! काय?" आपल्या डबडबलेल्या डोळ्यांचे डोले आपल्या तोंडांतून निघणाऱ्या शब्दांपासून शक्य तेवढें दूर ठेवावयाचा प्रयत्न करीत अक्का म्हणाली.

"कांहीं नाहीं, कांहीं नाहीं." आपला तोल सावरीत अण्णा म्हणाले.

कांहीं वेळानें ते म्हणाले, "लवंग-सुपारी घेतली आहेस ना बरोबर?"

"हो" ती उत्तरली.

आतां टांगा एका अंधाऱ्या रस्त्यावरून चालला होता.

अक्कानें अण्णांच्या खांद्यावर आपलें डोकें ठेवलें.

"मी दूर जाते आहे म्हणून तुम्हांला वाईट वाटत आहे ना अण्णा!"

"चल! खुळी कुठली!" अण्णा उत्तरले. अंधाराचा रस्ता संपून आतां टांगा पुन्हा मुख्य रस्त्यावर आला होता.

घरापासून...नव्हे घरट्यापासून ती चिमणी आतां दूर जात होती. प्रेमळ जिवांची अशी ही ओढाताण! अंगावर वाढलेल्या वेलीचें हे दूर होणें...आणि आपणच तिला दूर व्हावयाला मदत करतों आहोंत.

खरंच प्रीतीची रचना किती गुंतागुंतीची असते?

खरेंच आपणाला एवढें वाटतें तर या अननुभवी मुलीला काय वाटत असेल?

...आणि घरांतलीं हिचीं तीन भावंडें आतां या घटकेला काय करीत असतील?

...आणि त्यांची आई...या अक्काची आई ती...ती...ती काय करीत असेल?

खरेंच काय करीत असेल?

जगांतलें सर्वांत मोठें दान म्हणजे कन्यादान आहे असें अण्णांच्या अनुभवाला आलें. भगवंताच्या हातांतलें चक्र काढून घ्यावें...हिरव्या चाफ्याचा सुवास काढून घ्यावा.. सावित्रीचें कुंकूं मागून घ्यावें—तसें आपलें कांहींतरी झालें आहे.

कांचेच्या चकमकत्या प्रकाश काढून घ्यावा, इंद्रधनुष्यांतील तांबूस रंग हरवावा, पंचकल्याणाच्या पायांतील गति गहाळ व्हावी, मुद्रिकेंतील

## कावळा करतो काव काव—

जुन्या पुराण्या पारावरच्या
म्हाताऱ्या त्या पिंपळावरी
बसुन कावळा म्हणतो गाणें
दिशा व्यापल्या त्यानें चारी

दूर जराशी तेथुन एक
म्हातारी ती ओटीवरची
रडक्या छकुल्या दावुनि खेळवि
काव काव ती झाडावरची

म्हातारीनें असाच होता
बाळपणीं त्या ओटीवरती
रडतांना तिजे म्हातारीला
दावियलेला झाडावरती

बसुन कावळा म्हणतो गाणें
दिशा व्यापल्या त्यानें चारी
'काव काव' चालली रोजची
म्हाताऱ्या त्या पिंपळावरी

म्हाताऱ्या किति आल्या गेल्या
खेळुने, खेळविलें त्या छकुल्या
वृद्ध जीर्ण त्या झाडावरच्या
वठुन नव्या ह्या फांद्या फुटल्या

जुन्या पुराण्या पारावरच्या
म्हाताऱ्या त्या पिंपळावरी
काव काव ती अजून चाले
जुनी परंतु नित्य नवी!

—राजा मंगळवेढेकर

माणकांची चोरी व्हावी रामानें हनुमान गमवावा...तसें आपलें कांहींतरी झालें आहे.

जी क्षणभर डोळ्यांसमोर नाचली तर आपण खुळे होत होतों, त्या अक्काला आपल्या हाताने स्वीकृत करून दुसऱ्याच्या हातांत जन्माचें देऊन टाकलें.

रोप आपण लावलें.

तें वाढलें...

त्याला आपण खत घातलें व पाणी घातलें.

आणि त्याचा वाढीला लागलेल्या या फुलझाडाचीं पाळेंमुळें अलीकडे किती खोलवर जाऊन पोचल्याचा प्रत्यय आपणांला येऊं लागला होता! आणि हा प्रत्यय येत असतांनाच आपण तिचें दान करून टाकलें.

आणि हा क्षण स्टेशनच्या आवारांतच येऊन पोहोंचला होता.

घड्याळाची सुई घेऊन इंजिनच्या बॉयलरमधल्या वाफेनें स्टेशनच्या गजबजलेल्या प्लॅटफॉर्मच्या अगदीं पुढील टोकावरली आभाळाला एका धूसर धाग्यानें टाके घालावयास आरंभ केला.

गार्डाच्या हातांतलें तें हिरवें निशाण आणि तो कंदील...

त्याच वेळीं एका कर्कश शिटीनें आपली वाढलेलीं नखें स्टेशनच्या छपरावरील नळीच्या पत्र्यांवरून फिरविलीं!

पुलीच्या प्रहारीनें प्रचंड फत्तर हलावा तसें त्या प्रचंड अजगरासारख्या दिसणाऱ्या सुस्त आगगाडीचें शरीर आळस घालवयासाठीं मागें पुढें करूं लागलें.

उंचीवर टांगलेल्या घड्याळानें आपल्या दोन्ही हातांनीं गाडीला, 'आतां निघा' अशी खूण केली. अक्काच्या हृदयांत कालवाकालव घेत होती.

गाडी हलली होती–हलूं लागली होती.

अण्णा हलले होते, हलूं लागले होते.

सकाळपासून जें होणार होतें तेंच आतां घडत होतें. अक्का आतां सोलापूरला चालली होती. मुलगी आतां सासरीं चालली होती.

आण्णांचा देह इथें रहात होता आणि मन...नव्हे हृदय...नव्हे काळीज सोलापूरला चालले होते.

प्रेम...खरेंच प्रेम.

वडिलांचें मुलीवरचें प्रेम...कसें असतें? अण्णांनीं हृदयांतलें दुःख आपल्या डोळ्यांत दडविलें होतें. पापण्यांच्या त्या पातळ पडद्याच्या आंतल्या बाजूला अनेक तुकाराम 'कन्या सासुऱ्याशी जाये' हा अभंग लिहीत बसले होते.

अण्णांना वाटलें ही आगगाडी हा मोठा गळ आहे, आणि या गळाला आपल्या जीवनाची मासळी लागली आहे.

आतां ही गाडी प्रचंड गतीनें पुढें जाणार आहे. धावूं लागणार आहे ...आणि आपल्यालाहि फरफटत नेणार आहे.

कारण आपल्या डोळ्यांना पाणी आलें तर अक्का त्या पाण्यांत विरघळून जाईल.

आणि भातांचे आंसू मग घराकडे परत जातां जातां डोळ्यांतून सांडतां येणार नाहींत का?...

"हें बघ..." अण्णा म्हणाले. त्यांचा कंठ गदगदून आला.

"काय? अण्णा, काय?" अक्का म्हणाली.

तिला समजलें होतें.

अण्णा कांहींच बोलले नाहींत.

"पोंचल्याबरोबर पत्र लिहीन." तीच म्हणाली.

"आतां पुढच्या दिवाळींत..."

अक्का पुढें बोलतां थांबली.

पुन्हां एक शीळ झाली. डब्याजवळ उभ्या असणाऱ्या माणसांना 'दूर व्हा' असा इशारा मिळाला.

अण्णांनीं आपला हात कोटाच्या खिशांत घातला. तांबड्या कागदांत गुंडाळलेल्या चार बांगड्या त्यांनीं बाहेर काढल्या...

"हें जपून ने..." तिच्या हातांत देत ते म्हणाले.

"अण्णा!" अक्का उद्गारली. आणि गाडी सुरू झाली....

हिरव्या खिलारांनीं मंतरलेला अक्काचा हात अण्णांनीं एकदां कुरवाळला.

"अच्छा!" अण्णा म्हणाले.

पहातां पहातां पोलादी चाकांच्या हातांनीं गाडी पोलादी रुळांना रगडूं लागली.

दुःखानें हलके केलेले दोन जिवांचे चार हात त्या प्लॅटफॉर्मच्या पलीकडे सिग्नलवर एक अर्थ विरघळीत [illegible] लागले....

गाडी आतां लांब निघून गेली होती.

दाराजवळ उभी असलेली अक्का [illegible] हाताचा आधार देत [illegible] आपल्या जाग्यावर येऊन बसली. लाल कागदांतल्या सोन्याच्या बांगड्या तिच्या हातांत होत्या.

बाहेर आभाळ भरून आलें होतें. खिडकीवर डोकें टेकीत त्या बांगड्यांकडे पहात पहात तिनें आपले डोळे मिटून घेतले.

तिच्या उजव्या डोळ्यांत सासर होतं.. आणि डाव्या डोळ्यांत माहेर होतं.

आणि पहावी पहातां...

आपलें मन... आपले देह... पहातां पहातां, या दोन अत्यंत दूर असलेल्या बिंदूंकडे परस्परविरोधी दिशेनें ताणला जात आहे असा भास तिला होई.

तिच्या नाजूकाहून साजूक असलेल्या सासुस मनाला तो ताप सहन न होण्यासारखा होता.

विरहाच्या आणि मीलनाच्या, आंसूच्या आणि हंसूच्या दोन टोकावर आधारलेल्या एका हिंदोळ्यावरून तिला कुणीतरी झिंग येइपर्यंत उंच उंच चढवलं होतं.

तिला...

आपलें बालपण तिला आठवलें...

काल... जशी आई आपल्याला कुशींत घेऊन निजली होती तसेंच त्या वेळेलाहि आपण निजत होतों.

बुधाच्या प्रचंड ढिगावरून आणि साईच्या प्रचंड रस्त्यारून आपलें बालपण काजळीनें माखलेल्या डोळ्यानें दुडुदुडु धांवतें गेलें.

गुंजेच्या ... मेंदीला विळखे घालावे तसा आनंद आपल्या गालावर केशर पेरीत पेरीत रविकिरांना चिडवीत हरिआड झाला.

भरलेल्या ताळूच्या तेलानें माखून गेलेली कुंची तिच्या डोळ्यांपुढून एकाद्या पतंगासारखी उडून गेली. कांहीं वेळानें एक झबलें आलें आणि तेंही निसटलेल्या चिमणीसारखें दूर पळालें. मग परकराचें घोट धरीत हंसत ... फेटके आले आणि लाल चिंचा खात गेले... मग साडी आली आणि गुलाबी ब्लाऊज आले... मग—

'एका निळ्या समुद्रांत आणि एका शिसवी होडींत बसून प्रवासाला निघालों आहोंत.

किनारा आतां दूर झाला.

माहेर आतां दूर राहिलें.

तिच्या डोळ्यांतील आतांपर्यंत आवरलेले अश्रू, जन्मठेपेची शिक्षा भोगणाऱ्या कैद्यांनीं जिवावर उदार होऊन तुरुंग फोडून बाहेर पडावें तसे ते आतां निकरावर आले होते.

ते आसूं अमर होते.

आणि कांहीं वेळानें त्या आठ आसूंचें पाणीपुणी होऊन गेलें.

तिला आतां आपल्या लग्नांत अण्णांनीं लिहिलेल्या मंगलाष्टकांतील चार ओळी आठवल्या—

तूं जाणार म्हणून एक भुवनीं ओलावलीं लोचनें
तूं येणार म्हणून एक सदनीं आनंदलीं आननें
'भू स्वर्गावर' फक्त सूर्य तळपे अर्घ्यास ये कृष्णता
हाहि न्याय जडाचलास जगतीं लागू असें तत्त्वता—!





## बेताल मी—बेबन्ध मी!

पृथ्वीस या चेण्डूपरी लाथाडुनी देईन मी!
बेताल मी! बेबन्ध मी! बेहोष मी! बेफाम मी!
रक्तांत या शक्ती वसे शक्तींत या युक्ती वसे
विश्वा मला याच्यापुढें क्षुद्रा तुझी भीती नसे
काळा तुला एकच रे घासामधीं भक्षीन मी!
बेताल मी! बेबन्ध मी! बेहोष मी! बेफाम मी!
स्वर्गांतल्या सौदामिनी पंजामधें पिरगाळुनी
गोळ्यांत माझ्या बांधुनी ठेवीन त्यांच्या दावणी
धारा तयांच्या काढुनी प्राशीन त्यांचें तेज मी
बेताल मी! बेबन्ध मी! बेहोष मी! बेफाम मी!
—आतां निराशे, ये पुढें चाळे तुझे मी पाहतों
ये, तूंहि ... ! ... कां भेकडा तूं धावतों
एका मिठीमाजीं तुम्हा टाकीन मुर्गाळून मी
बेताल मी! बेबन्ध मी! बेहोष मी! बेफाम मी!
या मत्त पोरींनो! पुढें अंगांग शृंगारून या
डोळ्यांतुनी चाळ्यांतुनी फेकीत शृंगारास या
रुद्रापरी नेत्रांतल्या अग्नांत त्या जाळीन मी
बेताल मी! बेबन्ध मी! बेहोष मी! बेफाम मी!
केली रतीला आजला मी मस्तकाखालीं उशी
गारेप्रमाणें टाकिला मी आज खावोनी शशी!
हीं भावनांचीं अस्वलें डांवून झालें ... मी!
बेताल मी! बेबन्ध मी! बेहोष मी! बेफाम मी!!
मी गुंगलों, मी रंगलों, मी झिंगलों, धुंदावलों!
बेछूटतेनें हांसलों! बेभानतेनें नाचलों!
सारें करोनी आजला, सार्‍यांतही नाहींच मी!
बेताल मी! बेबन्ध मी! बेबन्ध मी! बेबन्ध मी!

—मायाशंकर

## यंत्र

( पान १८ वरून )

तो घराबाहेर पडूं लागला. धांवत जावें, त्याच्या पायांना मिठी मारुन त्याला थांबवावें, ते पाय आपल्या अश्रूंनी न्हाणावे असें इंदिरेच्या मनांत आलें. पण तिचे पाय जागच्या जागीं खिळल्यासारखे झाले होते. खूप मोठ्यानें ओरडावं असें तिला वाटलें, पण तिच्या तोंडांतून शब्दच बाहेर पडेना.

वासुदेव घरांच्या पायऱ्या उतरला. इतक्यांत दारांत मोटारीचें हॉर्न वाजलें. कोण आलें तें पहाण्याकरितां इंदिरा पुढें झाली. मोटारींतून सदानंद उतरला होता. त्याला पहातांच वासुदेव चमकला आणि परत फिरला.

आंत येतांच सदानंद इंदिरेला म्हणाला, "वैनी, मिनी कुठं आहे?"

"तुमची वाट पाहून आत्ताच झोपली."

"माझी वाट बघत जागी राहिली होती ती?"

"हो!"

"तरी मला वाटलंच—" सदानंद अर्धवट स्वतःशीं उद्गारला.

त्याच्या या उद्गारांचा अर्थ इंदिरा व वासुदेव या दोघांनाहि कळला नाहीं. तीं त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागलीं.

क्षणभरानें स्वतःला सांवरून सदानंद हंसत म्हणाला, "वासुदेव, संध्याकाळपासून मघांपर्यंत तुझ्याबरोबर वावरणारा रंगेल सदानंद हा कुणी तरी दुसरा मनुष्य होता असं वाटतंय् मला आतां! माझ्यांत एकदम जो फरक पडला तो मिनीमुळं! कुठं आहे ती? तिला एकदां डोळे भरून पहातों. नि मग माझी कथा तुम्हांला—"

तिघेंहि आंत गेलीं. मिनीचें मुसमुसणें आंतां थांबलें होतें. नटवलेल्या बाहुलीला जवळ घेऊन ती झोंपीं गेली होती. झोंपेंत हंसत होती.

एखाद्या भाविकानें देवमूर्तीकडे पहावें तसा कितीतरी वेळ सदानंद टक लावून भावपूर्ण दृष्टीनें झोंपलेल्या मिनीकडे पहात होता.

थोड्या वेळानें तिघेंहि बाहेर येऊन बसलीं. सदानंद इंदिरेकडे वळून म्हणाला, "वैनी, मी जें सांगणार आहे तें बायकांपुढं बोलण्यासारखं नाहीं. पण—तुमच्या मिनीचा संबंध आहे त्यांत—म्हणून—"

तो थांबून खालीं पाहूं लागला. तो काय सांगणार आहे हें इंदिरा व सदानंद या दोघांनाहि कळेना.

मान वर करून सदानंद म्हणाला, "वैनी, कॉलेजमध्यें एका पोरीनं मला फसवलं. मीं डोक्यांत राख घालून घेतली. लढाईवर गेलों. लढाईंत मरण केव्हां येईल याचा नेम नसतो. त्यामुळं शिपाई मिळेल ती मजा लुटायला तयार असतो. माझंहि असंच झालं. आईबाप लहानपणीं वारलेले. जवळचं आप्तइष्ट कुणी नाहीं. लढाईवरूनच रजा घेऊन यायचं नि मुंबईंत मजा करायची असं माझं आयुष्य होतं. त्याचीच चटक लागली मला. लढाईवरल्या ओळखीचा फायदा घेऊन पुढं व्यापारांत पडलों. खोऱ्यानं पैसे ओढूं लागलों. पैशानं बाजारांत मिळणारीं सारीं सुखं माझ्यापुढं हात जोडून उभीं राहूं लागलीं. कुठं नवा बंगला झाला कीं अवाच्या सव्वा भाडं देऊन त्यांत रहायला जायचं, मोटार थोडी जुनी दिसूं लागली कीं ती विकून नवी घ्यायची, कुठं नवी सुंदर बाई आढळली कीं—".

क्षणभर थांबून तो म्हणाला, "आज अशा बाईसाठींच मी इथं आलों होतों. नेहमींप्रमाणं ती दारू अमृत म्हणून मी पिणार होतों. पण—पण—तुमच्या मिनीनं मघाशीं दोन घटकांत मला इतका लळा लावला कीं तुझी बाहुली बघायला रात्रीं येतों असं मीं तिला कबूल केलं. त्या बाईच्या नादांत मी तें विसरून गेलों होतों. पण झोंपण्यापूर्वी सहज समोरच्या कॅलेंडरकडे मी



## —जाग आली पावसानं

मध्यरात्रीं अवचित जाग आली पावसानं
घनगर्जित लोळत दूर जाय क्षितिजानं
थेंब वसंती [illegible]
घरांवर झाडांवर
छेडित ये जलधार
आतं चांदणी—केदार !—शहारतें पानपान
जाग आली पावसानं

मघानक्षत्र वेंघून वीज करीं वांकवीत
वारावादळ पिऊन भाद्रपद ये झिंगत
निळी मखमल मेघाची
शुभ्र फुलं कुटजांचीं
यक्षगीतें विरहाचीं
तुडवीत भाद्रपद नाचे धारांत बेभान
जाग आली पावसान

विजा तिच्या हांसण्यांत घनवटा पदरांत
धुंद उषा पावसाळी जांभई दे लोचनांत
घनच्छाय चांदण्यांत
वीज जाय लखाखत
तसें माझिया स्वप्नांत
कुणी करी येरझारा निळ्या निद्रेच्या कांठान
जाग आली पावस[illegible]

नखमोड सोनसळी लवे चपलांपुढून
सुस्त पानें उजळतां झाड उभें भांबावून
असें माझिया मनांत
[illegible]ण ठाकलें भिजत
[illegible] तलम निद्रेंत
[illegible] जातां तिचें गति झोंप मोडे वाऱ्यानं
जाग आली पावसानं

—वा. रा. कांत

पाहिलें. त्याच्यावर एका [illegible] स्या मुलीचा फोटो होता. मला एकदम मिनीची आठवण झाली. आपली बेटी फक्त ती जगत बसली असेल असं वाटूं लागलं. कॅलेंडरकडे पाहातां पाहातां मिनी 'काका, काका' म्हणून आपल्याला हांका मारतेय् असा मला भास झाला. ती बाई माझ्याजवळ आली, पण मी मिनीच्याच भासांत गुंग होतों. मिनीला भेटून जायची तीव्र इच्छा माझ्या मनांत निर्माण झाली.

मी जाण्याकरितां उठतोंय असं दिसतांच त्या बाईला आपल्या सौंदर्याचा अपमान झाल्यासारखं वाटलं! कदाचित् ती प्यायलीहि असेल. माझा हात धरून ती आपले पराक्रम मला वर्णन करून सांगूं लागली. [illegible] मोठीं माणसं येतात, कुत्र्यासारखं वागविलं तरी पुरुष स्त्रीचे पाय कसे चाटतात, सारं सारं तिनं मला सुनावलं! मिनीची मूर्ति डोळ्यांपुढं आणीत मी तें ऐकत होतों. पण कां कुणाला ठाऊक, तिचं तें वर्णन ऐकतां ऐकतां मला शिसारी आली. वाटलं, पैशाच्या बळावर जें बाजारी प्रेम आपण विकत घेतों त्यांत शरीराच्या क्षणिक सुखापेक्षां अधिक काय आहे? त्यांत काव्य नाहीं, भावना नाहीं, कांहीं नाहीं. माझं सारं आयुष्य [illegible] माझ्या डोळ्यांपुढं उभं राहिलं आणि मला वाटूं लागलं, मी मनुष्य म्हणून कधीं जगलोंच नाहीं. मी लढलों, पैसा मिळविला, बाजारी सौंदर्य लुटलं पण [illegible] प्रत्येक गोष्ट यांत्रिक होती. मग माझं मन म्हणूं लागलं, हें यंत्राचं जीवन आतां बस्स् झालं! या क्षणापासून आपण मनुष्य म्हणून जगायचं! सुख मिळवायचं तें मनुष्य म्हणून. त्या बाईचे तीन दिवसांचे ठरलेले पैसे तिच्या तोंडावर मीं फेंकले आणि—"

[illegible] आणि वासुदेव विचित्र दृष्टीनें एकमेकांकडे कां पहात आहेत हें सदानंदाला कळेना. जणुं कांहीं त्यांची पूर्वजन्मींची ओळख त्यांना या क्षणीं पटत होती!

## टपटप् गळते

टपटप् गळते निंबोळ्यासम
अविरत पागोळ्यांची रास
लिंबाच्या झाडावर बसुनी
रात्र पेंगते हळू हळूच
उघड्या खिडकींतून डोकवे
काळें भुरकें धूसर चित्र
प्रत्यक्षाच्या गोचरतेंतुन
अगोचराची करीत स्पर्श :
पुलालगतच्या विजलीभंवतीं
घालिति पिंगा किती पांखरें
आणि पुलाच्या शेजारी शोधाशोधाला
कुडकुडताती कुबट लक्करें
रेल्वेलाइनी जवळिल डबकें
(जिथें डुंबल्या म्हशी दुपारीं)
हुश्श् म्हणोनी अंग टाकितां
निजते हळुहळु जाग विचारी
दिवसभराची वर्दळ साहुन
मुडपुन पडली गल्ली सुस्त
झांपड नेत्रांवरी सांवरित
डगल्यामधली फिरते गस्त
आणि मधूनच दूर कुठेंसें
गळा काढुनी रडतें कुत्रें
परसदारच्या फटीमधूनी
वाट चुकूनी घूस धांवते
आणिक, टपटप् निंबोळ्यासम
गळते पागोळ्यांची रास
लिंबाच्या झाडावर बसुनी
रात्र जांभई देते दीर्घ.

—गं. व. ग्रामोपाध्ये

## हिंदोल, बसंत, मालकंस, दीपक, मेघ, आणि भैरवी !



अव्याहत चालणाऱ्या कालाचा ठेका
अविचल लय धरून चालू लागला
आणि
जीवनाचें संगीत—?

षड्ज पंचमाची आंस लागली; अंतरींच्या भावना झणत्कारूं लागल्या. षड्जाची जोड आपोआप बोलूं लागला. आणि अंतर्मनांतून वहाणारा आर्ततेचा ओघ खर्जांतून हुंकार देऊं लागला.

मध्यरात्रीचा गडद काळोख वितळूं लागला. हजारों वर्षांची मालिन्याची वडी एक एक एक पापुद्र्याबरोबर निघूं लागली. मूकस्तंभासारखे निश्चलपणें उभे राहिलेले वृक्षहि किंचित् शहारले. वृक्षांना लपेटलेल्या वेली शाखांना सांवरून धरूं लागल्या. पानापानांतून दडलेला समीरण गुदगुल्या झाल्यामुळें सळसळूं लागला. अंग चोरून वृक्ष आणि लता एकमेकांना हंसूं लागलीं.

षड्ज पंचमाची [illegible]हारी जमली. जोड अजोड झंकारूं लागला. स्वरास्वरांतून गंधार ऋषभ नकळत येऊन डोकावूं लागले. स्वरलहरी एकामागून एक निनादूं लागल्या. निद्राधीन झालेल्या विश्वाला सृष्टिसुंदरीनें ललकारी दिली. [illegible]खाचीं पुटें पर्णापर्णाबरोबर खालीं झडूं लागली.

दिशादिशांतून भरत चाललेल्या स्वरानें जिभल्या चाटून चाटून काळोखाला पुसून [illegible]यला सुरुवात केली. पण दिशा उजळतीला येईनात. लिंपलेल्या पुटांना षड्ज पंचमांचा [illegible]लसपणा पटेना.

तंबोऱ्याच्या तारा पुन्हा जमविल्या. पंचमाची आंस मध्यमानें घेतली. तंबोऱ्याचा झणत्कार सुरू झाला.

सा म। ग ध। नी ध। सा ऽऽऽ—

हे स्वर लांबून कुठून आले बरं? आणि हा मधुर स्वर कुणा मुरलीधराचा? माझ्या हृदयांतली ही खळबळ [illegible] वाढते कां? छेः! पहाटेचा हा वारा अंग शहारून नाहीं टाकत? त्या स्वरांचीच ही करामत. आणि या हुरहुरीला [illegible]च कारण.

सा ध। सा म। ध ग। [illegible] सा॥

या स्वरांनीं मींच [illegible] दिली तर माझा दिलवर मला भेटेल. [illegible] वनांत, या रानांत, माझ्या मनांतला मनोहर मला दिसेल. सा ध। सां ऽऽ म।—

—फूलि बन ठेस्॥.....

या स्वरांनीं तर माझा कसा पाठलाग चालविला आहे! आणि या दिशाहि उजळूं लागल्या. बाई बाई! माझ्या गालाचा ग रंग साऱ्या दिशादिशांना लावला! आणि ही सोनेरी रेखा—

निसदिन करि अदिसू! फूलि बन ठेस्,..

या हिंदोळ्यावर बसून मला झोकेच घेऊं दे आतां. माझ्या हृदयांतला हा आनंद या उगवत्या सूर्यनारायणालाच ठाऊक आहे. आज मी माझा प्रियकर शोधीनच शोधीन. कां तो मला शोधील? हो तोच. मला झोकाच घेऊं दे आधीं. आणि मला जेव्हां माझा रा[illegible] भेटेल तेव्हां—

हे माई पियासंग खेले..

—षड्ज मध्यम षड्ज...

—हमारे को प्रतोदन बसकीनो...!! सा ऽऽऽ धा—एक...दोन असाच झोका [illegible] घेऊन सूर्यनारायणालाच हात लावूं का? का...अरे त्यां तिकडे कोण आहे? पण हा धीरगंभीर आवाज कुठला! झोका थांबवूं मी? हा हिंडोल आवरतां आवरेना बाई. बरं तर बरं—या लतांच्या दोऱ्या माझ्यासारख्याच [illegible]शाबद्ध आहेत म्हणून! नाहीं तर तुटायच्याच वांकतील, पण तुटणार नाहींत हो! पण मला आधीं तोल सांवरूं दे माझा! आणि हें कोण म्हणतं आहे—हे माई पियासंग खेले—अग, [illegible] आहे माझा प्रियकर—कुठं आहे? ही आशा सा ऽऽ ध। ही निराशा सा ऽऽ म। या आशानिराशेच्या झोक्यांत कां मी [illegible]ारा जन्म काढूं?—छे ग बाई! मी नाहीं अशी उतरणार या झोल्यावरून. नकोच तो पृथ्वीवरचा वनवास आतां. ही अशी मी झोका घेईन—पूर्वेच्या सूर्याला हात लावीन नि पश्चिमेला त्याच्या [illegible] शिक्का नेऊन लावीन; [illegible] माझी होईल ना भेट आज? या स्वरांनाच विचारा म्हणतां! हृदयांतल्या वीणेचा झंकारच सांगेल खरं काय तें? हो ऽऽ. नाहीं तरी दुसरं कोण सांगणार? माझ्या मनांतलं गुपित त्याला कसं कळणार? नुसतं मी सांगूं म्हणतां? छे हो. असं कसं? पण मला आतां कळतच नाहीं बाई! मला रात्रंदिवस जें वाटत होतं तें आज इतक्या हुरहुरीनं नकोसं कसं होतंय्! नको कसं?। सा ऽ म। ग ऽ ध। हवंच, कां नकोच? सा ऽऽ ध। निसदिन करि आदेस्...फूलि बन ठेस्...

या दिनकराचे सोनेरी किरण फुलाफुलांवरून कुरवाळत चालले [illegible] कुहू कुहू करून ही कोकिळाहि आली कीं. कुठं गेली ही? त्या—त्या फळावर आहे पहा. धिन् धिनक धि[illegible]..हा पारवा तर नाहीं ना घुमत? छे! त्या गंभीर नादामागचं सामर्थ्य. हो हो...तेंच. त्या गंभीर नादाबरोबर माझ्या हृदयाचं स्पंदन कां जोरानं सुरू झालं?...फगवा ब्रिज देखन [illegible] चलरी[illegible].. माझ्या मनासारखं होणार आज. माझी मनोदेवताच सांगते तें...आई बहार—सखी बन फूली. सा—ऽ ऽऽ — वा!. वा! [illegible] आनंदोद्रेक झाल्यासारखं वाटत आहे! [illegible] वृक्षांच्या पानांच्या वाटीवाटींतून येणारे हे सूर्यकिरण—लबाड! चोरून [illegible] मी कुणाबरोबर आहे तें? अरे वेड्यांनो, माझ्या मनांतलं गुपित तुम्ही काय ओळखणार [illegible] तुम्ही नुसतो [illegible] [illegible]. लांब लांब सांवल्या आवर[illegible] [illegible]

क. द. दीक्षित

वरं, आणि चल पुढं. तो पहा, तो आवाज देऊं येतो तुम्हाला ? आणि सुस्वर आवाजांत नाहीं थरकांप होतू—धा धा किटिक धा । धा धा किटतक धी । धा धा किटतक धा । पिया ऽ ऽ संग खेलोऽऽरी । पियासंग—… कुठें आहे तो मी ही इकडे वाट शोधतें आहें नि तिकडे… पियासंग…सुखकर हा आवाज…दृष्ट लागेल वरं ! किती विश्वासानं हा नाद घुमविला…माझ्या दृष्टीला दृष्ट…का देऊं…मी नाहीं…मलाच या म्हणतां… या तुमचा ढोलकू थांबवा ना. सूर्याच्या तापल्या किरणांनीं आधींच तो तापला आहे आणि आतां कसा खणखणून निनादतो आहे तो. त्याच्या बोलांनींच मला वेढलिलं आहे. आणि तुम्ही म्हणतां, पियासंग खेले. दिवसेंदिवस रक्ताच्या प्रवाहाबरोबर तुमच्या मूर्तीचा ध्यास माझ्या हृदयाकडे वहात जात होता. आणि हृदयांतली धडपड या ढोलकाप्रमाणेच तुमच्या मूर्तीनं निनादली. हृदयांतल्या आकांक्षा वाढूं लागल्या त्या आतां झाकूं तरी कुणापासून: आणि झांकू तरी किती ! वय वाढलं का प्रेम वाढलं ? काय सांगूं आतां. थांबवा तरी तुमचा तो ढोलक… ज्या स्वरानं मी इतकी मोहून गेलें आहें ते अळुमाल तरी किती ! कशाला…मीच सांगतें इकडे तिकडे नका बघूं ! आणि आतां कशाची भीति नको, माझं सारं मन भरलंय तुमच्या प्रेमानं. मी का आतां भिणार आहे ? गळून गेलेल्या पानांतून हीं हिरवीगार पानं कशीं हो आलीं ! त्यांनां कांहीं लाज वाटली. आणि कशाची लाज म्हणतां ! प्रेमाची ? वा ऽ ऽ…द्वेषाची वाटली तर वाटूं द्या. या हजार हातांनीं फुलांना कुरवाळणाऱ्या प्रभाकराला पाहून लाल लाल झालेल्या या दिशांना लाज वाटली म्हणतां ? छे हो. अहो त्या हसताहेत वरं. पहा ना !…

पिया ऽ ऽ संग खेलो ऽ ऽ री !…झनक् झनक् वाजणारा हा ढोलक … छुम. छुम … कुहु कुहु … आले हो … थांबा … मला इथेंच उभं राहूं द्या. नको … हें काय वरं ? वरं मी इथंच बसतें. हो पायाशीं … मला ही अशी नकोच जबरदस्ती … थांबा … हा ढोलक असूं द्या ना मांडीवर … मला नाहीं बोलतां येत जास्त. या ढोलकालाच माहिती आहे सारं. नुसते हुंकार देत होतां … तुमच्या स्पर्शाबरोबर … आणि तो असा तर … मी—झाडाझाडामागून बघितलं … इतकी प्रतीक्षा केली, इतका शोक केला … आणि पुन्हा मलाच म्हणतां—मी नाहीं बघत वर … मला ढोलकाच्या अंतर्नादांतून माझं मनोगान ऐकूं द्या… किती दचकलें मी ? गुदगुल्या होतात ना…तुम्हाला काय…या ढोलक्याला तळव्यानं स्पर्शलं कीं त्यालाहि होतात ना गुदगुल्या…काय म्हणतां—

सा ऽ ऽ ऽ सुंदर वदन..।.ध. नि सा ग म ध नि सा वसंता । तुला माझ्या साऱ्या आशाआकांक्षांची कहाणी सांगूं म्हणतोस. फुलवेलीच्या संवधनांची कथा तुला सांगूं म्हणतोस ? या सूर्यकमलाच्या सूर्यमुखी तपश्चर्येचा इतिहास सांगूं तुला ? या कुहु कुहु करणाऱ्या कोकिळेचा कंठ आज कसा मधुर झाला सांगूं ? आणि हा माझा स्वर कां कंपित होतो म्हणून सांगूं ? ग म ध ऽ नि सा ऽ ध ऽ म । अरे राजा…माझ्या डोळ्यांतल्या आसुसतेकडे पहातोस…मोत्यांच्या…आवरल्या या उरोजाकडे पहा…प्रीतीनं ओथंबलेल्या या प्रेमफलाची कहाणी रे तुला कशी सांगूं ? तुझ्या करस्पर्शानं पुलकित होणाऱ्या या रोमांचाची रोमांचकारी कथा तुला माहित आहे ना ? तुझ्या या उष्ण निःश्वासानं त्या ढोलकाचा विश्वास… तोच मला सांगतो कीं माझी सारी कथा

तुला कळली आहे...तूंच माझी कथा लिहिलीस तर ती मी सांगण्याची जरूरी काय? विश्वांतल्या या साऱ्या संसाराची जुळवणी आणि मिळवणी कशी आहे तें पहा बरं जरा!...मुल मोर...मोर...नरनारी शृंगार...नरनारी शृंगार...शृंगाराची तुला कल्पना आहे ना? माझ्या हृदयांतली ही उत्कट इच्छा कीं मी तुझीच...तुला माझी ही देहलतिका...जीवनलतिका...या वसंतागमानं फुलविली पाहिजे. या स्त्रीमनाची कदर तुलाच राखली पाहिजे... नुसत्या तुझ्या प्रेमाच्या फुंकरीनें ही. वेल फुलणार नाहीं कुं. मला तुझा सहवास हवा. तूं हवास ... सोबत देरे अत्र पांथे ...! प्राणापर्णाची ... आत्मापर्णाची काय कथा बोलतोस तूं! स्त्रीचा प्राण ... स्त्रीचा आत्मा...स्त्रीचें स्त्रीत्व! मी अशी तुला वन वन...पाहून धुण्डून...माझा जीव टाकला तो कां? मला माहिती आहे हा क्षण तुला धुंद करील ... आणि मलाही धुंद करील. पण राजा ...माझी ही नुसती धुंदी नाहीं

...नुसता केफ नाहीं... माझ्या प्रेमाची ही सांगत आहे...तुझ्या प्रेमाची क्षणिक जरी मी सहभागी झाले तरी मी जिंकलें—माझी प्रीति सफल झाली...माझें जीवन मी जगलें. पड्ड मध्यमाच्या या उन्मादाला अजून पूर्तता येईना. नुसत्या अतिरिक्त उन्मादाला ... थव

कुठें? आणि ... असणारा हा पूर्तेचा आनंद. ... सगळं छेडून वघूं लागले. पड्ड मध्यमांच्या विलासेला असलेली अपूर्तता ही कधीं संपणार? प्रेमिकांच्या ... मीलनाची सांगता कधीं होणार? या मीलनें स्वत्व, स्त्रीत्व, ममत्वाच्या प्रेमिकाला दिलं, पण या प्रेमदानाचा आपलेपणानं स्वीकार करणारा हा दिलवर...

नुसत्या ... नुसत्या त्यागांत सुख आहे ... मनाच्या कोनाकोपऱ्यांत अभोग्य अशा त्या अनुभवानं ... सारीच ... असेल तर मनाचं औदार्य, देहाचं औदार्य काय उपयोगाचं? वासना मारून मरणार आहेत? त्या ... शांत होणार.

पड्ड मध्यमांनो... आतां तुमती उन्मनावस्थेंत धडपड करूं नका. प्रेमिकांनो केवळ आत्मार्पणाच्या शुष्क ... गुरफटूं नका. चक्रनेमिक्रम सार्थकम पहा. या लतावेलीकडे पहा. साऱ्या विश्वभर उधळलेल्या या पुष्परजाकडे पहा.

येत्या निवडणुकींत जनसंघ



हा दिवटा तुम्हांला वाट दाखवीत आहे!

या वसंताक्वाचें रहस्य पहा. त्या मर्यादाशीत विलासतेनें या मृगांनी ...रजांची पखरण केली त्याचें विलासानें ही वनश्री नटली आहे ना? ... वायुकाम क्रीडेनें ही वसंतश्री फुलली त्या अनिर्बंध लीलेकडे पहा. वनश्रीची संपदा म्हणजे स्त्री मनाची आर्तता, स्त्रीमनाची पूर्णतालोलुपता त्या पूर्ततेसाटीं स्त्री मनाला लज्जा नाहीं. षड्ज मध्यमांना पूर्तता नाहीं—आर्तता आली ... पण पूर्णता! अहाहा ... पंचमाची आंस घेतली आणि ... षड्ज पंचम ... मिळाले नादनिनाद एकच झाले. प्रकाश छाया एकरूप झाले ... सूर्यकिरण सूर्यफुलांत आलिंगून बसलें.

सा ग म नी ध। प म म ग। म ध सा।

तीव्रमध्यमाची आसुसलेली हांक पंचमांत हलकेच कुशीत शिरली...

"माझ्या राजा! मला जवळ घेऊन तूं माझ्या प्रेमाचा स्वीकार केलास! माझ्या हृदयांतल्या स्पंदनाला तुझ्या निःश्वासांनीं फुलविलेंस! पण थांब! हा माझा आनंदाचा क्षण मलाच सांटवूं दे. या रत्नदीपालासुद्धां त्याच्या ज्योतीची अखंड दीप्ति मिळते. मला तुझ्या शरीराच्या उष्णतेंत माझी उष्णता सांटवूं दे. या दीपकाच्या दाहाची माझ्या प्रेमाग्नीला आंच नको. तुझ्या देहाची द... लवलवत्या जिभांनीं आपल्या प्रेमज्वालेला चुंबणारा हा दीप मला नको. तुझ्या करांगुलीनं होणाऱ्या सुखस्पर्शाची ग्वाही देणारा हा दीपक मला आतां नको. तूं आणि मी—पहा या दीपज्वाला कशा या कमलफुलाला अंग चोरून चुकवीत आहेत. आणि मी तरी माझं अंग किती चोरूं?

सा ऽ नी ध। प प ध प ध। म म म ध म ग सा। तुझ्या निःश्वासाची फुंकर माझ्या केशकलापांतून पार आरपार जाते आहे. मी सांगते आहे कीं तुला मी हवी आहें. सदाच हवी आहें ना? पण व्यर्थ प्रश्न मी कशाला विचारूं. माझ्या तृतीला शाश्वतता मिळेल का हा वेदान्तगहनोपम विचार आतां कशाला? आपल्या हृदयांतली स्निग्धता जाळणाऱ्या या दीपाला कधीं असा विचार पडला आहे? तुझ्या माझ्या सम्मीलनाची रहस्यकथा या महालावर रेखाटणाऱ्या या दीपशिखेला—थांब, मी चांगलाच धडा शिकवितें. स्वतः उज्वल राहून दुसऱ्याला कज्जल करणाऱ्या या अद्वितीय प्रेमदीपाला मला टाळूं दे. माझ्या या देहाकडे फक्त तूंच पहा. हा दीप कशाला आणखी मधें? एका सूर्यनारायणाची साक्ष पुरे झाली. आपल्या ज्वालेभोंवतीं अनंत प्रेमिकांना ओढणारा आणि आत्मसात् करणारा हा दीपक मोठा स्वार्थी आहे. या दीपकाच्या प्रकाशांत माझं मुख तुझ्या मुखाकडे वळवून पहाण्याची तुझी चातुरी मला कळली बरं! पण मी तुला माझ्या अंतश्चक्षूंनीं पाहिलं आणि ओळखलं. माझ्या दिव्यचक्षूंनीं मी तुला कुरवाळलं. तूं मला पाहिलेंस आणि मी तुला आतां या दुसऱ्या प्रकाशाची जरूरी आहे? तुझ्या गालावरचं स्मित तुझ्याकडे न पाहतांसुद्धां मी ओळखतें. मग माझ्या मनांतला भाव ओटांवर आला आहे का हं जाणण्यासाटीं तुला दीपकाची जरुरी आहे? मनांत विश्वास असला तरी पहावंसं वाटतं असं तुझं म्हणणं. मग स्त्रीमनाची आणि पुरुषमनाची बरोबरी कधींच होणार नाहीं. बरं न पहातांहि जें कळतं तें सदासर्वकाल सौंदर्यपूर्ण असतं. कारण तें मनसिज असतं. माझ्या या सरसिज पुष्पानेंच मला या दीपज्योतीचा निरोप घेऊं दे. या प्रेमज्वालेला या पुष्पांत गुंतवून मला तुझ्या कुशींत येऊं दे...

षड्ज पंचमाची आंस पुरी झाली. तंत्रीच्या-च्या झंकारानें विश्व सफल झालें. नादनिनादाच्या आवर्तांतून कोणाला केव्हा जाग आली कोणास ठाऊक? वसंतपंचमाच्या मीलनाची निरवा नष्ट झाली कोणास ठाऊक? दीपशाखेच्या दाहकतेप्रमाणेंच पृथ्वीची दाहकता वाढत वाढत वातावरणांत संतप्तता कां निर्माण झाली कुणास ठाऊक?

पृथ्वी वर्षाकालाची प्रतीक्षा करूं लागली. आणि प्रेमाची प्रतीक्षा कोण करीत आहे. ज्यानें आपलें

तनमनधन दिलें तो असा एकाएकीं नाहींसा होईल? ज्याच्या शरीरसुखांत साऱ्या आशा-आकांक्षांची परिपूर्ती झाली तो त्या आशा-आकांक्षांची रक्षा करील का सखरांगोळी करील? प्रेमाची भूक प्रेमानेंच भागवायला पाहिजे. प्रेमाची हांक प्रेमानेंच ऐकली पाहिजे. दूर दूर कोठेंही असणारं हें प्रेमधन माझें मलाच मिळालें पाहिजे. पृथ्वीवरच्या या निदाघाची उष्णता माझ्या विरहाग्नीपुढें काय टिकेल? थांब रे थांब. त्या ढोलक्याच्या घुमेलाराची आठवण करून देणारे हे मेघ आतां माझ्या दृष्टीला पडूं लागेल आहेत. त्या कोकिळेच्या पंचमाची या मयूराच्या षड्जाबरोबर मिळवणी करून मला लांब लांब दृष्टिक्षेप करूं दे. माझ्या प्रेमाच्या हांकेला ओ आलीच पाहिजे. या मेघानेंच माझ्या आशेवर प्रेमजलाचें सिंचन केलें आहे. मेघा लोके भवति सुखिनोप्यन्यथावृत्ति चेतः—मग तुला दुरावलेल्या माझी काय कथा?

आये.. अत धुन..! त्या स्वरांच्या आलापनावरच माझी आतां आशा आहे. त्या षड्ज पंचमाच्या मिलाफावर माझे सारे मनोरथ अवलंबून आहेत. या मेघ मल्हाराच्या ऋषभामुळें माझ्या आकांक्षांना आतां तजेला आला आहे. त्या निषादावरून वरणाऱ्या आणि पंचमावर स्थिरावणाऱ्या स्वरमालिकेबरोबर माझ्या विचारमालिका आतां हेलावूं लागल्या आहेत. मी लांब लांब पहातें आहें. माझ्या मनांत त्या मेघानें हुरूप आला आहे. आये अत धुन... मी मनांत मात्र शांत आहें. मला प्रेम मिळालें यांतच माझी सफलता आहे. पण अजूनही तूं हवा होतास... संतप्त पृथ्वीला जर या जलद येणाऱ्या जलदांनी शांतता मिळणार आहे तर मग मला कां नाहीं? दृष्टिक्रम हा असा आहे ना? कां मी आतां त्या सुखाला दुरावते? या षड्ज पंचमांच्या दिमतीला हे सारें सुंदर कोमलांगी स्वर कुठून आले? तुम्ही काय म्हणतां कीं जें मनांत आहे तेंच खरें सुख. कुणी कुणासाठीं ध्यास करूं नये, असं तुम्ही सांगतां. पण तुम्हांला काय सांगूं? माझ्या त्याच्या मीलनाची गूढ रम्यकथा सांगूं?

देखो मोरी चूरिया करके गेल्या। षड्ज पंचमाला तुम्ही सारे सारे कोमल स्वर देऊन त्यांची पूर्णता कशी अपूर्ण करून टाकलीत. माझ्या हृदयांत सुद्धां अशीच अपूर्णता आहे बरं का...मो मनको पलिया...हो तर माझ्या शरीराचा ताबा घेण्याआधीच मी माझें मन त्याला दिलं होतं. तर मग? मनांत नसलं तर मग प्रेम कसलं. मी ना? कस्सी बड़ाके प्रेम। सुध बुध हार लीनो मेरे रसिया। मी हिंदोळ्यावरून जेव्हां त्याला पाहिलं तेव्हांच मी त्याची आणि तो माझा. हो तर! काय म्हणणार काय आतां? सब शृंगार तूं उतार! माझ्या अंगावरचा शृंगारसाज मी का उतरविला? माझीं कर्णभूषणं कुणी काढलीं? बार बार मत पुकार! या का गोष्टी सांगायच्या आहेत. लाज... ज्याला मन वाहिलं त्याला देहधन द्यायला लाज? वसंत आला कीं वनश्री फुलते ती काय लाजून लाजून? मग...पण त्याच्यासाठीं मी माझं तन मन दिलं ना? मग झालं तर. त्याची चर्चाच कशाला? अडोसी पडोसी सगेरे चरचा करेंगे! पण मग मला त्याची पर्वा आहे म्हणतां? ज्यानें प्रेम केलें आणि ज्याला प्रेम मिळालें त्याला कोणाची पर्वा? असलीच पर्वा तर एकमेकांच्या प्रेमाची. त्याच्या त्या स्पर्शाची, त्या आलिंगनाची, त्या चुंबनाची–त्या—मीलनाची. इतरांची पर्वा मला कशाला... आणि कोणाला च कशाला? जीवनौघ हा असाच वहातजाणार आणि मीहि अशीच चिरकाल गात

येत्या निवडणुकींत रि. सो.



राष्ट्राचे पु... काय करायचें याची हीं संपूर्ण योजना आम्ही तयार केली

या वसंतावरच्या रोख्या पहा! ज्या मर्यादांत विलासतेने या मृगांनी पुष्परजांची पखरण केली त्यांचे विलासानें ही वनश्री नटली आहे ना? ... कामक्रीडेने ही वसंतश्री फुलली त्या अनिर्बंध लीलेकडे पहा. वनश्रीची संपदा म्हणजे स्त्री मनाची आर्तता, स्त्रीमनाची पूर्णतालोलुपता त्या पूर्ततेसाठीं स्त्री मनाला लज्जा नाहीं. षड्ज मध्यमांना पूर्तता नाहीं—अर्तता आली ... पण पूर्णता? अहाहा ... पंचमाची आंस घेतली आणि ... षड्ज् पंचम ... मिळाले नादनिनाद एकच झाले. प्रकाश छाया एकरूप झाले ... सूर्यकिरण सूर्यफुलांत आलिंगून बसले.

सा ग म नी ध । प म म ग । म ध सा ।

तीव्रमध्यमाची आसुसलेली हांक पंचमांत हलकेच कुठेतरी शिरली.

"माझ्या राजा! मला जवळ घेऊन तूं माझ्या प्रेमाचा स्वीकार केलास! माझ्या हृदयांतल्या स्पंदनाला तुझ्या निःश्वासांनीं फुलविलेंस! पण थांब! हा माझ्या आनंदाचा क्षण मलाच सांटवूं दे. या रत्नदीपालासुद्धां त्याच्या ज्योतीची अखंड दीप्ति मिळते. मला तुझ्या शरीराच्या उष्णतेंत माझी उष्णता सांटवूं दे. या दीपकाच्या दाहाची माझ्या प्रेमाग्नीला आंच नको. तुझ्या देहाची दे त्या लवलवत्या जिभांनीं आपल्या प्रेमज्वालेला चुंबणारा हा दीप मला नको. तुझ्या करांगुलीनें होणाऱ्या सुखस्पर्शाची ग्वाही देणारा हा दीपक मला आतां नको. तूं आणि मी—पहा या दीपज्वाला कशा या कमलफुलाला अंग चोरून चुकवीत आहेत. आणि मी तरी माझें अंग किती चोरूं?

सा ऽ नी ध । प प ध प ध । म म म ध म ग सा । तुझ्या निःश्वासाची फुंकर माझ्या केशकलापांतून पार आरपार जाते आहे. मी सांगते आहे कीं तुला मी हवी आहें. सदाच हवी आहें ना? पण व्यर्थ प्रश्न मी कशाला विचारूं. माझ्या तृप्तीला शाश्वतता मिळेल का हा वेदान्तगहनोपम विचार आतां कशाला? आपल्या ... यांतली ...गंधता जाळणाऱ्या या दीपाला कधीं असा विचार पडला आहे? तुझ्या माझ्या सम्मीलनाची रहस्यकथा या महालावर रेखाटणाऱ्या या दीपशिखेली—थांब, मी चांगलीच धडा शिकवितें. स्वतः उज्वल राहून दुसऱ्याला कजल करणाऱ्या या अद्वितीय प्रेमदीपानें मला जाळवूं दे. माझ्या या देहाकडे फक्त तूंच पहा. हा दीप कशाला आणखी मध्यें? एका सूर्यनारायणाची साक्ष पुरे झाली आपल्या ज्वालेमोंवती अनंत प्रेमिकांना ओढणारा आणि आत्मसात् करणारा हा दीपक मोठा स्वार्थी आहे. या दीपकाच्या प्रकाशांत माझं मुख तुझ्या मुखाकडे वळवून पहाण्याची तुझी चातुरी मला कळली बरं! पण मी तुला माझ्या अंतश्चक्षूंनीं पाहिलं आणि ओळखलं. माझ्या दिव्यचक्षूंनीं मी तुला कुरवाळलं. तूं मला पाहिलंस आणि मी तुला आतां या दुसऱ्या प्रकाशाची जरूरी आहे? तुझ्या गालावरचं स्मित तुझ्याकडे न पाहतांसुद्धां मी ओळखतें. मग माझ्या मनांतला भाव ओठांवर आला आहे का हें जाणण्यासाठीं तुला दीपकाची जरूरी आहे? मनांत विश्वास असला तरी पहावंसं वाटतं असं तुझं म्हणणं. मग स्त्रीमनाची आणि पुरुषमनाची बरोबरी कधींच होणार नाहीं. बरं न पहातांहि जें कळतं तें सदासर्वकाल सौंदर्यपूर्ण असतं कारण तें मनसिज असतं. माझ्या या सरसिज पुष्पानेंच मला या दीपज्योतीचा निरोध करूं दे. या प्रेमज्वालेला या पुष्पांत गुंतवून मला तुझ्या कुशींत येऊं दे...

षड्ज पंचमाची आंस पुरी झाली. तंबोऱ्याच्या झंकारानें विश्व सफल झालें. नादनिनादाच्या आवर्तांतून कोणाला केव्हां जाग आली कोणाला ठाऊक? वसंतपंचमाच्या मीलनाची विरहता नष्ट झाली कोणास ठाऊक? दीपशाखेच्या दाहकतेप्रमाणेंच पृथ्वीची दाहकता वाढत वाढत वातावरणांत संतप्तता कां निर्माण झाली कुणाला ठाऊक?

पृथ्वी वर्षाकालाची प्रतीक्षा करूं लागली. आपल्या प्रेमाची प्रतीक्षा कोण करीत आहे. ज्यानें आप...

तनमनधन दिलें तो असा एकाएकी [illegible] होईल ? ज्याच्या शरीरसुखांत सार्‍या आशा-आकांक्षांची [illegible] झाली तो त्या आशा-आकांक्षांची रक्षा करील का [illegible]खगोळी करील ? प्रेमाची भूक प्रेमानेच भागवायला पाहिजे. प्रेमाची हांक प्रेमानेंच ऐकली पाहिजे. दूर दूर [illegible]टीही असणारं हें प्रेमधन माझें मलाच मिळालें पाहिजे. पृथ्वीवरच्या या निदाघाची उष्णता माझ्या विरहाग्नीपुढें काय [illegible] ? थांब रे थांब. त्या ढोलक्याच्या घुमक[illegible]ची आठवण करून देणारे हे मेघ आतां माझ्या दृष्टीला पडूं लागेल आहेत. त्या कोकिळेच्या पंचमाची या मयूराच्या षड्जावरोबर मिळवणी करून मला लांब लांब दृष्टिक्षेप करूं दे. माझ्या प्रेमाच्या हांकेला ओ आलीच पाहिजे. या मेघानेंच माझ्या आशेवर प्रेमजलाचें सिंचन केलें आहे. मेघा लोके भवति सुखिनोप्यन्यथावृत्ति चेत:—मग तुला दुरावलेल्या माझी काय कथा ?

आये.. अत धुन..! त्या स्वरांच्या आलापनावरच माझी आतां आशा आहे. त्या षड्ज पंचमाच्या मिलाफावर माझे सारे मनोरथ अवलंबून आहेत. या मेघ मल्हाराच्या ऋषभामुळें माझ्या आकांक्षांना आतां तजेला आला आहे. त्या निषादावरून वसरणाऱ्या आणि पंचमावर स्थिरावणाऱ्या स्वरमालिकेबरोबर माझ्या विचारमालिका आतां [illegible] लागल्या आहेत. मी लांब लांब पहातें आहें. माझ्या मनांत त्या मेघानें हुरूप आला आहे. आये अत धुन...मी मनांत मात्र शांत आहें. मला प्रेम मिळालें यांतच माझी सफलता आहे. पण अजूनही तूं हवा होतास... संतप्त पृथ्वीला जर या जलद येणाऱ्या जलदांनी शांतता मिळणार आहे तर मग मला कां नाहीं ? सृष्टिक्रमच हा असा आहे ना ? कां मी आतां त्या सुखाला दुरावते ? या षड्ज पंचमांच्या दिमतीला हे सारें सुंदर [illegible]मलांगी स्वर कुठून आले ? तुम्ही काय म्हणतां कीं जें मनांत आहे तेंच खरें सुख. कुणी कुणासाठीं त्यास करूं नये, असं तुम्ही सांगतां. पण तुम्हांला काय सांगूं ? माझ्या त्याच्या मीलनाची गूढ रम्यकथा सांगूं ?

• देखो मोरी चुरिया करके गेल्या । षड्ज पंचमाला तुम्ही सारे सारे कोमल [illegible] वेऊन त्यांची पूर्णता कशी अपूर्ण करून टाकलीत. • माझ्या हृदयांत सुद्धां अशीच अपूर्णता आहे बरं का...मो मनको फसिया...हो तर माझ्या शरीराचा [illegible] घेण्याआधीच मी माझं मन त्याला दिलं होतं. तर मग ? मनांत नसलं तर मग प्रेम कसलं. मो ना ? बन्सी बजाके प्रेम । सुध बुध हार लीनो मेरे रसियाँ । मी हिंदोळ्यावरून जेव्हां त्याला पाहिलं तेव्हांच मी त्याची आणि तो माझा. हो तर ! काय म्हणणार काय आतां ? सब शृंगार तूं उतार ! माझ्या अंगावरचा शृंगारसाज मी को उतरविला ? माझीं कर्णभूषणं कुणी काढलीं ? बार बार मत पुकार ! या [illegible]गोष्टी सांगायच्या आहेत. लाज ... ज्याला मन वाहिलं त्याला देहधन द्यायला लाज ? वसंत आला कीं वनश्री फुलते ती काय लाजून लाजून ? मग...पण त्याच्यासाठीं मी माझं तन मन दिलं ना ? मग झालं तर. त्याची चर्चाच कशाला ? अडोसी पडोसी सगेरे चरचा करेंगे ! पण मग मला त्याची पर्वा आहे म्हणतां ? ज्यानें प्रेम केलें आणि ज्याला प्रेम मिळालें त्याला कोणाची पर्वा ? असलीच पर्वा तर एकमेकांच्या प्रेमाची. त्याच्या त्या स्पर्शाची, त्या आलिंगनाची, त्या चुंबनाची—त्या —मीलनाची. इतरांची पर्वा मला कशाला... आणि कोणालाच कशाला ? जीवनौघ हा असाच वहात जाणार आणि मीहि अशीच चिरकाल गात [illegible]गार. 'क्षण एक पुरे प्रेमाचा' असंच मी गाणार. [illegible]च्या प्रेमाची [illegible], [illegible]साठींच या कोमल रागिणीची मी संगत करणार आणि मांगणार की असं करूं नको... देखो मोरी चुरियां करके गेल्या ! [illegible] प्रियकर माझी काय चोरी करणार ? माझ्या चुंबनाची जोडी तो कशी चोरून नेणार. माझ्या प्रेमाची दौलत त्याच्या प्रेमानें वाढणार, कमी नाहीं होणार...आणि म्हणूनच मी गाणार. बार बार मत पुकार...माझ्या प्रेमाचं [illegible] मी गाणार. मी षड्ज पंचमाच्या [illegible] षड्ज मध्यमाच्या अपूर्णतेचीहि गोडी गाणार. कारण ज्यानें प्रेम केलं नाहीं त्याला दुःखाची आणि जगण्याची रीतच कळली नाहीं. त्यानं प्रेम केलं पण मिळविलं नाहीं. त्यानं इच्छा दाखविली, पण त्याला आतां नाहीं असं मी म्हणेन. एरवीं त्याचे प्रेमाचे श्रम प्रेमाच्या निःश्वासांत निघले असते. पण ज्यानें प्रेम केलं आणि मिळवलंही त्याला एक क्षण कां मिळेना—पण मग त्याला मो मनको फसिया...असं म्हणण्याचे कांहीं जरूरी नाहीं. प्रेमाचा परीस लागला कीं आयुष्याचं सोनं झालंच. मग त्या सोन्याच्या तुकड्यांना कोणी [illegible] —म्हणोत वा कांहीं म्हणोत. प्रेमाचं महत्त्व त्यागांतच आहे, शाश्वततेंत नव्हे. आणि प्रेमाची पूर्तता दाहकच असणार. ती क्षणभरच मिळणार. ती क्षणभरच टिकणार. विद्युल्लतेच्या तेजाची चमकसुद्धां प्रेमाच्या उत्कटतेपुढें फिकी. माझ्या या वीणेच्या झंकाराच्या प्रेमाच्या गोडीचा त्यांत सहस्रांशसुद्धां नाहीं. या चंद्रकिरणांची शीतलता त्या माझ्या प्रियकराच्या सुखद [illegible] कांहींच नाहीं. माझ्या त्या दिलदाराच्या स्मृती याच माझ्या आतां सहचरी आहेत. माझ्या वक्षस्थलावर रुळणाऱ्या या मुक्ति [illegible] त्याच्या हृदयाचीं गुपितें कुरवाळीत आहेत आणि तीं मला रोज आठवतील. त्या तृप्तींत माझी अमृतता सांठविली आहे आणि त्या अमृततेंत माझं जीवन आहे.

* * *

मध्यरात्रीच्या निरवतेंत स्मृतिलहरी [illegible] लागल्या. [illegible] काळोखे क्षणदेखील कोमलस्वरूप [illegible] भव्याइत चालणाऱ्या काळ्या ठेका अविचल लय धरून चालूं लागला आणि जीवनाचें

येत्या निवडणुकीत — रि. सो. पार्टी



राष्ट्राचे पुढें काय करायचें याची हीं संपूर्ण योजना आम्ही तयार केली आहे.

संगीत त्याच्या साथ-बरोबर समेला आणि कालात्म येऊं लागले. समेखालच्या रेखकतेमुळें भावनाविलासाचा भास निर्माण झाला आणि मानवी सुखदुःखें त्या स्वगधुतात उत्पन्न होऊन विलीन होऊन गेलीं.

म. म. दत्तो वामन पोतदार, गजानन जागीरदार, अनंत काणेकर आणि रॉय किणीकर यांचे लेख छापण्याची परवानगी दिल्याबद्दल मुंबई नभोवाणीच्या केंद्राधिकाऱ्यांचें आम्ही आभार मानतो.

—संपादक



हें शेवटचें पान तसें पाहतां टॉम अँड ब्रॅगलिमिटेड, 'दीपावली'च्या जाहिरातींचे सोल एजंट, यांच्यासाठीं राखून ठेवण्यांत आलें होतें. परंतु दीपावलीच्या कामांत ते इतके मग्न होते कीं त्यांनी स्वतःच्या जाहिरातीचा मजकूर आणि ब्लॉक देण्याची आठवण आणि सवड झाली नाहीं. त्यामुळें या पानाचें हें असें झालें!



दोरीवरचा हा डोंबारी
आभाळाला देई माथें
दोरी खालीं दुलईवरती
'दयाधर्मकी माता' रडते ॥

शतजन्मांचें वैर विसरुनी
विस्तवपाणी बसली गाडी
शतजन्मांचा सूड घ्यावया
वधूवरांची जमली जोडी ॥

ओठांवरती निजलें चुंबन
कुशींत दडलें परि आलिंगन
मांड्यांमध्यें लपलें मीलन
अन् स्तनाग्रींच का जागे स्वप्न ?

हिरवी चादर सफेद ठिपकं
चिकण टाकते कात सुपारी
मिटल्यां ओठांतून उडतसे
लाल शराबी ही पिचकारी !

व्यास वाल्मिकी अंतर्ज्ञानी
लिहुनि ठेविती कागद कोरा
त्यांचे बच्चें बूच बिलंदर
आम्ही भरतों सुईंत दोरा !

आणि शेवटीं

चुलींतील चिताग्नीवर
अन्नपूर्णा सती जाई
पिंडांतील ब्रह्मांडाला
गर्भां तुनी हांक येई

——आरती उद्यावरकर

★

## गर्भवती !

ओढ चालीया तिला येइना
इकडे तिकडे झोंक चालले
डोळे उघडुनि मुळीं बघेना
भलतें होतें पोट वाढलें ॥

नवरा होता तिच्या सोवती
खंडाळ्यावर चढले गाडीत
कण्हत कण्हत मग कशींबशीं तीं
कष्टें येती थेट पुण्यांत

टांगा करुनी आंत बैसले
होते दोघे मातिवडार
पोलिस चौक्या मागें टाकुनि
गेले आपुल्या झोंपडीवर ॥

टांगा वळतां दोघे हंसलें
गर्भवतीनें उड्या मारल्या
पोटावरच्या पट्ट्या सुटतां
हजन बाटल्या ओतन आल्या :

—गो. ल. आपटे




किर्लोस्कर पंप तुमची गरज मनाजोगी भागवूं शकतील. कारण त्यांत मिनिटाला ५० ते ५००० ग्यालन पाणी काढणारे अनेक नमुने आहेत. शेतकरी, कारखानदार, घरमालक यांचा या पंपांनीं सर्वत्र विश्वास संपादन केला आहे. किर्लोस्कर सेन्ट्रिफ्युगल पंप विश्वासार्ह आहेत !




**किर्लोस्कर बंधु लि., किर्लोस्करवाडी**

Tom & Bay Ltd..

